# हसूं आणि आंसू !

( सर्कसमधील जीवनावरील हृदयस्पर्शी रमणीय कादंबरी )

ना. सी. फडके

प्रथमावृत्ति

१५ ऑगस्ट १९५०

किंमत पांच रुपये

● ● ●

ता. २० ऑगस्ट १९४९ च्या ‘ कॉलिअर्स ’ च्या अंकांतील जेम्स मार्टिन यंग यांच्या ‘ रोझिनबॅक ’ या गोष्टींतील कल्पना या कादंबरींत मीं वापरली आहे.

—ना. सी. फडके.

● ● ●

• • •

ना. सी. फडके

यांचीं आम्ही प्रकाशित केलेलीं पुस्तकें

| | | | |
|---|---|---|---|
| १ | झंझावात | ५ | रुपये |
| २ | मंथन | ४ | ,, |
| ३ | कमलपत्रें | ३ | ,, |
| ४ | अभ्यंगस्नान | ३ | ,, |
| ५ | मैफ़ल | ३ | ,, |
| ६ | जेहलम | ६ | ,, |
| ७ | हंसूं आणि आंसूं | ५ | ,, |

• • •

# फडके-साहित्य

## कादंबऱ्या

१ अल्ला हो अकबर
२ कुलाब्याची दांडी
३ जादूगार
४ दौलत
५ अटकेपार
६ निरंजन
७ कलंक शोभा
८ आशा
९ उद्धार
१० काश्मिरी गुलाब
११ प्रवासी
१२ समरभूमि
१३ उन्माद
१४ गुप्त प्रायश्चित्त
१५ इंद्रधनुष्य
१६ प्रतिज्ञा
१७ वादळ
१८ शाकुंतल
१९ अखेरचं बंड
२० बस नंबर बारा
२१ जीवन–संगीत
२२ माझाधर्म
२३ झंझावात
२४ अंजलि
२५ जेहूलम
२६ पतंग
२७ हसूं आणि आंसू
२८ उजाडलं ! पण सूर्य कुठें आहे ?

## प्रबंध

१ मानसोपचार
२ मानसोन्नति
३ सुखाचे संसार
४ संतति-नियमन
५ आजचे तरूण स्त्री-पुरुष
६ प्रतिभा साधन
७ वाङ्मय विहार
८ आधुनिक गीता
९ मानस मंदिर
१० साहित्य व संसार
११ मनोहरची आकाशवाणी
१२ वेचलेलें मोतीं
१३ टाकीचे घाव
१४ टांकाच्या फेकी
१५ माझ्या साहित्यसेवेंतील स्मृति भाग १
१६ कोंदणें
१७ शेला पागोटें

## नाट्य

१ युगांतर
२ संजीवन
३ तोतया नाटककार
४ काळे गोरे
५ जानकी
६ जडावाची देवी ( नाटिका )
७ आगलावी ( ,, )
८ क्षमेसाठीं अपराध ( ,, )

## गोष्टी

१ प्रो. फडके यांच्या गोष्टी भाग १ ला
२ ” ” ” ” भाग २ रा
३ लोला आणि इतर गोष्टी
४ नमुनेदार गोष्टी
५ उल्हास कथा
६ वत्सला आणि इतर गोष्टी
७ चंद्रा आणि इतर गोष्टी
८ लाडकी लक्ष्मी आणि इतर गोष्टी
९ माझादेश आणि इतर गोष्टी
१० जिवाचं मैतर
११ बाजु बंद
१२ अत्तर गुलाब
१३ मागं वळून पाहूं नकोस, आणि इतर गोष्टी
१४ अभ्यंगस्नान

## ललित-गद्य

१ गुज गोष्टी
२ नव्या गुज गोष्टी
३ धूम्रवलयें
४ अबोलीच्या गोष्टी
५ मैफल
६ कमल पत्रें

## चरित्र

१ दादाभाई नौरोजी
२ टेरेन्स मॅक्स्विनी
३ डी व्हॅलेरा
४ तीन थोर देशभक्त
५ लोकमान्य टिळक

## व्याख्यानें

१ गाजलेलीं भाषणें
२ मित्र हो !
३ मंथन
४ खाडिलकरांच्या नाट्य-कृति
५ किर्लोस्कर, देवल आणि गडकरी

## काव्य

१ रुमझुम

## इंग्रजी

1 Sex Problem in India
2 Psychology
3 Social Psychology
4 Elements of Ethics
5 History of Philosophy
6 Manual of Logic
7 Birth Control
8 Leaves in the August Wind ( A Novel )
9 Birth Pangs of New Kashmir
10 Sun beams and Shadows ( Stories )

# १

‘ बारा गांवचं पाणी प्यालेले ’ म्हणून आम्हां सर्कसवाल्या लोकांना आमची मित्र मंडळी पुष्कळदां हिणवितात. त्यांनीं अशा प्रकारें आम्हाला हिणवावं असं वर्तन आमच्या हातून घडतंहि. एखाद्या गांवीं आमचा मुक्काम पडला म्हणजे तिथल्या कांहीं मंडळींशीं आमची इतकी दोस्ती होते कीं त्यांना वाटूं लागतं, हे लोक आपल्याला आतां कधीं विसरणार नाहींत. त्यांचा निरोप घेऊन “ खुशाली कळवीत जा हं ” असं आम्ही त्यांना बजावतों, व तेहि आम्हांला निक्षून सांगतात. परंतु तिथला मुक्काम हालून आम्ही दुसऱ्या गांवीं गेलों कीं त्यांच्या आमच्यांत एखाद्या पत्राची देवघेव होते, आणि त्यानंतर कुशल समाचाराचा तंतु क्षीण होत जाऊन केव्हां तुटतो तें कळतहि नाहीं. आमच्या-भोंवती नव्या गांवचे नवे स्नेही जमा होतात. नव्या गप्पा, नवे लागेबांधे, नवे जिव्हाळे निर्माण होतात. मागच्या मुक्कामाचं गांव आम्ही विसरून जातों. तिथला मुक्काम हालतों, पुढच्या गांवीं निराळे दोस्त करावे लागतात, आणि मग त्यांहि गांवाची याद आम्हाला उरत नाहीं. असं हें मित्रभावांच्या जनन-मरणाचं चक्र आमच्या भटक्या आयुष्यांत अव्याहत चाललेलं असतं. जुन्या

मित्रांना वरचेवर पत्र पाठविणं आमच्या हातून घडत नाहीं. ते आमच्यावर रुष्ट होतात. चार सहा वर्षांनीं त्यांच्या आमच्या पुन्हा भेटी झाल्या कीं आम्हीं त्यांच्याशीं पुन्हां अगदीं प्रेमानं वागूं लागतों. पण त्यांच्या मनांत आमच्याविषयीं अढी असते. " आमची आठवण अजून आहे म्हणायची तुम्हाला ! " असा टोला दिल्यावांचून ते रहात नाहीत. " तुमची आठवण आम्हीं विसरूं हें शक्य आहे काय ? " असं कांही तरी आम्ही बोलूं लागलों कीं ते म्हणतात " तुम्ही आमची आठवण ठेवाल अशी अपेक्षा आम्हीं करणं चूक आहे. बोलूनचालून बारा गांवचं पाणी प्यालेले लोक तुम्ही ! " हें त्यांचं कडू बोलणं हंसण्यावारी नेणं आम्हाला भाग असतं. आम्ही हंसतों, कांहीं तरी गोडी गुलाबीचं बोलणं करतों, आमच्यावर रागावलेल्या पण मनांतल्या मनांत प्रेम करणाऱ्या त्या मित्रांची समजूत पडते, आणि पूर्वीसारखाच खेळीमेळीचा सारा व्यवहार पुन्हां सुरूं होतो. सर्कसच्या धंद्यांत दहा वर्षे काढल्यामुळें हें सारं आतां माझ्या अंगवळणी पडलं आहे.

' बारा गांवचं पाणी प्यालेले ' हें वर्णन नाटकी लोकांपेक्षां देखील आम्हां सर्कसवाल्यांना अधिक लागू पडतं यांत कांहीं संशय नाहीं. एक तर नाटकी लोकांची हिंडण्याचीं गावं बारा म्हटलीं तर आमची बाराशें मोजावीं लागतील. आणि शिवाय त्यांच्या आमच्या मुक्कामाच्या तऱ्हा किती निराळ्या ? जिथें दीड दोन महिने आम्ही तळ देऊं शकतों, अशा दहा पांच मोठ्या शहरांची गोष्ट सोडली, तर आमच्या आयुष्याची तऱ्हा बहुतेक अशी, कीं एखाद्या गांवीं जायचं, पंधरा वीस दिवस रहायचं, आणि तिथून उठून दुसरं गांव गाठायचं. कित्येक गांवीं आमचा तंबू उभारला जाऊन नोकराच्या राहुट्या, घोड्यांचा पागा, जनावरांचे पिंजरे, इत्यादि वसाहतीला जरासं स्थिर स्वरूप येतं न येतं तोच खुंट्या उचकटून, दोर काढून, तंबू पाडून गुंडाळायला सुरवात करावी लागते. संन्याशानं कोणत्याहि गांवीं तीन दिवसांच्यावर ' पुडी ' घेऊं नये असा नियम आहे म्हणतात. आमच्या आयुष्याचा जवळजवळ हाच नियम असतो. आमचं पाऊल धड कुठें ठरतच नाहीं. पांखरांपेक्षां देखील आम्ही अधिक चंचल. कारण तीं या झाडावरून त्या झाडावर सारखीं उड-

तात खरीं, पण निदान गांव सहसा सोडीत नाहींत. उलट आमचं पाऊल कुठें धड ठरेल तर शपथ. ज्यांना गांव नाहीं, पत्ता नाहीं, बूड नाहीं अशीं आम्हीं सर्कसवालीं माणसं असतों ही गोष्ट नाकबूल करतां यायची नाहीं.

परंतु 'बारा गांवचे पाणी प्यालेले' असं आम्हाला हिणविण्यांत आम्ही आठवणीचे हलके असतों व आमचे स्नेहसंबंध अस्थिर व चंचल असतात असा जो हिणविणाऱ्यांचा अभिप्राय असतो, तो मात्र मला मान्य नाहीं. 'तुम्ही बारा गावचं पाणी प्यालेले' असं मला कुणी म्हटलं कीं मी वाद घालीत नाहीं; पण या बोलण्यांतला अभिप्राय किती खोटा आहे तें माझ्या मनांत आल्यावांचून रहात नाहीं. पायावर भोंवरा असल्याप्रमाणें आम्हीं सारखे भटकत असतों हें खरं आहे. परंतु हें भटक्याचं आयुष्य कंठितांना देखील त्यांतहि कांहीं कांहीं स्थळांविषयीं आणि व्यक्तीविषयीं विशेष सुहृद्-भाव आमच्या अंतःकरणांत उत्पन्न झालेला असतो. इतर लोकांप्रमाणें त्या सुहृद्भावाची जोपासना आमच्या हातून होत नाहीं. ती करावीशी वाटली तरी करायला सवड नसेत. परंतु आमच्या मनांत त्या जिव्हाळ्याचे गुप्त झरे सतत असतात. ताटातुटीनंतर पुनर्भेटी झाल्या कीं त्यांचे पाझर कसे वाहूं लागतात तें आमचं आम्हाला कळतं ना...

उदाहरणार्थ 'बेगमपेठ' या गांवाचीच गोष्ट सांगतों. आठ दिवसांपूर्वी आम्हीं आमच्या सर्कशीचा मुक्काम इथें आणला. तो आणल्यापासून मी किती आनंदांत होतों, त्याचं शब्दांनीं वर्णन करणं शक्य नाहीं. मागं आम्हीं पंधरा दिवस या ठिकाणीं मुक्काम केला होता, त्या गोष्टीला सहा वर्षे होऊन गेलीं. पण त्या मुक्कामांत या गांवानं माझं मन असं कांहीं ओढून घेतलं कीं विचारूं नका. आमच्या अखंड भ्रमंतींत मधूनच एखादं असं गांव लागतं कीं त्यावर मन जडतं. मुंबई—कलकत्त्यासारखीं मोठालीं शहरं मला आवडत नाहींत. या मोठाल्या शहरांचा साराच खाक्या राक्षसी. या शहरांत सर्कसच्या व्यवस्थेचं काम चोख ठेवतां ठेवतां जीव कसा मेटाकुटीस येतो. हीं बडीबडीं शहरं खरं विचाराल तर मला नकोशीं वाटतात. छोटीं शांत गांवं माझ्या मनाला अधिक आवडतात. सहा वर्षांपूर्वी बेगमपेठला आम्ही आलों तेव्हां तर या गांवानं मला

भुरळच घातली. देशाच्या चारी दिशांकडे दूर दूर हिंडतांना दमून भागून पहांटे कॉटवर अंग टाकलं कीं एकदम बेगमपेठच्या आठवणी मनांत येत, आणि वाटे पंख लावावे आणि एकदम त्या रमणीय स्थळाकडे भरारी घ्यावी. परंतु सर्कसचे मुक्काम पोटासाठीं आणि पैशासाठीं हालवायचे असतात. अमक्या गांवीं उडून जावं अस मनाला कितीहि वाटलं तरी जातां येतं थोडंच ? पण मुक्काम दर मुक्काम करीत करीत पुढें पुढें सरकण्याच्या या क्रियेंत हव्या त्या गांवाची भेट पुन्हां केव्हां तरी होतेच. याप्रमाणें आमची 'दि ग्रेट रॉयल सर्कस' सहा वर्षांनंतर पुन्हां बेगमपेठच्या मुक्कामाला आली होती. मी फार फार आनंदांत होतों.

या गांवापासून चार मैलांवर मोठी लष्करी छावणी होती. खुद्द गांवदेखील एखाद्या कँटोनमेंटसारखं होतं. त्यामुळें लष्करांतील सोजीर व ऑफिसर, आणि इतर गोरे स्त्री-पुरुष यांचा भरपूर आश्रय सर्कसला मिळत असे. शिवाय गांवाच्या पूर्वेच्या बाजूला तीन मैलांवर एक मोठा कारखाना होता, त्यांत दीड दोन हजार मजूर कामावर होते, आणि आजुबाजूस पांचपन्नास लहान गांवं होतीं. त्यामुळें सर्कशीच्या प्रत्येक खेळाला गॅलरी आणि जमीन भरून जात असे. बेगमपेठचा मुक्काम कमाईच्या दृष्टीनें पहिल्या प्रतीचा जायचा हें ठरलेलं असे. पण माझं या गांवावर प्रेम जडलं होतं तें या विचारानं नव्हे. या गांवाच्या रमणीयपणावर मी आषक झालों होतों.

अरबी समुद्राकडला हिंदुस्थानचा पश्चिम किनारा आणि बंगालच्या उपसागराकडला पूर्वकिनारा यांपैकीं निसर्गसौंदर्यानं अधिक नटलेला कोणता तें सांगणं कठीण आहे. मला विचाराल तर मी असं म्हणेन कीं आपल्या देशाचे हे दोन्ही किनारे निसर्गशोभेनं भारी समृद्ध आहेत. मात्र एकेका बाजूस एखाद दुसरं गांव असं आहे कीं त्याची शोभा दुसऱ्या बाजूच्या कोणत्याहि गांवाला नाहीं. अपूर्व शोभेचीं अशीं दोन्ही किनाऱ्यावरचीं जीं गांवं मला माहीत आहेत, त्यांपैकीं बेगमपेठ हें एक आहे. मागच्या वेळेप्रमाणें याहि वेळेस हिंदुस्थानच्या दाक्षिणेचं टोक त्रिवेंद्रम् येथपर्यंत थडकल्यानंतर कोरोमंडल, गोळकोंडा अशा पूर्वकिनाऱ्याच्या रेषेनं मद्रास, नेलोर,

मच्छलीपट्टम् असे मुक्काम टाकीत,वर उत्तरेकडे सरकत सरकत कलकत्त्याच्या वाटेवरच्या, ओरिसा प्रांताच्या पश्चिम सीमेकडल्या या बेगमपेठ गांवीं आम्ही येऊन पोचलों होतों. या गांवाच्या आसमंताकडे नजर टाकली कीं, वाटे 'पुरी'कडचं निसर्गसौंदर्य अजून इथें रेंगाळत आहे, आणि बंगालच्या निसर्गसौंदर्याची चाहूलहि इथें लागते आहे. एका दिशेला दूर दर्याचं पाणी आणि मधल्या कित्येक मैलांच्या विस्तारांत पांच पन्नास छोट्या छोट्या गांवांनीं बनविलेल्या वर्तुळांत मधोमध बेगमपेठ हें गांव--या मांडणीचा थाटच असा कांहीं होता कीं तो नजरेला पडल्याबरोबर मोठा आल्हाद वाटावा. पहाडांच्या दिशेकडे दाट जंगलाचे गडद काळे निळे रंग दिसत; उलट दिशेला भातशेतांचे पट्टे आणि नारळी पोफळींच्या बागा नजरेस पडत. खाऱ्या गोड्या पाण्याचे ओहोळ तर बेगमपेठची मुख्य वस्ती ओलांडली कीं जिकडे जावं तिकडे झुळुझुळु वाहत असतांना आढळत. केवळ ही विलक्षण सृष्टिशोभा पहाण्यासाठीं भटकण्याची माझ्या मनांतली हौस मला फार क्वचितच पुरी करतां येत असे. सर्कशीच्या अठरा कारखान्यांचं काम सुसूत्र चालविणाऱ्या माझ्यासारख्या सर्कस मॅनेजरच्या वाट्याला हे भाग्य कुठलं यायला ? पण एखाद्या महत्त्वाच्या कामानिमित्त बाहेर पडलों कीं त्या संधीचा फायदा घेऊन मी मुद्दाम थोडी भ्रमंति करीत असे, आणि आजूबाजूचं निसर्ग-सौंदर्य डोळे भरून पहाणयची तहान भागवितां येईल तेवढी भागवून घेत असे.

आत्तांहि असंच तृषाशमन करीत आमची स्वारी निघाली होती. आज रात्रीचा खेळ रेडक्रॉसच्या फंडासाठीं व्हायचा होता, व त्यासाठीं कांहीं बड्या लोकांना भेटून आमंत्रण द्यायचं होतं. सकाळीं टांग्यांतून हिंडून बहुतेक आमंत्रणं मीं उरकून टाकलीं होतीं, व आतां फक्त पोलीस ट्रेनिंग स्कूलचे मुख्य अधिकारी मेजर मिलर साहेब यांना आमंत्रण द्यायचं होतं. त्यांच्या रहात्या बंगल्याकडे जाणारा रस्ता भात खाचरांच्या आणि नारळीपोफळींच्या बागांच्या रांगांमधून गेलेला होता. मीं टांगेवाल्याचे पैसे चुकते करून त्याला जायला सांगितलं, आणि पायींपायींच निघालों. दूर अंतरावर गर्द झाडींच्या खिडक्यांतून मिलर साहे-

बांच्या बंगल्याच्या लाल छप्पराचे ठिपके मला दिसत होते त्यांकडे मधूनच पहात, मधूनच आजूबाजूची शोभा बघत, दूरच्या समुद्राच्या दिशेकडून झाडा-झुडपांतून शीळ घालीत येणारा वारा आंगावर घेत मी त्या लाल रस्त्यानं वेगानं निघालों होतों.

मागून कुत्र्याचं भुंकणं व घोड्यांच्या टापांचे आवाज कानांवर आले म्हणून मीं वळून पाहिलं. पाहतों तों दोन घोडे माझ्या दिशेनं हलके हलके येत होते, आणि एक मोठा ' कॉकर स्पॅनिअल ' जातीचा कुत्रा धापा टाकीत मधूनच भुंकत घोड्यांबरोबर चालला होता. मीं मिलरसाहेबाला ओळखलं. सहा वर्षांपूर्वी आम्हीं बेगमपेठेच्या मुक्कामाला आलों, तेव्हां पोलीस ट्रेनिंग स्कूलच्या मुख्याधिकाऱ्याच्या जागीं हाच होता, व यानं सर्कसवर फार लोभ दाखविला होता. पोलीसांच्या खेळण्याच्या मैदानानजीकची खूप मोठी मोकळी जागा त्यानं सर्कसच्या तंबूसाठीं दिली होती, आणि आमच्या मुक्कामाच्या अखेरीस जागेचं ठरलेलं भाडं देण्यासाठीं मी त्याच्याकडे गेलों तेव्हां तो हंसून म्हणाला होता, " तुमच्या सर्कसवर मी फार फार खूष झालों आहे. मी तुमच्यापासून भाडं नाहीं घेणार. मात्र पुन्हां शक्य तितक्या लवकर या गांवीं या. माझी इथून बदली होण्यापूर्वीं तुम्हीं पुन्हा एकदा इथं यावं अशी माझी इच्छा आहे. तुमच्या मालकांना सलाम सांगा." या वेळेस तर मी माझ्या एका मदतनीसाला पत्र देऊन मिलरसाहेबाकडे पाठविलं होतं, आणि तें पहातांच तो त्याला म्हणाला होता, " दौलतरावांना सांगा, जागा तुमची आहे. वाटेल तेव्हां येऊन तंबू ठोका." इथें मुक्कामाला आल्यापासून मिलर साहेबाची भेट घ्यायला मला सवड झाली नव्हती. त्याची माझी भेट आत्तां ही अशी रस्त्यांत होत होती.

त्याच्याबरोबर घोड्यावर बसून चाललेल्या बाईला मात्र मला चटकन ओळखतां आलं नाहीं. मी मनाशीं म्हणालों, असेल कोणी मैत्रीण. कारण मागच्या मुक्कामांत मला माहीत झालं होतं कीं मिलर हा उतारवयापर्यंत लग्न न करतां राहिलेला ब्रह्मचारी होता, पण त्याच्या मैत्रिणींचा परिवार मोठा होता. आमच्या मागच्या मुक्कामाच्या वेळेस तो तीन चारदां सर्कस पाहायला आला होता, परंतु दर वेळेस उजव्या हातानं धरलेली एक मैत्रीण डाव्या हातानं

धरलेली दुसरी मैत्रीण अशा थाटांत स्वारी आली होती. मात्र आत्तां घोड्यावर बसून त्याच्याबरोबर चाललेली ही बाओी मीं कधीं पूर्वी पाहिलेली नव्हती. मीं मनाशीं म्हटलं, कोणी तरी असेल. मैत्रिणींच्या मोठ्या परिवाराबद्दल जशी मिलरसाहेबाची ख्याति होती तशी नित्य नव्या मैत्रिणी गोळा करण्याबद्दलहि होती ... अधिकाधिक जवळ येणाऱ्या त्या अश्वारूढ मडमेकडे मी निरखून पाहूं लागलों.

पण तितक्यांत दोन्ही घोडे माझ्याजवळ आले, आणि मला पाहिल्याबरोबर "हॅलो ऽ ! कोण, दौलतराव ?" असं उद्गारून मिलरसाहेबानं खालीं उडीच टाकली. घोड्यावरच्या त्या बाईकडे वळून तो हंसत म्हणाला, "डार्लिंग, हे माझे जुने स्नेही, दौलतराव ! दि ग्रेट रॉयल सर्कसचे मॅनेजर." मीं मान झुकवून अभिवादन केलं. ती माझ्याकडे किंचित् हंसत निरखून पहात राहिली. जणूं पांढरी स्वच्छ तंग सुरुवार, गॅबर्डीनचा हंटिंग कोट, व डोक्याला ऐन कोल्हापुरी थाटाचा साफा हा माझा पोशाख तिला एखाद्या अभ्यासाच्या विषयासारखा वाटत होता. या विचारानं मला किंचित् हंसूं आलं असावं. आणि माझं हंसणं पाहून तिच्या तोंडावरचं हास्य अधिक रुंद आणि स्पष्ट झालं असावं.

मिलरसाहेबानं तिच्याकडे हनुवटी झुकवून मला सांगितलं, "ही माझी बायको." मीं पुन्हा अभिवादन केलं. मी जरी माझं आश्चर्य तोंडावर दिसूं दिलं नाहीं तरी मनांतल्या मनांत मी चांगलाच थक्क झालों. मिलरचं वय पन्नाशीच्या पलीकडचं होतं, आणि घोड्याच्या उजव्या कुशीवर दोन्ही पाय सोडून हातांत लगाम अलगद धरून बसलेली तांबूस केसांची व निळ्या डोळ्यांची ती किशोरी पुरती पंचविस वर्षांची देखील दिसत नव्हती. तिनं जितक्या कुतुहलानं माझ्या पोषाखाकडे पाहिलं होतं त्याहून दसपट अधिक कुतुहलानं मी तिच्याकडे पहात राहिलों...मिलरसाहेबाचं लग्न झालं होतं ही गोष्ट मला आधींच माहीत होती असं त्याला वाटावं या हेतूनं मीं घोड्यावर बसलेल्या त्याच्या बायकोकडे पहात म्हटलं, "आपणां दोघांना आज रात्रीच्या खेळाचं आमंत्रण द्यायसाठींच मीं निघालों होतों."

मिलरची बायको हंसून कांहींसं बोलणार होती, पण त्या आधींच त्यानं माझा खांदा धरून म्हटलं, "ठीक ठीक. पण हें पहा दौलतराव, असं रस्त्यांत उभं राहून आम्हीं तुमचं आमंत्रण घेऊं शकत नाहीं. आमच्या बंगल्यावर चला, थोडीशी बिअर घ्या, मग तुमचं आमंत्रण द्या." बायकोकडे वळून पाहून त्यानं म्हटलं, "डेझी, तूं पुढें होतेस काय? मी दौलतरावांच्या-बरोबर गप्पा मारीत मारीत येतों, तुझी हरकत नसेल तर"

तिनं आपल्या घोड्याला अिशारा दिला, त्याबरोबर तें सुंदर उमदं जनावर साफ दिडक्या चालीनं धावूं लागलं. सर्कसच्या धंद्यांत तयार झालेली माझी दृष्टि त्या अबलख घोड्यावर वास्तविक खिळून रहावयाची. परंतु मी जास्त आधाशीपणानं पहात राहिलों तो घोड्याच्या चालीबरोबर वरखालीं होणाऱ्या, आणि खरोखरच एखाद्या नाजूक डेझीच्या फुलाप्रमाणें दिसणाऱ्या मिसेस मिलरच्या आकृतिकडे !

रस्त्यानं चालतां चालतां मिलरनं विचारलं, "तुमची सर्कस मागच्या खेपेप्रमाणें आतांहि पहाण्यालायक आहे काय?"

मीं म्हटलं, "मागच्यापेक्षां अधिक चांगला खेळ वाटेल तुम्हांला या वेळेस."

"हं?" तो म्हणाला, "घोडे किती आहेत?"

"सहा सहा एक जात एक रंगी सुंदर घोड्यांच्या तीन टीम्स आहेत. शिवाय चार पोनी आहेत."

बहुतेक सारेच गोरे लोक घोड्यांचे फार षोकी असतात. मिलरला तर घोड्यांचा विशेष षोक होता. "हं हं!" तो म्हणाला, "एकदां सावकाश सकाळच्या वेळीं येऊन तुमचे सारे घोडे पाह्यले पाहिजेत आम्हाला. डेझीला घोड्यांचा फार षोक आहे..."

मीं म्हटलं, "जरूर या आपण."

मिलरनं विचारलं, "आणि त्या दोन लहान देखण्या पोरी आहेत का अजून तुमच्याकडे?"

सर्कसमध्यें इतकीं माणसं जात असतात व येत असतात कीं त्या सगळ्यांची आठवण ठेवणं कठीण असतं. त्यामुळें मिलरसाहेब कुणाबद्दल विचारीत

होता तें चटकन् माझ्या ध्यानांत आलं नाहीं. मी जरा गप्पच राहिलों.

त्यानं पुन्हा विचारलं, " तारेचीं आणि सायकलीवरचीं कामं करणाऱ्या त्या दोन बहिणी ? "

" हां हां ! त्या म्हणता होय ? " माझ्या एकदम लक्षांत आल्यामुळें मीं म्हटलं.

सुमारें आठ वर्षांपूर्वी मलबार किनाऱ्यावर आमच्या सर्कसची फिरती चालूं असतांना कॅननूर मुक्कामीं बारा वर्षांची एक आणि चौदा वर्षांची एक अशा आपल्या दोन मुलींना घेऊन एक मलबारी म्हातारा आमच्याकडे येऊन राहिला होता. त्या मुलींचीं मूळचीं मलबारी नांवं बदलून थोरलीला छबेली आणि धाकटीला हरिणी अशीं नांवं आम्हीं दिलीं होतीं. म्हाताऱ्याचं नांव किट्टू होतं. त्या दोन्ही मुली अगदीं पुरत्या काळ्या असूनहि डौलदार गोंडस बांध्यामुळें आणि रेखीव नाकडोळ्यांमुळें देखण्या दिसत. त्या हुशारहि होत्या. आमच्याकडे येऊन राहिल्यापासून चांगलीं चांगलीं कामं त्या भराभर शिकल्या. सर्कसमध्यें एकटा दुकटा खेळाडू सहसा नोकरीवर असत नाहीं. तीन तीन चार चार पांच पांच अशा खेळाडूंचे गट नोकरीवर असतात, व सगळ्यांना मिळून जो कांहीं पगार द्यायचा तो आम्ही त्या गटाच्या मुख्याला देत असतों. छबेली आणि हरिणी या दोघींच्या कामाबद्दल आठवड्याचे सोळा रुपये आम्हीं हळु हळु किट्टूला देऊं लागलों. मागच्या खेपेस आम्हीं बेगमपेठला आलों तेव्हां या दोन पोरींचीं कामं लोकांना फार आवडूं लागलीं होतीं, व इथल्या मुक्कामातच मीं त्यांच्या पगारांत चार रुपयांची वाढ केली होती. या साऱ्या गोष्टी आठवून मीं मिलरसाहेबाला म्हणालें,

" तुम्ही कुणाबद्दल विचारतां तें आतां माझ्या लक्षांत आलं. पण साहेब, तुम्हाला अेक वाअीट बातमी सांगायची आहे. त्या बहिणींपैकीं थोरली आतां आमच्या खेळांत नाहीं "

" कां ? कुणी पळवून नेली ? "

" मृत्यूनं ! "

" अरेरे ! " असा उद्गार काढून मिलरसाहेब स्तब्ध झाला. पण मग

त्यानं हलकेच विचारलं, " ती छोटी पोरगी तरी आहे ना ? "

मीं म्हटलं, " आहे, पण ती आतां छोटी कुठली राहिली आहे ?चांगली वीस वर्षांची झाली आहे ना ! "

" ओहो ! मग ती तर खुबसुरतीच्या ऐन भरांत असेल आतां ? "

मीं हसून म्हटलं, " तें मला कांहीं कळत नाहीं साहेब. आज तुम्हीं खेळाला याल तेव्हां तिला पहा आणि तुमचं तुम्ही ठरवा. "

तो मोठ्यांदा हंसला, आणि माझ्या खांद्यावर थाप मारून म्हणाला, " त्यांतलं कांहीं कळत नाहीं काय ? ही तुमची कोटि मला आवडली. "

तितक्यांत आम्ही बंगल्याच्या आवारांत येऊन पोहोंचलों. मघांचा तो कॉकर स्पॅनिअल कुत्रा डेझीबरोबर पुढें आला होता तो भोंकत व्हरांड्याच्या पायऱ्या उतरून सामोरा आला, आणि मिलर साहेबापुढें रंगणं घालूं लागला. मुख्य दिवाणखान्याच्या दारावरचा पडदा दूर करून डेझी बाहेर आली. तिनं स्पेर्टाचा पोषाख बदलला होता, तोंड धुतलं पुसलं होतं, केसांवरून कंगवा फिरविला होता, पावडर लिपस्टिक वापरली होती. निळसर बुंदाच्या पांढऱ्या शुभ्र फ्रॉकमध्यें ती मघांपेक्षांहि अधिक मोहक आणि एखाद्या ताज्या फुलासारखी टवटवीत दिसत होती.

आम्ही आंत गेलों तों टेबलावर बिअरच्या बाटल्या आणि ग्लास मांडलेलेच मला दिसले.

★ ★ ★

# २

मिलरसाहेबाच्या बंगल्यावर बिअर जरा जास्तच घेतल्यामुळें मला भलतीच झोंप लागली. जागा होऊन पहातों तों माझ्या राहुटींत जवळ जवळ अंधार झाला होता. अरे बापरे असं मनाशीं म्हणून चटकन उठलों, आणि चूळ भरून टाकून, कमरेची लुंगी घट्ट करीतराहुटी बाहेर पडलों. मोठ्या तंबूतल्या गॅसच्या बत्त्या पेटविण्यांत नोकर गुंतलेले दिसले. शहरांत फिरावयास गेलेले जाहिरातीचे गाडे, हत्तीची रंगविलेली पिलं, बॅंडवाले, वगैरे सरंजाम परत येऊन पोंचत होता. बाजारांत चक्कर मारण्यासाठीं गेलेलीं सर्कसमधील खेळाडू मंडळी गटागटांनीं परत येत होतीं. रात्रीच्या खेळांत कोणाकोणाचीं कामं कोणत्या अनुक्रमानं व्हायचीं त्याची यादी तयार होऊन संध्याकाळीं तंबूंत लावलेली असते, ती पहावयाची आणि खेळाडूंनीं आपापल्या कामाला तयार व्हायचं असा रोजचा क्रम ठरलेला असतो. त्या क्रमाला अनुसरून बाजारांतून परतलेले खेळाडू स्त्रीपुरुष ‘ नंबर ’ पहावयासाठीं जात होते. मुख्य रस्त्यापासून तंबूच्या प्रवेशद्वारापर्यंत आजच्या धर्मार्थ प्रयोगाला येणाऱ्या बड्या लोकांसाठीं मुद्दाम तयार केलेल्या वाटेवर नोकर पाणी मारीत होते, आणि ओल्या

मातीचा वास उठून हवेंत दरवळत होता. तंबूच्या आवारांत रोज विक्री करणारे मिठाईवाले, चिवडा-भेळवाले, पानपट्टीवाले, सोडालिंबूवाले, हळु हळु आपापले हातगाडे ढकलीत मैदानाच्या कडेला उभे राहूं लागले होते. आणि आजूबाजूच्या वस्तींतील छोटीं छोटीं पोरं त्यांच्या भोंवतीं जमा होऊं लागलीं होतीं. ज्यांच्या फाटक्या पैरणीच्या खिशांत एक दिडकी देखील नव्हती अशीं तीं पोरं दिवसभर भोंवतींभोंवतीं घुटमळून सर्कसमधलीं जनावरं दिसतील तेवढीं पहाण्याची मोफत चैन ज्याप्रमाणें करीत असत, त्याप्रमाणेंच फेरीवाल्यांच्या हातगाड्यांवरचे पदार्थ डोळे भरून पहाण्याची चैन त्यांना मोफत करतां येण्यासारखी असे. " ए ! हट " असं कुणी म्हटलं तर तेवढ्यापुरतं थोडं दूर सरकायचं आणि पुन्हां एकत्र गोळा व्हायचं या त्याच्या तंत्रापुढ कोणाचाहि इलाज चालण्यासारखा नसे. तंबूच्या एका अंगाला खेळाडूंच्या रहाण्याच्या राहुट्या होत्या, त्यांतून धूर निघत होता, सैपाकाचा वास येत होता. मधूनच पागेच्या बाजूनं एखाद दुसऱ्या घोड्याचं खिंकाळणं ऐकूं येत होतं. आणि मधूनच इतर सर्व आवाजांची मातब्बरी नाहींशी करणारी वाघाची डरकाळी किंवा सिंहाची गर्जना कानांवर येत होती.

सारा बंदोबस्त ठीक आहे असा समाधानाचा उद्गार मनाशीं काढून मी आपल्या राहुटींत परत वळणार होतों, पण तितक्यांत " काका ! काका ! " अशा हांका मला ऐकूं आल्या. वळून पाहिलं तो हरिणी माझ्याकडे धांवत येत होती. अर्धवट अंधारांतच ती मला दिसली पण तिला पाहिल्याबरोबर मिलर साहेबाच्या शब्दांची मला आठवण झाली...मग ती तर खुबसुरतीच्या ऐन भरांत असेल आतां ?...ती माझ्याजवळ येऊन उभी राहिली आणि हातांतली एक लहानशी कार्डबोर्डची पेटी माझ्यासमोर धरून म्हणाली,

" बाजारांतून मी काय घेऊन आलें आहे, ओळखा ! "

तिला श्वास लागला होता, आणि नवतारुण्यानं भरदार दिसूं लागलेला तिचा ऊर वर खालीं होत होता. ती दमली होती म्हणून नव्हे. दमछाकीची अवघड कामं करणारी सर्कशींतील मुलगी होती ती. तिला श्वास लागला होता

ते तिच्या मनाची कशानं तरी धांदल उडाली होती म्हणून. तिच्याकडे पहात मीं तिला विचारलं,

" मला कसं ओळखतां येणार ग ? तूंच सांगशील तेव्हां मला कळेल. दाखव पाहूं काय घेऊन आली आहेस तें "

" दाखवते ना. सगळ्यांच्या आधीं तुम्हांला दाखविणार आहे मी " असं म्हणत तिनं दोरा तोडला, कागद सोडला, पेटी उघडली, तिच्यांतून एक अति-सुंदर गुलाबी साटणीची पँट काढून ती आपल्या कमरेला लावून धरली आणि मला विचारलं, " कशी काय शोभेत मला ? "

तितक्यांत तंबूच्या मागच्या द्वारापुढच्या दोन गॅसच्या बत्त्या वर चढल्या व त्यांच्या उजेडांत ती मला दिसली. मीं म्हटलं, "फार छान दिसतेस तूं! पण मी तुला दोन गोष्टी सांगितल्या तर रागावयाची नाहींस ? "

पँट मनाजोगती पायघोळ झाली आहे कीं नाहीं हें पहाण्यासाठीं तिनं आपली मान झुकविली होती. ती वर न करतांच ती म्हणाली " सांगा. "

मीं म्हटलं, " तूं असे पैसे उधळावेस हें चांगलं नाहीं. किट्टूला आवडायचं नाहीं. "

मानेला झटका देऊन ती म्हणाली, " उं: नाहीं आवडलं तर नाहीं ! " ज्या वयांत मुली बापाच्या अिच्छेचा जुलूम मानीनाशा होतात त्या वयाच्या उंबरठ्यावर हरिणी आतां उभी होती हें तिच्या त्या उद्गारावरून मी ओळखलं.

मी हंसून म्हटलं, " मला देखील आवडत नाहीं हें. "

तिनं चटकन मान वर केली आणि हातांतली पँट झुलवीत ती मला म्हणाली, " असं का म्हणतां काका ? कपड्याचा षोक आम्ही करूंच नये वाटतं कधीं ? ती नकटी फोडेल्या तोंडाची लिझि असल्या विजारी घालते, तें तुम्ही पाहिलं नाहीं वाटतं ? तिच्यापेक्षां ही मला जास्त शोभेल तरी ? खरं का खोटं सांगा. "

मीं चटकन म्हटलं, " खोटं कोण म्हणेल ? या पँटमध्यें तूं फार सुंदर दिसशील यांत शंकाच नाहीं ! पण—"

माझे पुढचे शब्द ऐकायला हरिणी उभी राहिलीच नाहीं, 'मग झालं तर !'

असं म्हणून एका हातांत कार्डबोर्डची उघडी पेटी, ब्राउन पेपर, दोरा हें सारं तसंच घेऊन आणि दुसऱ्या हातावर त्या सुंदर गुलाबी साटणीच्या पँटची घडी टाकून तिनं माझ्यापुढून धूम ठोकली.

भारी किंमतीची गुलाबी साटणीची पँट मुद्दाम शिवून घेण्याची हौस हरिणीनं का दाखविली होती त्याचं कारण एकदम माझ्या लक्षांत आलं होतं, त्याचा विचार करीत मी आपल्या जागीं उभा राहिलों. लिझीबद्दलच्या मत्सरानं हें सारं चाललं होतं. हरिणीच्या मनांतला हा मत्सर आतांशा माझ्या लक्षांत थोडा थोडा येऊं लागला होता. नकटी, फोडेल्या तोंडाची असं जें लिझीचं वर्णन हरिणीनं केलं होतं तेंहि मत्सरामुळेंच. लिझी कांहीं अगदीं सरळ नाकाची नव्हती हें खरं, आणि तिच्या गालावर अधून मधून पुटकुळ्या उठत असत हेंहि खरं. परंतु तिला नकटी कोण म्हणेल ? किंवा फोडेल्या तोंडाची असं तरी कसं म्हणतां येईल ? उलट ती आपल्या रोजच्या कामाच्या वेळेस सोनेरी टिकल्या लावलेली मखमलीची तंग चड्डी आणि काचोळी घालून टोनीच्या हातांत हात घालून प्रवेश करीत असे तेव्हां प्रेक्षक तिच्या रूपावर आणि दिमाखावर कसे भाळून जात तें मीं रोज पहात होतों.

टोनी आणि लिझी यांचं लोखंडी गोल पिंजऱ्यातलं मोटरसायकलीवरचं काम म्हणजे आमच्या सर्कशीच्या खेळातलं नवं मुख्य आकर्षण होतं. या पिंजऱ्यांत तीं दोघं ताशीं पंधरा मैलांच्या वेगानं एकमेकाला चुकवीत व नाना तऱ्हेच्या आकृती काढीत फेऱ्या घालूं लागलीं कीं एकीकडे वेग आणि सफाई यांच्या सौंदर्यानं पहाणारे लुब्ध होऊन जात, तर दुसरीकडे कोणत्याहि क्षणीं ज्यांत मृत्यूची भेट होईल अशा त्या साहसाच्या दर्शनानं लोकांच्या हृदयांचा थरकांप उडे. आणि अखेर जेव्हां बँड अजिबात बंद होत जाऊन फक्त टर्र्रर्र असा आवाज टिपरी ड्रमवर करीत रहात असे, आणि टोनी उजव्या हातानं लिझीला तिच्या सायकलवरून ओढून आपल्या खांद्यावर चढवून, तिची सायकल अखेर गोलाच्या तळाशीं पडेपर्यंत मोकळीच फिरूं देऊन, तिला चुकवीत फेऱ्या काढीत असे, तेव्हां सर्कसचा सारा भव्य तंबू टाळ्यांच्या कडकडाटानं गर्जून जात असे......

टोनी–लिझी यांचें हें काम म्हणजे आमच्या खेळाचं सगळ्यांत मोठं आकर्षण होतं. टोनी–लिझीची जोडी आम्हांला मद्रासेंत येऊन मिळाली होती. तेव्हांपासून आमचं उत्पन्न चौपटीनं वाढलं होतं. या जोडीला दर आठवड्याला अर्डीचशें रुपये आम्ही अगदीं हंसत देत होतों. नाटक मंडळ्यांप्रमाणें सर्कसवाल्यांतहि अहमहमिका असते, व एकमेकांचीं माणसं फोडण्याच्या भल्याबुऱ्या खटपटी सतत चालू असतात. माणसंच कशाला, जनावरं सुद्धां! तीं फोडून नेतां येत नाहीत, पण मारतां येतात. मागं एकदां रावळपिंडीच्या मुक्कामांत आमचा एक भारी उमदा आणि कामं बिनबोभाट करणारा सिंह एकाएकीं मेला होता त्याची मला पक्की आठवण होती. श्वापदांच्या खात्याकडे एक नोकर आम्ही नव्यानंच ठेवला होता. सिंह मेला त्या दिवशीं तोहि नाहींसा झाला. नंतर चौकशीअंतीं आम्हाला कळलं होतं कीं एका प्रतिस्पर्धी सर्कसच्या मालकानं आमच्या त्या सिंहाला सकाळच्या मांसाबरोबर विष घालण्याच्या खास कामगिरीवर त्या इसमाला नोकरीवर रहाण्याचा बहाणा शिकवून आमच्याकडे धाडलं होतं. जनावरांच्या बाबतींतसुद्धां असे डावपेंच चालतात, मग खेळाडू फोडण्याच्या खटपटी होत असल्या तर नवल काय? टोनी–लिझी या जोडीला आमच्यांतून फोडून नेण्याचे इतर सर्कसवाले प्रयत्न करीत होते. पण मी त्या दोघाना व्यवस्थित करारानं बांधून घेतलं होतं. आतां मजल दर मजल करीत येत्या नाताळांत कलकत्त्यास जें एक मोठं टोलेजंग प्रदर्शन भरावयाचं होतं त्याचा मोका साधून आम्ही कलकत्त्यास जाणार होतों. आमच्याजवळ खूपच चांगले चांगले इतर खेळहि पुष्कळच होते; पण टोनी–लिझी ही जोडी असली कीं कलकत्त्याच्या प्रदर्शनाच्या वेळच्या दीड दोन महिन्यांच्या मुक्कामांत रोज दोन खेळ करून निदान अडीच तीन हजारांचा गल्ला उचलतां येईल असा माझा हिशोब होता. टोनी आणि लिझी हे आमच्या हातांतील दोन हुमकी एक्के होते.

आणि हरिणी या लिझीचा मत्सर करीत होती!... तिचा मत्सर करायचं या पोरीला काय कारण? ... का बायकांचा स्वभावच मत्सरी! ... असे विचार करीत मी राहुटीच्या तोंडाजवळ किती वेळ उभा राहिलो कोण जाणे.



२......

अंगाला गार वारा झोंबला तेव्हां माझ्या लक्षांत आलं कीं कमरेला चौकटीच्या चादरीची लुंगी आणि अंगांत अेक बिनबाह्यांचा 'बनिअम' घालून मी उभा होतों. मनगटावरच्या घड्याळांत पाह्यलं तो साडेआठ वाजायला आले होते. अजून दाढी, आंघोळ, जेवण, पोषाख सगळ्या गोष्टी उरकायच्या होत्या. माझ्या राहुटींत नोकर गॅसची बत्ती केव्हां ठेवून गेला तेंहि मला कळलं नव्हतं. मीं समोर पश्चिमेकडे पाहिलं तों नारळीच्या शेंड्यांच्या झुपक्यांतून चंद्र दिसत होता. तिकिटविक्रीच्या छपरीपाशीं जरा अंतरावर बँड वाजावयास सुरुवात झालेली मीं अैकली. मी झट्कन आपल्या राहुटींत शिरलों...

★ ★ ★

# ३

पायांत पेटंट लेदरचा काळा चकचकीत बूट, अंगांत उंची काळ्या सर्जेचा सूट, कडकडीत शुभ्र कॉलरला लावलेला फुलपांखरासारखा दिसणारा बो, आणि डोक्यावर काळ्या फरची उंच टोपी, असा सर्कसच्या वेळेचा माझा ठरलेला पोषाख करून तयार झाल्यावर नोकरानं आणून ठेवलेले हार मारुतीच्या तसबिरीला आणि छत्र्यांच्या फोटोला मीं घातले, मारुति आणि हिंदी सर्कसच्या धंद्याचे आद्य संस्थापक छत्रे हीं आम्हा सर्कसवाल्यांचीं उपास्य दैवतं मानलीं जातात. यांची पूजा करून यांचे आशीर्वाद घेतल्याशिवाय आम्ही रोजच्या खेळाच्या वेळेस तंबूवरच्या आपल्या जागीं कधीं हजर होत नाहीं. त्या दोन दैवतांपुढें मी भक्तिभावनं डोळे मिटून उभा राहिलों. मीं आपल्या मनानं रोज म्हणण्यासाठीं एक प्रार्थना तयार केली होती, ती म्हटली, छत्र्यांचं मनोमय स्मरण केलं. जय बलभीम असं किंचित् मोठ्या आवाजांत पुटपुटलों, आणि मीं डोळे उघडले. वळून पाहिलं तों राहुटीच्या दारांत टोनी उभा होता.

तिशीच्या सुमाराचा, कमावलेल्या शरीराचा. पण उंचीमुळें सडपातळ वाटणारा, भुऱ्या केसांचा, लालसर गौर वर्णाचा, मोठा देखणा पोरगा होता

हा टोनी. त्याची आई अिटालियन होती, आणि बाप रशियन होता असं तो सांगत असे. खरी वस्तुस्थिति काय होती देव जाणे. सर्कसमध्यें खेळणारीं हीं माणसं आपल्या जातकुळीच्या काय वाटेल त्या गप्पा सांगतात. कित्येकदां स्वतःच्या वंशाचा आणि आईबापांचा देखील त्यांना नीटसा पत्ता नसल्या-मुळें या भटक्यांना कांहीं तरी हकीगत रचून सांगावी लागते हेंहि खोटं नाहीं. आणि त्यांच्या कुटुंबाच्या अितिहासाच्या खरेखोटेपणाशीं आम्हांला काय करा-वयाचं असतं ? चोख काम घ्यावं रोख दाम द्यावेत अशा धोरणानं आम्ही नेहमीं वागतों. शिवाय, या टोनीकडं पाहिलं कीं राशियन आणि अिटालियन रक्त त्याच्या नसानसांत खेळत असावं असं वाटे.

" काय टोनी ? " मीं कांहींसं आश्चर्यानं विचारलं. कारण त्यानं माझ्याकडे यावं अशी ही वेळ नव्हती.

" थोडं काम होतं आपल्याशीं " टोनी पुटपुटला. त्याची इंग्रजी भाषा मोडकी तोडकी असे, आणि जरा नाकांत बोलण्याची त्याला संवय असे.

मीं म्हटलं, " तूं पहातोसच कीं मी आतां फार घाईत आहे. तुझं काम उद्यां सकाळीं मला सांगितलंस तर चालत असेल—"

" तसं कसं चालेल ? " तो म्हणाला " आत्तांच तुम्हाला सांगितलं पाहिजे असं तांतडीचं काम आहे माझं. "

मीं एक सिगरेट पेटविली आणि सिगरेटची डबी त्याच्यापुढें करून म्हटलं, " सांग. "

त्यानं सिगरेट नको असं मानेनं सांगितलं, व माझ्याकडे हळूंच वर पाहून तो म्हणाला, " आजच्या खेळांत माझं आणि लिझीचं काम झालं नाहीं तरी चालेल कां ? "

हें ऐकून मी एकदम दचकलों. एखादे वेळेस तो अथवा लिझी फार बीमार असली, किंवा त्यांच्या मोटारसायकलीपैकीं एखादी नादुरुस्त असली कीं मग आम्ही त्या दिवसांच्या खेळांतून त्यांचं काम गाळीत असूं. त्यांचा आमचा जो करार झाला होता त्यांत त्याला अशी सवलत देणारं कलम होतं. योग्य आकस्मिक कारणासाठीं काम करण्याचं नाकारण्याचा त्याला हक्क होता.

परंतु आजच्या खेळांत अगदीं शेलकीं शेलकीं कामं दाखविलीं जातील अशी जाहिरात आम्हीं केली होती. खेळाच्या सुरुवातीच्या आधींच अर्धा तास लोकांची एवढी तुफान गर्दी तंबूवर लोटली होती कीं तिकीटविक्री बंद करावी लागणार असं दिसत होतं. लष्करी आणि मुलकी खात्यांतील बड्या बड्या अंमलदारांना मी मुद्दाम आमंत्रण देऊन बोलावलं होतं. त्यांच्या मोटारी येऊं लागतील तेव्हां त्यांचं स्वागत करण्यासाठीं स्वतः प्रवेशद्वाराजवळ हजर रहावयास हवं म्हणून मीं जामानिमा करून निघालों होतों. आणि आतां हा टोनी विचारीत होता—

मीं कांहीं बोललों नाहीं. परंतु हें तूं काय भलतंच विचारतोस अशा अर्थानं मीं त्याच्याकडे पाहिलं, आणि थोड्या वेळानं मीं त्याला विचारलं, "काम न करण्याजोगी काय अडचण आली आहे ?"

माझी नजर चुकवीत तो म्हणाला, "लिझी म्हणते तिच्या पोटांत भयंकर दुखूं लागलं आहे. तिला फार अशक्तपणा वाटूं लागला आहे. आणि तिला भीति वाटते कीं कामाच्या वेळेस—"

मीं म्हटलं, "हात्तिच्या ! येवढंच ना ? मालकांची गाडी मी तुला देतों. लिझीला घेऊन डॉक्टर सिंग यांच्या बंगल्यावर जा. त्यांचा आपल्यावर लोभ आहे. मालकांच्या ड्रायव्हरला त्यांचा बंगला माहीत आहे. ते लिझीला तपासून उत्तम औषध देतील. अगदीं फिकीर करूं नकोस. चल माझ्या बरोबर—" मीं त्याचा दंड धरून निघण्यासाठीं अेक पाऊल पुढें टाकलं.

पण जागेवरून न हालतां टोनी म्हणाला, "अं हं ! डॉक्टरकडे जायला नको."

"तें कां ?

"काका, तुम्ही मला क्षमा केली पाहिजे," तो मान खालीं घालून म्हणाला. "मीं तुमच्याशीं खोटं बोललों. माफ करा."

"म्हणजे काय ?"

"लिझी आजारी आहे असं मीं तुम्हांला सांगितलं, पण तें खोटं आहे. आजच्या खेळांत ती काम करीत नाहीं म्हणते याचं खरं कारण निराळंच आहे."

मी त्याच्याकडे आणखीच आश्चर्यानें पाहूं लागलों.

तो म्हणाला, " लिझी भाविक आहे. मूर्ख आहे म्हणा वाटलं तर. पण आज काम केलं तर कांही बर वाइट होईल अशी धास्ती तिनं घेतली आहे. "

" म्हणजे काय ? " मघाचाच उद्‌गार माझ्या तोंडून पुन्हां बाहेर पडला.

टोनी सांगूं लागला, " कॅथॉलिक माणसं फार धर्मभोळी आणि भाविक असतात हें तुम्हांला कदाचित् माहित असेल. मंत्रतंत्रांवर आणि शकुनांवर त्यांचा फार विश्वास असतो. लिझीला एका ज्यू साधूनं एक मंतरलेला ताईत दिला होता. तो नेहमीं तिच्या गळ्याभोंवतीं असे हें तुम्ही पाहिलंच असेल. तो ताईत आपलं नेहमीं संकटांपासून रक्षण करतो अशी तिची श्रद्धा होती. आज दुपारीं त्या ताईताचा सोनेरी फांस निखळला आणि तो दुरुस्त करून आणाय-साठीं म्हणून तिनं आंघोळीच्या वेळेस ताईत आपल्या उशाखालीं ठेवला होता. तो ताईत आतां कांहीं केल्या सांपडत नाहीं. कुठें नाहींसा झाला आहे हें कळत नाहीं. आणि लिझी म्हणते ताईत गळ्यांत नसतांना काम केलं तर तिचं किंवा माझं किंवा दोघांचंहि कांहीं तरी बरं वाईट होईल. ताईत नाहींसा झाला हा तिला मोठा अपशकून वाटतो. तिनं भलतीच धास्ती घेतली आहे. जिवावरचीं कामं करणाऱ्या माणसानं दिल टाकला कीं तें फार वाईट हें तुम्ही जाणतां. म्हणून म्हणतों, आजच्या खेळांत—"

मी एकीकडे टोनीचं बोलणं ऐकत होतों, आणि दुसरीकडे त्याला काय उत्तर द्यावं याचा विचार करीत होतो. त्याचं वाक्य पुरं होण्यापूर्वींच मीं त्याला म्हटलं,

" हें बघ टोनी, लिझीची मनःस्थिति मी ओळखूं शकतों. पण खरं म्हणजे तूं तिची समजूत घातली पाहिजेस. भोळ्या समजुतीखातर काम करीत नाहीं असं कसं बरं म्हणतां येईल ? तुझ्या आमच्या करारांत योग्य कारणासाठीं तुझं काम गाळण्याबद्दलचं कलम आहे खरं, परंतु मंत्राचा ताईत हरवला हें कांहीं योग्य कारण नव्हे. आजच्या खेळांत तुझं आणि लिझीचं काम न होऊन कसं बरं चालेल ? लोक काय म्हणतील ? पाहुणे काय म्हणतील ? आज तुझं आणि लिझीचं काम होणं फार अगत्याचं आहे. जा ! लिझीची समजूत घाल, आणि–"

"पण काका—"असं कांहीं तरी तो बोलूं लागला; पण मी जरा रागाच्या आणि अधिकाराच्या स्वरांत म्हटलं, "तुझं कांहींएक मी ऐकणार नाहीं. तुझं आणि लिझीचं काम आज झालंच पाहिजे येवढंच मला कळतं."

आणि तो जागचा हलतो कीं नाहीं हें पहाण्याची फिकीर न करतां मी भराभर पावलं टाकीत तंबूच्या प्रवेशद्वाराकडे निघालों.

★ ★ ★

## ४

पुनःपुन्हां माझ्या मनांत येई टोनीच्या राहुटींत जावं आणि त्याला लिझीची समजूत घालतां आली नसेल तर आपण तिला समजुतीच्या चार गोष्टी सांगाव्या. खेळ बरोबर वेळेला सुरू झाला होता. बहुतेक सारे आमंत्रित मोठे लोक आले होते. इतर प्रेक्षकांची मनस्वी गर्दी उसळली होती. यादीप्रमाणें सारे नंबर एका मागोमाग एक होत होते तंबूच्या बाहेरच हिंडतां हिंडतां केवळ कानांवर पडणाऱ्या बँडच्या गतीवरून आंत कोणता नंबर चाललेला आहे तें मला ओळखतां येत होतें, आणि टाळ्यांचा कडकडाट कोणाच्या कामाच्या वेळेस झाला, व विदूषकाची कोणती गंमत पाहून लोकांत हास्याची लाट उठली, तेंहि मला समजत होतं. चाबकाच्या फटक्याची तऱ्हा आणि मालकांच्या तोंडचा इशाऱ्याचा शब्द ऐकला कीं कोणत्या घोड्याचं कोणतं काम ते घेत होते तें मीं सांगू शकत होतों. ज्याप्रमाणें नाटक रंगत चाललेलं आहे कीं पडत चाललेलं आहे तें नेहमींच्या जाणत्या माणसाला बाहेर उभं राहून देखील आंतल्या टाळ्या-हंशावरून सांगतां येत त्याप्रमाणेंच सर्कसच्या खेळाची सुद्धां गोष्ट आहे. नाटकाच्या रंगभूमीप्रमाणेंच सर्कसच्या रंगणामधील रंगदेवता देखील लहरी असते. ती केव्हां

आणि कोणत्या कारणानं अप्रसन्न राहील अगर प्रसन्न होईल तें कोणाला सांगतां येणार नाहीं केवळ गर्दी खूप असली कीं खेळ रंगतो असं नाटकाच्या प्रयोगाबद्दल अगर सर्कसच्या खेळाबद्दल म्हणतां येणार नाहीं...परंतु आज आमचा खेळ अगदीं सुरुवातीच्या सिंगल बारांच्या कामापासून रंगला होता, आणि प्रत्येक कामाबरोबर ती रंगत सारखी वाढत गेली होती. सारे प्रेक्षक अगदीं विलक्षण खुशींत आले होते ही गोष्ट मला बाहेर देखील स्पष्ट समजत होती. मधेंच एकदां तर मिलरसाहेब लांब लांब टांगा टाकीत बाहेर आला; मी कोणाशीं तरी बोलत उभा होतों तें पाहून माझ्याजवळ आला, आणि पोटांतला आनंद मावत नसल्याप्रमाणें फुललेल्या चर्येनं मला म्हणाला,

" दौलतराव, मला अगदीं मनापासून तुमचं अभिनंदन केलं पाहिजे. मागच्या खेपेपेक्षां या खेपेस तुमची सर्कस किती तरी अधिक प्रेक्षणीय आहे. मी आणि माझी बायको दोघेंहि अगदीं खूष आहोंत. "

मीं म्हटलं, " तुमचं हें बोलणं ऐकून मला फार आनंद होतो. कलकत्त्यास नाताळांत मोठं प्रदर्शन होणार आहे. ती संधि साधून आम्हीं कलकत्त्यास मुक्काम टाकणार आहोंत. आमचा खेळ लोकाना आवडेल ना ? "

तो म्हणाला, " हें काय विचारतां ? "

मीं त्याला म्हटलं, " तुमच्यासाठीं ड्रिंक मागवूं काय ? "

तो म्हणाला, " नको नको, थँक यू मला राहवेना म्हणून फक्त तुमचं अभिनंदन करावयास आलों. प्रत्येक काम झालं कीं वाटत होतं, तुम्हाला भेटून आनंद व्यक्त करावा. पण लगेच दुसरं काम सुरूं होई आणि मी जागेवर बसून राही. पण आत्तांच त्या पोरीचं ट्रॅपीझवरचं काम पाहिलं, आणि मग मात्र मनाशीं म्हटलं, आतां तुम्हाला भेटलंच पाहिजे. "

मला थोडंसं हंसूं आलं. तो कोणाच्या कामावर येवढा खूष झाला होता तें मीं ओळखलं होतं. मी कां हंसलों तें मिलरसाहेबाच्या लक्षांत आलं असावं. त्यानं विचारलं, " तुमची ही हरिणी ट्रॅपीझवरचं काम केव्हां करूं लागली ? मागच्या खेपेस ती हें काम करीत नव्हती ! तिला कोणी शिकविलं हें काम ? "

मी किंचित् हंसलों, " हें पहा मिलरसाहेब " मी म्हणालों " सर्कशींतलं

आयुष्य म्हणजे एक धकाधकीचा मामला आहे. अमुक काम आपल्याला कोणी तरी शिकवील आणि मग आपण तें करूं असं म्हणून सर्कशीच्या रंगणांत खेळणाऱ्या लोकांचं चालत नाहीं. ज्याच्या अंगांत धमक असते, धाडस असतं तो सदा कोणतं तरी नवं काम हस्तगत करीत असतो. तें हस्तगत करण्याचा राजरस्ता ठरलेला नाहीं. ही हरिणी मोठी हुशार आहे. नवी नवी विद्या कोणाकडून कशी शिकावी याचं तिला उपजत ज्ञान आहे. ट्रॅपीझच्या कामांतला मुख्य मास्तर दादू नांवाचा आहे. त्याच्याकडून हें काम ती केव्हां शिकली हें मला माहीत नाहीं. गेले सहा महिने ती हें काम करीत आहे, व आतां दर आठवड्याला आम्हीं तिला चाळीस रुपये देतों येवढं मला माहीत आहे..."

"मोठी हुशार मुलगी आहे म्हणायची" तो मधेंच उदगारला; आणि मग माझ्या खांद्याला ओढून मला थोडं बाजूला नेऊन माझ्या कानांत तो म्हणाला, "दौलतराव, आणखी एक गोष्ट सांगूं कां तुम्हाला ?"

हें विचारतांना त्यानं मला चिमटा घेतल्यासारखं केलं. कांहीं तरी विनोद करण्याची लहर स्वारीला आली होती. मीं उत्सुकतेनं म्हटलं, "सांगा."

कानांत कुजबुजण्याच्या आवाजांत तो म्हणाला, "त्या पोरीविषयीं जो प्रश्न मीं तुम्हांला सकाळीं विचारला होता त्याचं उत्तर मला मिळालं. खुब्र-सुरतीच्या ऐन भरांत ती आली आहे ! आपण अगदीं फिदा आहोंत त्या पोरीवर. मी जातीनं मुसलमान नाहीं याचं मला फार वाईट वाटतं. नाहीं तर मीं सरळ शादी करून टाकली असती तिच्याशीं." तो खो खो करून हंसत सुटला व माझ्या हातावर टाळी मारून तंबूकडे परतला.

त्याच्या त्या विनोदी बोलण्याचं मला इतकं हंसू आलं होतं कीं कांहीं वेळ जागच्या जागीं स्वतःशींच हंसत मीं उभा राहिलों...आजच्या खेळाला विशेष रंग चढला होता यांत शंकाच नव्हती. हा रंग आणखी वाढत जाणार होता आणि टोनी–लिझीच्या कामानं त्यावर कळस चढणार होता...माझ्या मनांत आलं, पण लिझी कामाला तयार झाली कीं नाहीं कोणास ठाऊक ? झाली नसेल तर आपण तिला भेटून तिची समजूत घातली पाहिजे...पण पुन्हा विचार केला, तिची समजूत काढण्यासाठीं आपण तिच्याकडे जाणं बरं नव्हे. सर्कशीं-

तल्या खेळाडूंना संतुष्ट आणि प्रसन्न ठेवायचं असतं, परंतु मालक किंवा मॅनेजर वेळ प्रसंगीं आपली मनधरणी करतात असं त्यांना कधीं वाटून देऊन चालत नाहीं. त्यांच्या अंगीं चढेलपणा येऊं देऊन उपयोगाचा नसतो...

मी कांहीं वेळ जागच्याजागीं रेंगाळलों. मधेंच एक दोनदां मुख्य प्रवेशद्वारांत उभं राहून रंगणांत नजर टाकली. मालक कुत्र्यांचं काम घेत होते. लोक खूष होते. नंतर आमचा रुंद पुठ्याचा लाल घोडा एकटाच रंगणांत फिरूं लागला. त्याच्या पाठीवर बसून, उभं राहून, काम करणारा छोटू हलवाई यात्रेकरूंच्या गबाळ्या वेषांत एका हातांत लोटा दुसऱ्या हातांत सोटा अशा थाटांत प्रविष्ट होतांच लोक हंसूं लागले. हा रुंद पुठ्याचा घोडा आमच्या मालकांच्या विशेष प्रीतींतला होता. असा एक घोडा सर्कशींत नेहमीं हवा असतो. पाठीवर कामं करणाऱ्या खेळाडूचे इशारे ओळखण्याइतका तो हुशार असावा लागतो, व त्याची पळण्याची चाल विशेष लयबद्ध आणि संथ असावी लागते. आमचा हा लाल 'चकोर' नांवाचा घोडा म्हणजे नमुनेदार घोडा होता. इतकं देखणं लयदार चालीचं शहाणं जनावर क्वचित् मिळतं...

अखेरच्या टोनी–लिझीच्या कामाला जेव्हां दोन तीन नंबरांचाच अवकाश राहिला तेव्हां मला राहवेना. कामाच्या वेळचा पोषाख करून लिझी तयार झाली आहे कीं नाहीं तें आतां पाहिलंच पाहिजे असं माझ्या मनांत आलं. मी लिझीची भेट घेणार नव्हतों. पण मी मनाशीं विचार केला, तिच्या राहुटीकडे चक्कर टाकावी आणि अदमास घ्यावा.

म्हणून वळसा घालून तंबूच्या मागच्या बाजूस गेलों. काम संपून परत आलेले घोडे पागेंत बांधले गेले होते. मालीश करणारे नोकर त्यांचीं अंगं रग-डीत होते. कुत्र्यांपुढें खाण्याची परळं ठेवलीं होतीं. ज्यांचीं कामं आटपलीं त्या खेळाडूंनीं तंग चड्डया आणि गंजिफ्राक अंगावरून उतरले होते, व दोघां चौघांच्या घोळक्यानीं बसून ते धूम्रपान करीत होते. वाघ सिंहांच्या डरकाळ्या जोरानं चालल्या होत्या...टोनी–लिझीच्या राहुटीकडे मी दुरूनच नजर टाकली.. फार जवळ न जातां मला अदमास घ्यायचा होता. आणि मला अदमास

घ्यायचा आहे हें कोणालाहि कळूं द्यायचं नव्हतं. जरा पंचायतींत पडल्याप्रमाणें मीं जागच्या जागीं घोटाळलों...

पण तितक्यांत यशोदा माझ्या दिशेनं येत असलेली मला दिसली. ही यशोदा पूर्वी सर्कशींत कामं करीत असे. पण तिला दम्याचा विकार झाल्यापासून ती श्रमाचीं कामं करीनाशी झालेली होती. मूळची ती तासगांवची म्हणजे मालकांच्या गांवची. त्यामुळें त्यांचा तिच्यावर लोभ होता. सर्कशींतल्या खाशा मंडळींच्या खाण्यापिण्याची व्यवस्था ती संभाळीत असे, व शिवाय काम करणाऱ्या मुलींवर जरूर ती देखरेख ठेवीत असे. मालकांनीं तिचा पगार पूर्वीप्रमाणें चालूं ठेवला होता. ती वयानं कांहीं मोठी नव्हती. पण आम्ही सारे तिला थट्टेनं मावशी म्हणत असूं आणि एखाद्या मावशीप्रमाणें तिची आम्हां सर्वांशीं प्रेमळ वागणूक असेहि...

ती जवळ आली तेव्हां तिला मीं हलुंच म्हटलं, " मावशी, माझं एक काम कर. लिझीच्या राहुटीच्या एखाद्या भोकांतून आंत बघ, अन् ती आपल्या कामासाठीं तयार होत आहे कीं नाहीं पहा. "

तिनं आश्चर्यानं विचारलं, " कां ? "

" मग सांगेन, तूं आधीं बघून ये. " असं म्हणून मीं तिला जवळ जवळ ढकललं.

ती बघून आली व मीं वांकून तिच्या तोंडाशीं कान नेला तेव्हां ती म्हणाली, " लिझी कामाच्या वेळचे कपडे घालीत आहे. "

" ठीक " असं म्हणून मीं निघालों.

तिनं माझा कोट ओढला व उजव्या हाताची खूण करून हलकेंच विचारलं, " कां ? "

" आत्तां नको विचारूंस " असं म्हणून मीं पुढच्या दाराकडे गेलों. माझ्या मानेवरचं एका मोठ्या काळजीचं ओझं दूर झालं होतं. आवारांतल्या एका टेबल जवळच्या खुर्चीवर मीं जाऊन बसलों. नोकराकडून सोडा मागविला. सोडा घ्याल्यावर एक दोन ढेंकरा दिल्या. माझ्या नाकातोंडांतून गॅस गेला तेव्हां बरं वाटलं. डोक्याची टोपी काढून टेबलावर ठेवली, सिगरेट पेटविली,

झुरके घेतां घेतां माथ्यावरच्या आभाळाकडे नजर टाकली. चमचमणाऱ्या चांदण्या पाहून मनांत विचार आला जणूं अंतरिक्षांतल्या सर्कसच्या रंगणांत खेळ करणाऱ्या दिव्य अप्सरांच्या नितंबांवर तंग चढलेल्या निळ्या चड्ड्यां-वरच्या चमकदार टिकल्याच मी पहात आहे. मोठ्या खुषीनं मी कांहीं वेळ त्यांकडे पहात राहिलों. आणि मग खुर्चीवर मान टाकून मीं डोळे मिटले.

* * *

# ५

मला किती वेळ डुलकी लागली कोण जाणे. पण जागा झाल्याबरोबर बँडची जी गत कानांवर आली ती ऐकतांच मी एकदम खुर्चीवरून उठलों, टेबलावर पडलेली टोपी डोक्यावर चढविली, आणि घाईघाईनं तंबूकडे गेलों.

टोनी आणि लिझी जाड मजबूत पोलादी पट्टयांच्या बनविलेल्या गोलांत मोटरसायकलींवर फिरूं लागलीं होतीं. दोन्ही सायकलींचा फट् फट् फट् असा मोठ्यांदा आवाज होत होता, सायकलींच्या रबरी टायर्स पोलादी पट्टयांवरून सरकल्यामुळें होणारा आवाज त्यांत मिसळत होता. तो प्रचंड गोल संभाळून धरण्यासाठीं चहुंबाजूंनीं ताणून लावलेल्या दोरखंडासारख्या जाड जाड लोखंडी तारा हादरे बसून वरखालीं होत होत्या. फट् फट् फट् फट् आणि घर्रर्रर्र असा कांहींसा कर्कश व कांहींसा गंभीर संमिश्र आवाज साऱ्या तंबूंत भरून राहिला होता, आणि त्या आवाजाला बँडवरची गत साथ देत होती. भिंगऱ्यांप्रमाणें फिरणाऱ्या सायकलीवरच्या टोनी आणि लिझी यांच्या आकृतींवर नजर ठरत नव्हती. तंबूंतले हजारों लोक आ वासून स्तिमित नजरेनं त्याकडे बघत राहिले होते. बँडवरची लयबद्ध स्वरमाला, सायकलींचा फडफडाट, आणि एखाद्या

भोंवऱ्यांतून उठावा तसा त्या प्रचंड गोल पिंजऱ्यांतून उठणारा घर्रर्रर्र असा नाद ! आणि दिव्यांच्या झगझगाटांत पहाणाऱ्याची नरजबंदी व्हावी इतक्या वेगानं फेऱ्या घालणाऱ्या टोनी-लिझीच्या आकृती ! प्रेक्षकांच्या मनाची त्या-वेळेस कशी मंत्रमुग्ध अवस्था झाली असेल तें मी ओळखूं शकत होतों.

माझ्या मनांत एकदम आलं, खरं म्हणजे टोनी-लिझीचं हें काम चालू असतांना सबंध तंबूत एकदम अंधार करून विद्युतदीपांच्या प्रकाशाचा झोत फक्त गोल पिंजऱ्यावर पडेल असं करायला हवं. असं केलं तर थरारून टाकणाऱ्या या दृश्याची परिणामकारकता किती तरी पटीनं वाढेल...पण या साठीं गॅसच्या बत्त्या काय कामाच्या ? विजेची रोषणाई पाहिजे...मी मनाशीं म्हणालों, ही कल्पना मालकांना उद्यां सांगायची, आणि कलकत्त्याच्या मुक्कामांत अंमलांत आणण्याची खटपट करायची...

बँडवरची गत वाढलेल्या लयींत वाजूं लागली. फट् फट् फट् फट् आणि घर्रर्रर हे दोन्ही आवाजहि लयींत होऊं लागले. गोल पिंजऱ्यांतल्या त्या दोन मोटारसायकली आतां ताशीं वीस मैल वेगानं फिरूं लागल्या. टोनी आणि लिझी अेकमेकाला चुकवून फेऱ्या काढीत होतीं. अकराव्या फेरीच्या वेळेस टोनी आणि लिझी यांची मध्यावर गांठ पडत असे. टोनी तिला तिच्या सायकलवरून अलगद ओढून नेत असे. ती अेखाद्या फुलासारखी त्याच्या खांद्यावर चढली कीं तिनं मोकळी सोडलेली तिची मोटारसायकल आधीं मिळालेल्या वेगाच्या भरांत पांच सात वेळां पिंजऱ्याच्या चक्रांत फिरत असे. व शेवटीं खालीं तळाशीं पडत असे. या साऱ्या क्रिया अेखाद्या ठरीव गणिताप्रमाणें नेहमीं घडत असत. त्यांत कधीं फरक पडत नसे... सात ... आठ ... नऊ... दहा... ! अतां पुढच्या फेरींत टोनी लिझीला ओढून घेणार होता. बँडवरची गत बंद झाली होती. फक्त ड्रमवर टिपरीचा टर्रर्रर्र असा आवाज होत होता....मी सहज मिलरसाहेबाशेजारीं बसलेल्या डेझीकडे नजर वळवली. आणि डेझीच्या सौंदर्याकडे डोळे भरून पहाण्याच्या अिच्छेनं मीं माझी नजर स्थिर केली न केली तोंच—

एक हृदयभेदक किंकाळी हवेंत तरंगली ! डेझीनं मान चटकन् खालीं

करून दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेतलेलं मला दिसलं. प्रेक्षकांपैकीं कित्येक लोक एकदम उभे राहिले ! रंगणाच्या समोरच्या टोंकाकडे उभे असलेले आमचे मालक पिंजऱ्याकडे धांवलेले मला दिसले !

डोळ्याचं पातं लवतं न लवतं तोंच या सगळ्या गोष्टी अेकदम घडल्या !

मीं वळून पाहिलं तों मला लिझी टोनीच्या खांद्यावर दिसली नाहीं. ती पिंजऱ्यांत खालीं पडली होती व घरंगळत होती. तिनं सोडलेल्या सायकलीनं एक फेरी काढलेली मीं पाहिली. नंतरच्या फेरींत सायकल वेगांत येऊन धाडकन् लिझीच्या डोक्याला थडकली. पोटावर आणि पाठीवर उलट सुलट होत लिझीचा देह पिंजऱ्याच्या तळाशीं पोंचला ! सायकल तिच्या अंगावर जाऊन आदळली !

बँड केव्हांच बंद झाला होता ! तंबूंतले सारे लोक आपापल्या जागीं उठून उभे राहिले होते. सर्कशींतले सारे नोकर धांवून आले होते. लोकांची वांकडी तिकडी गर्दी उसळून देऊन चालणार नव्हतं. आधीं पिंजऱ्यांतून लिझीला बाहेर काढायला हवी होती. शक्य तितक्या उंच आवाजांत लोकांना उद्देशून मीं ओरडलों, " खामोश ! खामोश ! "—आणि पिंजऱ्याकडे धांव घेतली !

●●●

# १

लिझीला अपघात होऊन ती मेली तो दिवस मला पक्का आठवतो. आमच्या सर्कसचा मुक्काम त्या वेळेस बेगमपेठला होता. कुठल्याशा तरी फंडाला त्या रात्रीचा खेळ दिलेला होता. माणसांच्या गर्दीनं तंबू तुडुंब भरलेला होता. रंगणाजवळच्या खुर्च्यांवर सुंदर थाटबाज पोषाख केलेली निवडक श्रीमंत माणसं दिसत होतीं. त्यांत काळेभोर सूट केलेले साहेब आणि पायघोळ झगे घातलेल्या, दंड आणि गळ्याखालचा उराचा पुष्कळसा भाग उघडा टाकलेल्या मडमा होत्या. सहा दिवसांपूर्वी दर्जीकडे टाकलेली एक नवी पँट मीं संध्याकाळीं घेऊन आलें होतें. लिझी तसली पँट घालीत असे. पण तिला ती मुळींच शोभत नसे. लिझी सुंदर होती असें कोण म्हणत असतील ते म्हणोत. नकटी आणि फोडेल्या तोंडाची अशी ती होती. पण तिला आणि टोनीला मिळून आठवड्याला अडीचशें रुपये मिळत असत. आणि ती शर्ट काय, जाकिट काय, पँट काय, लहर लागेल तशी कपड्यांची चैन करीत असे. माझे आठवड्याचे चाळीस रुपये माझा बाप घेत असे. त्याच्या चिकट मुठींतून पैसा काढायचा म्हणजे मोठी मुष्कील असे. पण सतत महिनाभर हट्ट करून, रडारड आदळआपट करून शेवटीं गुलाबी साटणीची पँट मीं शिवून घेतली होती. लिझीपेक्षां मला तसली पँट हजारपटीनं अधिक शोभेल याची मला खात्री होती. ती पँट घातलेली मी दिसलें कीं लिझीचा चेहरा कसा उतरेल तें मला पाहायचं होतं...ती पँट

घालून टोनीच्या दृष्टीस मी पडलें कीं तो वळून वळून माझ्याकडे पाहील या कल्पनेचा मला आनंद होत होता. संध्याकाळपासून या आनंदांत मी होतें. माझ्या ट्रॅपीझवरच्या कामाच्या वेळेस दादू मास्तरबरोबर मीं नाचत बागडत प्रवेश केला तेव्हां मला नेहमींसारखें कृत्रिम हंसावं लागत नव्हतं. आपोआप हंसूं फुटत होतं.

खेळण्यासाठीं रंगणांत प्रवेश करतांना आम्ही मुद्दाम कोणाकडे बघत नाहीं. परंतु एखादे वेळेस असं होत कीं रंगणालगतच्या खुर्चीवरच्या एखाद्या माणसाशीं सहज नजरानजर होते, आणि मग जणूं त्या पहिल्या नजरेंत कांहीं तरी अर्थ असल्याप्रमाणें डोळ्याला डोळा वरचेवर भिडूं लागतो. त्या रात्रीं असंच झालं. खेळ पहिल्यापासून रंगत चालला होता. मी माझ्या स्वतःच्या आनंदामुळें खुषींत होतें. दादू मास्तरबरोबर रंगणांत जाऊन उभी राहिलें, आणि हंसत मुजरा करतांना माझी आणि डाव्या अंगाकडच्या बाजूला बसलेल्या एका साहेबाची दृष्टादृष्ट झाली. जणूं पूर्वीची ओळख असल्याप्रमाणें तो हंसला. मला थोडंसं शरमल्यासारखं झालं पण खुद्कन् जास्तच हंसूं आलं. दादू मास्तरानं माझ्या मांडीला हाताची हलुंच थापटी मारून इशारा दिला. ट्रॅपीझच्या दांडीवर चढण्यासाठीं सोडलेल्या दोराकडे मी अलगद पावलं टाकीत धांवलें.दोन्ही हात उंच करून दोर पकडला त्या वेळीं दंडाच्या पोकळींतून माझी नजर गेली तों तो गोरा साहेब माझ्याकडे बघून हंसत होता असं मला दिसलं. मला पुन्हां खुद्कन् हंसूं आलं. पण लगेच मी सरासरा चढून वर गेलें आणि ट्रॅपीझच्या दांडीवर बसलें मग बाकीच्या साऱ्या गोष्टींचं भान मी विसरलें. समोरच्या दांडीवर दादू चढून बसला. दांडीला पाय अडकवून तो लोंबकळूं लागला. मीहि दांडीला पाय अडकवून झोके घेऊं लागलें. क्षणापूर्वी माझ्या दृष्टीला खालीं लोकांच्या चेहऱ्यांचा जो समुद्र पसरलेला दिसत होता तो दिसेनासा झाला. समोर झुले घेणाऱ्या दादूच्या नजरेचा आणि माझ्या नजरेचा किरण मी साधूं लागलें. त्याच्या आवाजाच्या ठरलेल्या इशाऱ्यापलीकडे मला कांहीं ऐकूं येईनासं झालं. झुल्यावरून सुटून हवेंतून झेंप घेऊन मी गेलें, आणि दादू मास्तरच्या बोटात माझीं बोटं गुंतलीं. कामाच्या मस्त आनंदाची शिरशिर माझ्या अंगभर उठली. मी सारं जग विसरून गेलें...

कधीं नव्हे असा टाळ्यांचा कडकडाट माझ्या कानीं आला...काम संपवून खालीं उतरलें आणि मुजऱ्यासाठीं खालीं वांकलें तों पुन्हां त्या साहेबाची आणि माझी नजरानजर झाली. तो आतां अगदीं उघड उघड मला म्हणून मान झुकवीत होता, टाळी वाजवीत होता, आणि हांसत होता. मींहि मग कशाची पर्वा केली नाहीं. सरळ मुद्दाम त्याच्यासाठीं म्हणून डावा हात हवेंत उंच केला, हंसलें, आणि मग मात्र पाठ फिरवून जी पळालें ती तडक माझ्या राहुटीकडे गेलें संध्याकाळपासून मनांत भरलेला आनंद आतां अगदीं पोटांत मावेनासा झाला होता...

माझा बाप दारू घेत बसला होता. मीं त्याला म्हटलं, " मला दे थोडी." तो रागानं म्हणाला, " थोबाड फोडूं काय तुझं ?" मी हसलें आणि कपडे उतरूं लागलें. आतां मला पुन्हां नंबर नव्हता. थोड्या वेळानं माझा बाप खाटेवर निजला आणि घोरूं लागला. मीं हळूंच बाटलींतील थोडी दारू ग्लासांत काढली आणि पिऊन टाकली. घसा सुरीनं कापल्यासारखं मला वाटलं. मी भ्यालें. एक ग्लासभर पाणी गटागटा प्यालें. मी कॉटवर अंग टाकलं तेव्हां मला वाटूं लागलं मी तरंगतें आहे. उद्यांचा दिवस उजाडतो केव्हां आणि ही गुलाबी साटणाची पॅंट घालून मी मिरवायला निघतें केव्हां असं मला झालं होतं...

तितक्यांत तंबूकडे मोठा ओरडा झालेला मीं ऐकला. जरा वेळानं कानोसा घेतला तों आजूबाजूच्या राहुट्यांतले, पागेकडचे, शिकारखान्याकडचे लोक तंबूकडे धांवत आहेत असं मला वाटलं. मी घाबरून ताडकन् उठलें. मीं माझ्या बापाला गदगदां हालविलं. पण तो जागा होईना, मग मीं एकटीनंच राहुटीबाहेर धांव घेतली. तंबूच्या दाराजवळ गेल्याबरोबर मला कळलं कीं लिझीला मोठा अपघात झाला होता. ती जगण्याची आशा नाहीं असं जो तो कुजबुजत होता. तें ऐकल्याबरोबर मीं एकदम दोन्हीं हातांनीं तोंड झांकून घेतलं, आणि रडूं लागलें. माझ्या मनांत पहिला विचार आला तो हा कीं लिझीबद्दल मीं मनांत नेहमीं आकस ठेवला होता त्याबद्दल देव मला कधीं क्षमा करणार नाहीं.

★ ★ ★

# २

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं माझा बाप दारूची बाटली काढून खाटेवर बसला, तेव्हां मी चटकन् पुढें झालें आणि तो बाटलीचं बूच उघडणार इतक्यांत ती त्याच्या हातून मीं हिसकून घेतली. " माणूस आहेस कीं जनावर आहेस ? " मीं रागानं म्हटलं. " आजच्या दिवस प्याला नाहीस तर काय होईल ? "

" आजच्या दिवस ? आज दारू पिऊं नये असं काय झालं ? " असं म्हणून माझ्या हातांतली बाटली हिसकून घेण्यासाठीं त्यानं हात पुढें केले.

मीं त्याला जोरानं मागं ढकललं आणि म्हटलं, " काय झालं आहे तें तुला कळत नसेल तर मीं सांगूनहि कळायचं नाहीं. पण आज तुला दारू पिऊं देणार नाहीं मी. माझ्याशीं झोंबाझोंबी करूं लागलास तर बाटली राहुटीबाहेर फेंकून देईन किंवा खाटेवर आपटून फोडून टाकीन. मागें सर आणि बैस मुकाट्यानं. आज कुणाला अन्न सुद्धां गोड लागत नाहीं. आणखी तुला दारू प्यावीशी वाटते ? जो तो दुःखांत चूर झाला आहे, आणखी तूं—"

" लिझी मेली म्हणून मला दुःख झालं नाहीं असं तूं का समजतेस ? "

तो म्हणाला, " मला दुःख झालं आहे म्हणून तर आणखीच दारू घ्यावीशी वाटते आहे आज मला. "

दारुड्याच्या तोंडीं शोभणारी ती भाषा होती. पण त्याच्याशीं अधिक वाद घालण्यांत कांहीं अर्थ नव्हता. " वाटूं दे, पण आज तुला पिऊं देणार नाहीं मी " असं म्हणून मी दूर झालें.

माझा बाप अर्धवट स्वतःशींच म्हणाला, " तुमचीं साऱ्यांचीं हीं वाईट वाटणीं किती दिवस चालतात तें मी पाहीनच. चार दिवस हुंदके द्याल, लांब तोंड करून बसाल. मग सगळ्या गोष्टी पहिल्यासारख्या करूं लागाल. सर्कसचा खेळ लिझीसाठीं थांबणार नाहीं. उद्यां पुन्हां सुरू होईल. दिवे लागतील, बँड वाजूं लागेल, तुम्ही सारींजणं चड्ड्या गंजीफ्रॉक घालून, तोंडं रंगवून रंगणांत खेळाल. कांहीं थांबायचं नाहीं... "

असं बडबडत त्यानं आपलं अंग खाटेवर टाकलं.

मला त्याच्या बोलण्याचा राग आला. पण दुसरें दिवशीं मला वाटूं लागलं, त्याचं बोलणं खोटं होतं काय ?...नेहमींच्या वेळेस दिवे लागले, तंबू माणसांनीं भरला, बँड वाजूं लागला, मी कामाच्या वेळचा माझा पोषाख अंगावर चढवूं लागलें, बाहेरच्या आवारांतून आणि तंबूंतुन नोकरांच्या धांवपळीचे, प्रेक्षकांच्या हंसण्याचे, टाळ्यांचे आवाज माझ्या कानावर येऊं लागले. सर्कसचा खेळ लिझीसाठीं थांबला नाहीं. टोनी-लिझीचं काम आतां होणार नव्हतं, पण बाकीचे सारे नंबर पार पडणार होते. सर्कसच्या तंबूवरच्या आमच्या त्या जगांत सकाळपासून तों पहांटेपर्यंतचे सगळे व्यवहार पहिल्यासारखेच चालू झाले होते. लिझी मेली म्हणून कांहीं फरक पडल्याचं दिसत नव्हतं...

पण दिसत नव्हतं असं तरी कसं म्हणायचं ? वरवर बघितलं तर दिसत नव्हतं. पण जरा जास्त खोल पाहिलं तर लिझी मेल्यामुळें पडलेला फरक पावलों पावलीं दिसण्यासारखा होता. निदान मला तरी तो दिसत होता. टोनी आपल्या राहुटींत जो पडून राहिला होता, तो एखाद्या बेहोषींत पडलेल्या माणसाप्रमाणें. खाणंपिणं कांहीं नकोसं झालं होतं त्याला. माणसं त्याच्या समाचाराला जात, पण तो तोंडावरचं पांघरूण देखील दूर करीत नसे,

आणि त्यानं तें दूर केलंच तर राहुटीच्या कापडाकडे नजर लावून तो बघत रहात असे. त्याचं दुःख कशानं कमी होईल असं दिसत नसे. आम्ही सारीं माणसं तरी काय वरकरणी खात होतों, पीत होतों, आपापले खेळ करीत होतों, शिणलेलीं अंगं खाटेवर टाकीत होतों, पण लिझी मेली ही गोष्ट आम्ही विसरूं शकत नव्हतों. त्या गोष्टीची चर्चा दोन तीन दिवसांनीं बंद झाली, तरी देखील तिचा विसर कांहीं आम्हांला पडला नाहीं. आमच्या बोलण्यावर, हिंडण्याफिरण्यावर, बसण्याउठण्यावर कुणी तरी एखादं जड काळं छत घातल्यासारखं झालं होतं. त्या छताच्या माराखालीं आम्ही सारींजण वावरत होतों. ही झाली आम्हां नोकर माणसांची गत. पण मालकांचीदेखील अशीच अवस्था झाली होती. अंगांत गडद काळा सूट आणि डोक्याला उंचा भर-जरीची टोपी अशा थाटांत दोन्हीं हातांत दोन चाबूक घेऊन, त्यांचे काड काड इशारे देत व नाठाळ घोड्यांच्या नजरेला नजर लावून त्यांना काबूंत ठेवीत घोड्यांचीं कामं ते घेऊं लागले कीं त्यांच्या नेहमींच्या रुबाबांत कांहीं कमी नाहीं असं वाटे, पण खेळाच्या वेळचं रंगणांतलं हें सोंग सोडलं तर बाकीच्या वेळांत ते कसे सुंद मनानं इकडे तिकडे हिंडत ते मला दिसत होतं. दौलतराव काकांना तर अगदीं भलताच धक्का बसल्यासारखा दिसत होता. त्यांचं नेहमींचं थट्टेचं बोलणं, हंसणं अगदीं पार नाहींस झालं होतं. खेळाच्या वेळेस ते फक्त सुरुवातीलाच तंबूवर हजर रहात, आणि मग आपल्या राहुटींत जाऊन पडत. जणूं त्यांच्या हातून घडलेल्या एखाद्या चुकीमुळें लिझीला अपघात होऊन ती मेली होती असं त्यांना वाटत असल्याप्रमाणें त्यांच्या दुःखाचा प्रकार दिसत होता. ही गोष्ट आम्हीं एकमेकांत बोलतहि होतों. पण असं काय घडलं होतं तें आम्हाला कुणालाच कळणं शक्य नव्हतं...

सर्कसचे खेळ बंद पडले नव्हते, पण आमच्या जगांतली रोषनी नाहींशी झाली होती. मुक्काम हालवून दुसऱ्या गांवीं गेल्याखेरीज बेचैनीची ही हवा नाहींशी व्हायची नाहीं हें ओळखून दौलतराव काकांनीं बेगमपेठचा मुक्काम आठ दिवस आधींच उठविला. पुढच्या मुक्कामाच्या शहरीं ठरलेल्या तारखेच्या आधीं जातां येत नव्हतं, म्हणून मधल्याच एका लहानशा गांवीं जायचं त्यांनीं

ठरविलं. रेल्वेनं न जातां सडकेनंच आम्ही निघालों. एके दिवशीं दुपारीं बेगम-पेठचा मुक्काम आम्हीं हालविला. जंगली जनावरांचे पिंजरे, हत्ती, घोडे, तंबू-राहुट्यांचे खटारे, माणसांनीं व सामानानं भरलेल्या बैलगाड्या, असा आमचा भला जंगी ' कारवान ' पुढच्या मुक्कामाकडे जाऊं लागला.

* * *

## ३

हळुंहळूं लिझीचं मरण आम्ही विसरूं लागलों. आमची खेळीमेळीचीं बोलणीं, हंसणीं, खाणींपिणीं सुरूं झालीं. टोनी बेगमपेठेपासूनच सर्कस सोडून जाण्याच्या गोष्टी बोलूं लागला होता. पण दौलतराव काकांनीं त्याला जाऊं दिलं नव्हतं. तो अजूनहि आमच्याबरोबरच होता. आणि तो सुद्धां अगदींच आपल्या राहुटींत पडून राहण्याऐवजीं आमच्यांत मिसळून बसूं बोलूं लागला होता. मात्र लिझी गेल्याबद्दलचं दुःख तो एकीकडे विसरूं लागला होता तर दुसरीकडे तो निराळ्याच एका कारणानं अस्वस्थ होऊं लागला होता. आमच्याशीं बोलतांना तो वरचेवर म्हणे, " कामावांचून स्वस्थ माशा मारीत मी किती दिवस बसूं ? असं बसण्याची मला संवय नाहीं. " दौलतराव काकांनीं त्याचा पगार चालूं ठेवला होता. पण काम न करतां पगार घेणं त्याला पसंत नव्हतं. " रोज रात्रीं मरणाच्या हद्दीवर फेरफटका करण्याचं मला व्यसन लागलं आहे. त्या फेरफटक्यावांचून आयुष्यांत मजा नाहीं वाटत " असं तो वरचेवर म्हणे. कधीं कधीं तो आम्हांला सांगे, " जिला शिकवून माझ्याबरोबर काम करायला तयार करतां येईल अशी जोडीदारीण मिळविली पाहिजे मला. अशी मुलगी

कुठें मिळते का पहायसाठीं मी फिरतीवर जाईन म्हणतों. पण दौलतराव काका मला जाऊं देत नाहींत. त्यांनीं निराळीच कल्पना काढली आहे—" एवढंच म्हणून तो गप्प बसे आम्ही एखादा प्रश्न खोदून विचारला तर त्याला आवडणार नाहीं हे आम्हांला माहीत होतं म्हणून आम्हीदेखील गप्प रहात असूं. दौलतराव काकांची निराळी कल्पना कोणती होती त्याचा पत्ता आम्हाला कांहीं लागेना...

पण अेके दिवशीं संध्याकाळीं त्या लहानशा गांवाच्या बाजारांत जरा फेर-फटका करून मी तंबूकडे परत आल्यावर टोनी समोरून आला, आणि माझ्याजवळ आल्यावर तो म्हणाला, " जरा नदीकांठच्या बाजूला जाऊं या काय फिरायला ? " मी किंचित् घोटाळलें असं पाहून तो पुढें म्हणाला " अजून दिवस पुष्कळ आहे. सुर्यास्ताच्या आंत आपण तंबूकडे परत जाऊं शकूं." तरी देखील मीं चटकन् हो म्हटलं नाहीं तेव्हां त्यानं सांगितलं, " इथल्या नदीकांठा-वरची शोभा मला फार आवडते. इथून जाण्यापूर्वी ती शोभा एकदां पोटभर पहावी अशा विचारानें चक्कर टाकायला निघालों आहे मी. "

मीं म्हटलं, " पण सर्कस तर आणखी आठ दिवस इथ रहाणार आहे. "

तो म्हणाला, " होय सर्कस रहाणार आहे. पण मी उद्यां जायचं ठरविलं आहे. "

" छे ! " मीं चटकन् म्हटलं.

तो माझ्याकडे पाहून किंचित् हंसला व म्हणाला, " छे काय करतेस ? मी उद्यां जावं म्हणतों. आणि म्हणून इथल्या या रम्य नदीकांठावर एकदां अखेरचं हिंडायसाठीं मी निघालों आहे. येतेस माझ्याबरोबर ? "

सर्कसमध्यें खेळणाऱ्या मुलींना स्वातंत्र्य नसतं. त्यांचे आईबाप किंवा पालक त्यांच्यावर अगदीं सक्त नजर ठेवीत असतात. त्या वयांत आल्या म्हणजे तर या नजरेला अगदीं पहाऱ्याचं स्वरूप येतं. गटागटांत बहिणी भाऊ असले तर तीं सारींजण एकमेकांच्या सहवासांत मोकळेपणानं रहातात. पण एका गटांतला पुरुष दुसऱ्या गटांतल्या मुलीशीं कांहीं सलगीचं वर्तन करील हें शक्य नसतं. खेळ आटपल्यावर रात्रीं मुली निजल्या कीं राहुटींचीं तोंडं

जाड दोरखंडांनीं आंवळून घेऊन पक्का बंदोबस्त केल्यावांचून आईबाप किंवा पालक निजत नाहींत...मी अशाच शिस्तींत वाढलें होतें. वेळ प्रसंगीं माझ्या बापावर मी अधिकार चालवीत असे, किंवा तो माझा एकादा हट्ट ऐकत असे. पण पुरुषाशीं वागतांना मीं स्वैरपणा केला तर तो मला फोडून काढल्याशिवाय रहाणार नाहीं हें मला माहीत होतं. लोकांची कदाचित् अशी कल्पना असेल कीं सर्कसमध्यें इतके तरुण पुरुष आणि तरुण बायका एकत्र असतात, खानदानी कुलाशिलाचे विचार करण्याचं त्यांना कारण नसतं. तेव्हां तिथें स्वैराचाराला पुष्कळ मोकळीक असेल. पण खरी स्थिति फार निराळी असते. कोंडवाड्यांतल्या शेळ्या आणि आम्ही सर्कशींतल्या तरुण मुली सारख्याच. वांकडं पाऊल कुणी टाकायचं म्हटलं तरी तें शक्य नसतं. सर्कशींतलीं जनावरं जशीं धाकांत असतात त्याप्रमाणें खेळणाऱ्या मुलीहि असतात. सर्कशीचं सारंच राज्य चाबकाच्या धाकावर चालतं म्हणा ना...मधून मधून एखादी मुलगी या धाकाला भीक घालीनाशी होते आणि तिला जें हवं तें करते ती गोष्ट निराळी! पाणी चहुंबाजूंनीं दाबून ठेवलं कीं त्याची कुठल्या तरी भेगेंतून चिळकांडी उडतेच! मग दाबाचं कांहीं चालत नाहीं...

पण मी अजून माझ्या बापाच्या धाकांत होतें. त्यामुळें "येतेस माझ्या-बरोबर?" असं टोनीनं पुन्हां विचारलं तेव्हां माझ्या तोंडून उत्तर चटकन् बाहेर पडलं नाहीं. त्याला नकार देण्यासाठीं कोणती सबब सांगावी त्याचा मी मनाशीं विचार करूं लागलें. पण तितक्यांत मनांत आलं, हा टोनी उद्यां सर्कस सोडून जाणार म्हणतो. याची आणि माझी आतां पुन्हां कधीं कशाला भेट होणार? आणि पुन्हां त्याच्या मनाला थोडं तरी समाधान देण्याची संधि मला कशाला मिळणार आहे?...शिवाय लिझी जिवंत असतांना मीं तिचा हलक्या मनानं उगीच मत्सर केला, ही गोष्ट माझ्या मनाला लिझी मेल्यापासून सारखी खात होती. मला पुष्कळदां वाटे माझ्या वागण्याबद्दल लिझीची माफी मागतां येईल तर किती बरं? पण ती गोष्ट अर्थातच शक्य नव्हती. ज्यामुळें टोनीला थोडसं तरी बरं वाटेल असं कांहीं मीं केलं तर मीं लिझीचा केलेला

अपराध थोडा कमी होईल असंहि मला वाटलं. मग मीं त्याला चटकन् म्हटलं, " येतें, चल. "

फार समाधान झाल्याप्रमाणें तो हंसला व म्हणाला, " थँक यू. "

मीं त्याच्याबरोबर चालूं लागलें. थोड्याच वेळांत गांवाची वस्ती मागं पडली, आणि आम्ही मोकळ्या जागीं आलों. पण नदीच्या खोलगट भागाकडे जाणारा रस्ता टोनीला सांपडला नाहीं आणि जिथून खालीं नदीचं पाणी दिसत होतं, पण जो इकडे तिकडे पसरलेल्या प्रचंड शिळांनीं व त्यांच्यामधून वाहणाऱ्या पाण्याच्या ओहोळांनीं भरला होता अशा उंचवट्याच्या भागांतून आम्ही चाललों होतों. मध्येंच आम्ही अशा ठिकाणीं येऊन अडकलों कीं पुढें जाणं अशक्य होतं. पलीकडे जायचंच म्हटलं तर एका मोठ्या कातळावरून आठ फुटांच्या अंतरावर असलेल्या दुसऱ्या एका निमुळत्या कातळावर उडी मारणं भाग होतं. उडी चुकली तर त्या दोन कातळांच्या मधून खालीं दहा पंधरा फुटांवर ज्या अणकुचीदार खडकांच्या तुकड्यांतून पाण्याचा एक ओहोळ खळळत होता त्यावर माणूस पडणार होतं.

अलीकडच्या कातळावर उभं राहून मी टोनीला म्हटलं, " इथेंच बसूं या. " त्यानं मान हालविली आणि हंसत बोट उंच करून समोर दाखविलं. मीं पाहिलं तों पलीकडच्या अरुंद कातळापासून दहा बारा यार्डांच्या अंतरावर एक अगदीं तासून गुळगुळीत करून मुद्दाम मांडल्यासारखा काळाभोर फत्तर दिसत होता. एका झाडाच्या फांद्यांची छत्री त्यावर शोभत होती. सूर्याच्या लाल किरणांत त्या झाडाची हिरवीगार पालवी झळाळत होती. त्या फत्तराकडे बोट दाखवून टोनी म्हणाला,

" तिथें बसूं या, चल. "

मीं तोंडावर बोटं ठेवून म्हटलं, " तिथें ! तिथें जायचं तर उडी मारावी लागेल कीं. "

तो म्हणाला, " तुला भीति वाटते ? सर्कशींत कशाला खेळतेस ? "

मीं म्हटलं, " इतकी लांब उडी मला मारतां येईल असं नाहीं वाटत.

मधेंच पडलें तर मरेन. माझ्या बापाला दोन मुली होत्या. पण माझी बहीण मेली. आतां मी एकटीच आहे. आतां दुसरं कोणी नाहीं. तुला काय होतं ? "

त्यानं माझा हात एकदम घट्ट पकडला आणि म्हटलं, " हरिणी, कुणावर तरी पक्का विश्वास ठेवला कीं जिवावरचीं कामं सुद्धां माणसाला येतात, हें तर तुला कळतं कीं नाहीं ? ट्रॅपीझवर पहिल्यांदा चढलीस तेव्हा भीति नाहीं वाटली तुला ? पण दादू मास्तर म्हणाला असेल, बेटा डरो मत. त्याच्यावर विश्वास ठेवून तूं आपली जान त्याच्या स्वाधीन केली असशील. आणि तुला ट्रॅपीझवर खेळता येऊं लागलं असेल..."

माझ्या नजरेला नजर भिडवून तो बोलत होता. मी हं हं करून मान हालवीत होतें. तो माझा हात आणखीच दाबून म्हणाला,

" तसाच माझ्यावर विश्वास ठेवतां येणार नाहीं तुला ? "

एखाद्या मंत्रमुग्ध माणसाप्रमाणें मीं म्हटलं, " येईल. "

तो म्हणाला, " मीं जर तुला सांगितलं ही उडी सोपी आहे, तुला मारतां येईल, मार, तर तू बेशक मारशील ? " त्याच्या नजरेनं माझी नजर अगदीं पकडून ठेवली होती.

मीं म्हटलं, " बेशक मारीन. "

" शाबाश ! " असं म्हणून त्यानं माझा खांदा थोपटला. दुसऱ्याच क्षणीं तो मला सोडून दूर झाला, दहा वीस कदम मागं गेला, आणि धांवत येऊन कूद मारून पलीकडच्या निमुळत्या कातळावरून तो हंसत म्हणाला,

" पाहिलंस ? सोपं आहे ! मार उडी. ये ! " त्याच्या त्या ' ये ' शब्दाचा माझ्यावर विलक्षण परिणाम झाला. मीं वीस पंचवीस कदम मागं सरकलें, दौड मारली, आणि पलीकडच्या कातळावर झेंप घेतली ! टोनीनं मला आपल्या हातांत सांवरून धरलं आणि मला पुनःपुन्हां थोपटीत तो म्हणाला, " शाबाश ! शाबाश ! "

झाडाखालच्या फत्तरावर जाऊन बसल्यावर चेष्टेनं हंसल्याप्रमाणें हंसून तो म्हणाला, " पुन्हां एकदां उडी मारावी लागणार आहे. "

मीं हंसून म्हटलं, " एकदांच का, दहादां मारीन ! "

तो खूपच मोठ्यांदा हंसला. तितक्यांत समोरून वाऱ्याचा झोत आला, त्यानं त्या हंसण्याचा आवाज मागच्या टेकडीपर्यंत नेल्यामुळें तिकडून हंसण्याचा प्रतिध्वनि आला. त्या गोष्टीची मला फार मौज वाटली, आणि मी देखील हंसलें.

टोनी एकदम म्हणाला, " हरिणी ! एक गोष्ट सांगू का तुला ? "

मीं म्हटलं, " तुझ्या बायबलांतली नको सांगूस. दुसरी वाटेल ती सांग. "

तो म्हणाला, " तसली गोष्ट नाहीं सांगत. माझ्याबद्दल सांगतों. "

तो काय सांगणार त्याचा तर्क मला करतां येईना. मीं उत्सुकतेनं त्याच्याकडे पाहून म्हटलं, " मग सांग. "

तो म्हणाला, " मीं माझा बेत बदलला आहे. मीं उद्यां जाणार होतों पण जायचं नाहीं असं मीं आतां ठरविलं आहे. "

" आतां म्हणजे केव्हां ? "

" आतां म्हणजे आत्तांच " तो म्हणाला. " तूं उडी मारलीस तेव्हां. माझ्या शब्दावर विश्वास ठेवून तूं वाटेल तें जिवापलीकडचं काम करशील अशी माझी खात्री झाली आहे. माझ्याबरोबर मोटरसायकलवरचं काम करण्यासाठीं जिला तयार करतां येईल अशी मुलगी शोधायला मी जाणार होतों. पण आतां कशाला जाऊं ? तूं सांपडलीस मला ! माझं काम झालं. मोटरसायकलवरचं काम मीं शिकवलं तर तूं शिकशील काय ? "

क्षणभर मला वाटलं, मला हें स्वप्न तर पडत नाहीं ?...कारण खरं म्हणजे माझ्या मनांत कितीदां तरी आलं होतं कीं लिझीचं काम मी शिकतें, टोनीला मला शिकवायला सांगा, असं दौलतराव काकांना म्हणावं. हें म्हणायसाठीं मीं कितीदां तरी त्यांच्या राहुटीकडे गेलें देखील होतें. पण " तूं गाढव आहेस " असं म्हणून काका मला हांकून देतील अशी भीति वाटून दर वेळेस मी परत फिरलें होतें...आणि आतां माझ्या ध्यानींमनींदेखील नसतांना टोनी मला विचारीत होता, " मीं शिकवलं तर तूं शिकशील का ? "...क्षणभर मला वाटलं, मला हें स्वप्न तर पडत नाहीं ?...

★ ★ ★

# ४

' मोटरसायकलवरचं काम मी तुला शिकवीन ' हे टोनीचे शद्ब मीं प्रथम ऐकले तेव्हां अत्यानंदाखेरीज दुसरी कोणतीच भावना माझ्या मनांत नव्हती, आणि त्यामुळें मी अगदीं हुरळून गेलें. पण आश्चर्याची आणि आनंदाची पहिली लाट ओसरल्यानंतर माझं मन जरा थरकलं. जें मी शिकणार होतें तें किती अवघड होतं आणि तें मला साधेल कीं नाहीं याबद्दलचे विचार माझ्या मनांत येऊं लागले. पहाड चढतांना उन्हांत झळाळणारं सुंदर उंच शिखर दिसल्याबरोबर तिथें आपल्याला जायचं आहे या विचारानं माणसाला फार आनंद होतो. पण त्या जागीं जाणारी वाट किती भयंकर बिकट आहे तें त्याला दिसलं कीं त्याची छाती धडधडूं लागते. अशीच माझी अवस्था झाली. गुप्त धन ज्या ठिकाणीं लपविलेलं आहे ती जागाजर माणसाला कळेळ तर त्याला फार आनंद होईल, पण तो ठेवा हातीं येण्यापूर्वी किती कष्ट घ्यावे लागणार आहेत त्याची कल्पना करूं लागल्यावर माणसाची छाती जरा दबकेल, नाहीं कां? माझं तसंच झालं. माझ्या ध्यानींमनीं नसतांना टोनीबरोबर काम करण्याची संधि एकदम माझ्यासमोर येऊन उभी राहिली. ती पहातांच माझा

जीव हरखून गेला. पण त्या संधीचा उपयोग करून घेतांना मला जे कष्ट घ्यावे लागणार होते त्यांचा विचार जेव्हां माझ्या मनांत येऊं लागला तेव्हां माझ्या अंतःकरणांतला पहिला आनंद ओसरला. टोनी जें काम मला शिकविणार होता तें जिवावरचं काम होतं, आणि तें जर मला साधलं नाहीं तर माझ्या फजीतीला पारावर उरणार नाहीं, इत्यादि विचारांनी मी अगदीं अस्वस्थ होऊन गेलें. रात्री मला झोपदेखील नीट लागली नाहीं. सारखी या कुशीवरून त्या कुशीवर मीं लोळत होतें. माझ्या बापानं मला विचारावं, " का ग ? तुला झोंप का लगेना ? " मीं म्हणावं, " लागेल आतां. तूं निज. "

मोटरसायकल चालवायला मी चटकन् शिकलें. जमिनीवर चुन्याच्या पट्ट्या मारून काढलेल्या वर्तुळांतून फेऱ्या घेण्यांतहि मी लवकर पटाईत झालें. मग टोनी आणि मी दोघांनीं एकमेकाला चुकवीत त्या वांकड्या तिकड्या वर्तुळां-तून फेऱ्या मारीत रहाण्याचं अवघड काम टोनी माझ्याकडून करवून घेऊं लागला, त्यांतहि तयार होतांना मला त्रास झाला नाहीं. पण ही सारी तयारी झाल्यावर लोखंडी पट्ट्यांच्या गोलांत मोटरसायकल चालविण्यासाठीं मी जेव्हां पहिल्यांदा चढलें तेव्हां जें मी शिकणार होतें तें किती कठीण होतं त्याची मला कल्पना आली. माझे खरे कष्ट सुरूं झाले. पराभवाशीं झुंज सुरूं झाली. टोनीनं माझ्यावर रागवावं अशा वेळा येऊं लागल्या. मी चुकलें कीं " हरकत नाहीं, पुन्हां कर. येईल. आलं पाहिजे. " असं कांहीं तरी म्हणून तो मला चुचकारी, उत्तेजन देई. पण कधीं कधीं माझ्याकडून सारखी चूकच होत राहीं, मग तो माझ्यावर चिडे. तो म्हणे, " लिझीनं मला असा त्रास दिला नाहीं. तुझ्यापेक्षां ती फार हुशार होती. "

त्याचं तें बोलणें मला अगदीं आवडत नसे. ज्या दिवशीं लिझी अपघातानं मेली त्या दिवशीं मीं मनांतून तिच्याविषयीं नेहमीं आकस धरला या गोष्टीचं मला फार वाईट वाटलं होतं. नंतरच्या दिवसांत तर त्या आकसाचा लवलेशहि माझ्या मनात शिल्लक राहिला नव्हता. पण माझी व लिझीची तुलना करून तिच्या इतकी मी हुशार नाहीं असं टोनीनं म्हटल्याबरोबर तो मेलेला आकस पुन्हां

जिवंत होई. आणि टोनीचे शब्द मला कट्यारीसारखे लागत. मी उलट बोलत नसे. पण मनांतून वाटे बोलावं.

एकदां काम शिकतां शिकतां मी जोरानं पडलें, आणि मला धीर देण्या-ऐवजीं टोनी म्हणाला, " लिझी तुझ्यापेक्षां—" मीं त्याचे शब्द पुरे होऊं दिले नाहीं. माझं ढोपर भयंकर खरचटून त्यांतून रक्त निघत होतं, त्याची वेदना मला असह्य वाटत होती. आणि त्यांतच टोनीच्या तोंडचा लिझी हा शब्द ऐकतांच नेहमीप्रमाणें मला भान राखतां आलं नाहीं. मीं रागानं डोळे फाडून त्याच्याकडे पाहूं लागलें आणि म्हटलं,

" टोनी, पुरे झाल ! हें काम मला यायचं नाहीं ! मला शिकायचं नाहीं ! "

मी फणकाऱ्यानं दूर होऊं लागलें. त्यानं खसकन् माझा दंड धरून मला ओढलं. माझ्या कोंपराला धक्का लागला नसूनहि मी खोटंच ' आः ! ' असं केलं आणि रागान आरडलें,

" टोनी ! सोड ! जाऊं दे मला ! "

त्यानं एकदम खाडकन् माझ्या तोंडांत मारली आणि म्हटलं, " जातेस कुठें ? हें काम तुला शिकलंच पाहिजे ! "

मीं त्याच्याकडे क्षणभर डोळे रोखून पाहिलं. पण मग मला रडण्याचा एकदम हुंदका आला. मीं मान खालीं घातली, दोन्ही हातांनीं तोंड झांकलं.

टोनीनं मला एकदम जवळ घेतलं आणि थोपटल्यासारखं केलं. तो हळुंच म्हणाला, " फार लागलं ? माफ कर. मीं तुझ्या थोबाडींत मारायला नको होती. "

मीं खालच्या मानेनंच म्हटलं, " थोबाडींत दहा वेळां मार. मी सोशीन. पण— "

" पण काय ? "

मीं चटकन् मान वर केली व त्याच्या डोळ्याला डोळा लावून म्हटलं, " —पण लिझीचं नांव काढीत जाऊं नकोस ! " बोलतां बोलतां मला एक-दम रडूं आलं.

तो माझ्याकडे पहात राहिला व कांहीं तरी नवीन कळल्याप्रमाणें हलकेंच पुटपुटला, " अस्सं ! "

या प्रसंगामुळें म्हणा किंवा दुसऱ्या कशामुळें म्हणा, पण येवढं खरं कीं या-नंतर काम शिकण्याच्या बाबतींत माझी प्रगति झराझर व्हायला लागली. एखादी जादूची कांडी फिरल्याप्रमाणें मी चटाचट शिकूं लागलें. कोणतीहि गोष्ट मला अवघड वाटेनाशीच झाली. आम्हां सर्कसवाल्यांचा सर्वांत मोठा शत्रु म्हणजे भीति. अमुक गोष्ट आपणाला जमणार नाहीं अशी शंका मनानं घेतली कीं संपलंच सारं. दिल टाकला कीं शरीर काम देईनासं होतं. उलट शंकाकुशंका टाकून जें करायचं तें आपल्या आवाक्यांतलं आहे ही भावना पक्की झाली कीं अशक्य वाटणाऱ्या गोष्टी हात पाय आपो-आप करूं लागतात. दादू मास्तरांनीं मला ट्रॅपीझच्या कामांत तयार केलं तेव्हां हा अनुभव मला एकदां आला होता. आतां तो पुन्हां आला. मी बिनचूक काम करूं लागलें तेव्हां टोनीनं माझ्यावर रागावण्याचे प्रसंगहि येईनासे झाले. लिझीचं नांव त्याच्या तोंडून निघेनासं झालं. " शाबास " हा त्याचा शब्द मला वरचेवर ऐकायला मिळूं लागला. कितीदां तरी तो शब्द उच्चारतांना तो माझी पाठ थोपटी. त्याचा हात माझ्या अंगाला लागला कीं मला वाटे माझ्या अंगावरून फिरणारा त्याचा तो हात माझ्याशीं बोलतो आहे. त्याच्या हाताची ती भाषा समजली कीं माझ्या मनाची हुशारी एकदम हजार पटीनीं वाढत असे, आणि मग माझं काम अशा कांहीं सफाईनें होई कीं हें सारं मला येतं कसं याचं आश्चर्य वाटे...ज्या दिवशीं टोनी मला म्हणाला, " उद्या मालकांना आणि दौलतरावांना आपण दोघांनीं काम करून दाखवायचं. " त्या दिवशीं मला विलक्षण आनंद झाला. आणि काम पाहिल्यानंतर मालकांनीं जेव्हां माझी तारीफ केली तेव्हां आनंद पोटांत मावेनासा झाला. त्यामुळें मला रडूंच आलं. दौलतराव काकांनी तर मला इतकी शाबासकी दिली कीं त्यांनीं जेव्हां मला जवळ ओढलं तेव्हां मला वाटलं हें आतां आपल्या छातीशीं मला घट्ट धरणार. ते म्हणाले,

" माझी एक मोठी चिंता तूं दूर केलीस. तूं या कामांत तयार झाली

नसतीस तर मोठ्या प्रदर्शनाचा मोका साधून कलकत्त्यास मुक्काम टाकण्याचा बेत सोडून द्यावा लागला असतां. पण आतां ठरल्याप्रमाणें जायला कांहीं हरकत नाहीं. माझी एक मोठी चिंता तू दूर केलीस !"

दुसऱ्या दिवशीं त्यांनीं मला दर्जीकडे नेलं, आणि कामाच्या वेळीं घालण्यासाठीं माझ्या अंगचे उंची सुंदर कपडे शिवायला टाकले. दर्जीला त्यांनीं बजावलं, तीन दिवसांत कपडे मिळाले पाहिजेत. त्या वेळीं आमचा मुक्काम मयूरभंज संस्थानच्या राजधानींत होता. तिथून आम्ही खरगपूरला हालणार होतों, व तिथला मुक्काम आटपला कीं कलकत्त्याचा सीझन सुरू व्हायचा होता. मयूरभंजच्या राजेसाहेबांसाठीं जो खास खेळ होणार होता त्या खेळांत माझ्या आणि टोनीच्या मोटरसायकलच्या कामाचा नंबर पहिल्यांदा लावण्याचा बेत दौलतराव काकांनीं केला होता. म्हणून त्यांनीं दर्जीला बजावलं, तीन दिवसांत कपडे मिळाले पाहिजेत.

राजेसाहेबांसाठीं जो खास खेळ झाला, त्या खेळांतलं माझं काम पाहून राजेसाहेब खूष झाले. परंतु मी स्वतः त्या रात्रीच्या कामांत रंगून गेलें नव्हते. पहिल्यांदाच मीं काम केलं त्यामुळें मनाला थोडी धागधूग वाटत होती म्हणून म्हणा, किंवा फक्त राजेसाहेब, राणीसाहेब व त्यांचा लवाजमा येवढेच प्रेक्षक खुर्च्यांवर बसले होते, बाकी तंबूंत शुकशुकाट होता, लोकाची गर्दी, टाळ्या, शिट्या हें कांहीच नव्हतं म्हणून म्हणा काम करतांना मला मौज आली नाहीं. गोलांतून खालीं उतरून टोनीच्या हातांत हात घालून प्रेक्षकांना अखेरचा सलाम करतांना मी हंसलें. पण तें हंसणं मनापासूनचं नव्हतं. टोनीनं हळुंच माझ्या कानांत म्हटलं होतं, "शाबाश" तेवढाच काय तो माझ्या मनाला आधार वाटत होता. तो वगळला तर माझंकाम कसं काय झालं कोण जाणे अशा शंकेनं माझं मन अगदीं खट्टू होऊनगेलं होतं.

पण या सगळ्याचा वचपा दुसऱ्या दिवशीच्या जाहीर प्रयोगाच्या वेळेस निघाला. तंबू माणसांनीं फुलून गेला होता. अगदीं पहिल्या नंबरापासून खेळाला रंगत चढली होती. रंगणात होणारं प्रत्येक काम लोक झेलून धरीत होते. टाळ्या, शिट्या आणि हंसण्याचा खदखदाट यांच्या फैरी वरचेवर झडत

होत्या. एखाद्याला सांगितलं तर खोटं वाटेल, पण प्रेक्षक खुषींत असले कीं त्या खुषीचा परिणाम आम्हां खेळाडूंवरच नव्हे तर जनावरांवरसुद्धां होतो हें मी पाहून ठेवल आहे. कुत्रीं आपापलं काम करतांना अशीं कांहीं बागडतात आणि भुंकतात कीं जणू आम्हांला फार मजा वाटते असं त्यांना सागायच असत. हाच अर्थ घोड्याच्या डोळ्यांत, आणि ज्या तऱ्हेनं घट्ट आंवळलेल्या लगामाला घोडी मानेचे हिसके देतात त्या तऱ्हेत दिसूं लागतो. आमच्या मालकांना घोड्यांच्या मनांतली ही खुषीताबडतोब कळत असे, आणि मग घोड्यांना शिस्तींत ठेवण्याचा त्यांच्या डाव्या हातांतला चाबूक नुसताच आधातरीं धरला जाई, व उजव्या हातांतील लांब चाबकानं ते कडाड् कडाड् असा आवाज काढीत तो ऐकून वाटे, त्यांचा चाबूकदेखील आज मोठ्या खुषींत आला आहे. त्या दिवशीं प्रेक्षकांची आणि आमची सर्वांची खुषी अशीच पहिल्यापासून चढू लागली...इतर नंबर चाललेले असतांना प्रवेशद्वाराच्या झुलत्या पडद्यांतून मी वरचेवर आंत नजर टाकीत होतें, आणि आनंदानं आपल्या राहुटीकडे परत येत होतें. माझ्या आणि टोनीच्या कामाचा नंबर केव्हां येईल अशी घाई मला वाटूं लागली होती. आमच्या कामाच्या आधींचा नंबर सुरूं झाला हें बँडवर वाजआधींचा नंबर सुरूं झाला हें बँडवर वाजणाऱ्या गतीवरून मीं ओळखलं. घाईनं माझी छाती धडधडूं लागली. जिच्यावरच्या फुल्याफुल्यांसारख्या टिकल्या चमचमत होत्या अशी मखमलीची चड्डी आणि लाल रंगाची तंग रेशमी काचोळी घालून आरशापुढें अधिक वेळ थाबणं मला नकोसं वाटूं लागलं. तितक्यांत बाहेरून टोनीचा हलक्या आवाजांतला शब्द ऐकूं आला, "रेडी?" "यस" असा जबाब देऊन मी आरशापुढून दूर झालें व राहुटीबाहेर आलें टोनीच्या खांद्यापलीकडे आभाळांत चमकणाऱ्या दोन चांदण्या मला एकदम दिसल्या. टोनी मला हळुंच इंग्रजींत म्हणाला, "बक अप चाईल्ड!" मीं हंसलें. दुसऱ्याच क्षणीं आंत चालू असलेला नंबर संपला. आणि हंशा टाळ्या ऐकूंआल्या. दोन टेंगणीं तट्टं लगामानं धरून नोकरानीं बाहेर आणलीं. विदूषक हंसत खिदळत परत आले. बँड क्षणभर गप्प झाला. नंतर सावकाश लयींतली दुसरी गत सुरूं झाली. मनांत

मीं त्या गतीचे सूर काढले, "ट्रा लाऽ ला ! ट्रा ला ऽ ला ! ला ऽ ऽ !" माझ्या मनांत उत्साहाचं संगीत उसळतहोतं. टोनीच्या हातांत हात गुंतवून नाचत नाचत रंगणांत प्रवेश करून सलामीसाठीं मीं मान खालीं झुकविली त्याबरोबर टाळ्याचा कडकडाट झाला...आणि गोलांतलं काम संपून मी पुन्हां टोनीबरोबर रंगणांत उभी राहिलें आणि सलाम केला तेव्हां तर टाळ्यांची जी लाट उठली ती लवकर संपेचना. टोनीनं माझ्या डाव्या हाताच्या तळव्यावर आपलं बोट घांसून मला इशारा दिला, त्याचा अर्थ ओळखून मीं पुन्हां एकदा उजवा हात हवेंत फिरविला व मान झुकविली. त्याबरोबर संपत आलेली पावसाची सर पुन्हां जोरानं सुरूं होऊन छपरावर वाजावी त्याप्रमाणें टाळ्यांचा आवाज उसळला. मग पुन्हा एकदां सलाम करून आम्ही दोघं पळालों. मालक आणि दौलतराव काका दोघेहि दारावरच्या झुलत्या पडद्यापलीकडे उभे होते. मालक हंसून हळुंच म्हणाले, "शाबास" काकांनीं माझ्या ढुंगणावर हळुंच चापटी मारली व ते म्हणाले, "जिंकलीस पोरी"

तेव्हांपासून हा आनंद म्हणजे माझ्या मनाला मिळणारा एक रोजचा खुराक होऊन बसला. दौलतराव काकांनीं माझा पगार दहा रुपयांनीं वाढविला, व कलकत्त्याचा सीझन त्यांच्या कल्पनेच्या पलीकडे फायद्याचा झाल्यामुळें मला आणखी वाढ मिळून आठवड्याला साठ रुपये मिळूं लागले. पण हा आनंद माझ्या दृष्टीनं महत्त्वाचा नव्हता. मला अधिक पैसे मिळूं लागले म्हणून माझा बाप फार खूष झाला, आणि माझ्याशीं जास्त लाडीगोडीनं तो वागायला लागल्यामुळें मला जरा अधिक स्वातंत्र्य मिळूं लागलं. पण माझ्या मनाचा खरा आनंद यांत नव्हता. मी टोनीची जोडीदारीण झालें या कल्पनेचा आनंद मला सगळ्यांत जास्त वाटत होता. आमच्या सर्कशीचा मुक्काम कलकत्त्याहून हालला तेव्हां माझ्याइतकं सुखी माणूस आमच्या त्या छोट्या जगांत तरी निदान दुसरं नव्हतं.

पण सुखामागून दुःख कसं येतं पहा. का सुखालाच हलकें हलकें दुःखाचं रूप येतं कुणास ठाऊक ? स्वच्छ पाण्यानं भरलेल्या ग्लासांत आपल्याला न दिसलेला एखादा बारीक रंगाचा खडा असावा, तो खडा विरघळूं लागून

त्याच्या रंगाचे धागे हळुहळुं वर चढूं लागावे, अरे हा कुठला रंग असं आपल्याला आश्चर्य वाटावं, आणि मग आपल्या देखत देखत सारं पाणी रंगून जावं, तसं माणसाचं सुख पहातां पहातां रंग पालटतं कीं काय कुणास ठाऊक ? असंच होत असलं पाहिजे. कारण असं नसतं तर टोनीच्या सहवासांत जो आनंद मला मिळत होता त्यांत हळुहळुं असमाधानाचे धागे कशाला निर्माण झाले असते, आणि पहातां पहातां हें असमाधान मला सोसतां येऊं नये इतकं मोठं कशाला झालं असतं ?...कलकत्त्याहून आमचा मुक्काम हालला तेव्हां माझ्यासारखी सुखी मीच असं मला वाटत होतं. पण नंतर हळुहळुं या माझ्या सुखांतच कोणती तरी अशी गोष्ट आहे कीं जी मला बोंचते आहे असं मला वाटूं लागलं. तळपायांत रुतलेला कांटा इतका बारीक असावा कीं तो दिसूं नये, पण तो सारखा सलत मात्र रहावा, तसं कांहीं तरी होतं आहे असं मला वाटायला लागलं. कसली तरी ओढ मला बेचैन करीत होती. कसली तरी हुरहुर ! रात्रीं खाटेवर पडल्या पडल्या मीं स्वतःला प्रश्न विचारी, मी अशी अस्वस्थ कां ? मला काय हवं आहे ?...पण या प्रश्नांचं उत्तर मला सांपडत नसे...एका प्रसंगानं तें अकस्मात् मिळालं.

कलकत्त्याहून आम्हीं पाटण्याला आलों, अन् तिथून दरभंगा संस्थानच्या महाराजांचं बोलवणं आलं म्हणून तिकडे जायसाठीं निघालों. गाडीरस्त्यानंच जायचं टरलं, आणि दरभंग्याच्या वाटेवर ‘ शायदा ’ म्हणून एक तालुक्याचं गांव होतं तिथें आमचा मुक्काम झाला. अशा लहानशा गावांतले मुक्काम मोठे मजेदार असतात. मोठ्या शहरांतल्याप्रमाणें रोज दोन खेळ अशा गांवीं बहुधा होत नाहींत, त्यामुळें अर्धी सुट्टी असल्यासारखंच असतं. शिवाय मोठ्या शहरांतल्याप्रमाणें टोलेजंग इमारती, मोठमोठालीं जुनीं देवळं, परोपरींचा माल ज्यांच्या पुढच्या बाजूस आकर्षक रीतीनं माडलेला आहे अशीं दुकानं छोट्या गांवीं नसतात, पण यांच्याऐवजीं दुसऱ्या पुष्कळ गमती अशा लहान गांवीं असतात. दुसरं कांहींच नसलं तरी निदान स्वच्छंदानं हिंडायला मोकळे माळ असतात, शेतं असतात, नदीकांठ असतो, बागा असतात, आणि क्वचित् जो मुद्दाम जाऊन पहावा असा एखाद्या जुन्या किल्ल्याचा म्हणा, राजवाड्यांचा

म्हणा अवशेष असतो. शयदाला आल्यावर आम्हांला समजलं कीं या गांवीं शहाजहान बादशहाच्या एका सरदारानं बांधलेली प्रचंड विहीर पहाण्यासारखी आहे. या विहिरींत म्हणे त्यानं बंगला बांधला होता, व आपल्या प्रेमांतल्या बायकांना घेऊन तो या बंगल्यांत पुष्कळदां रहात असे. या सरदाराची जी सगळ्यांत लाडकी बेगम होती, तिचं नांव शयदा होतं. त्यानं तिच्यासाठीं ही पेठ प्रथम वसविली म्हणून या गांवाला पूर्वी शयदापेठ असं नांव होतं, आतां फक्त शयदा म्हणत असत. विहिरीला बंगल्याची विहीर म्हणत असत

ही प्रसिद्ध विहीर पहायसाठीं जायचा बूट कुणी तरी एकानं काढल्याबरोबर दहा पंधरा मंडळींची एक पार्टीच तयार झाली. बंगल्याच्या विहिरीवर अकरा साडे अकरा वाजतां जायचं, विहिरी भोंवतालच्या राईत वनभोजन करायचं, चार पांच तास करमणुकींत आणि दंगा-मस्तींत घालवायचे, असा बेत ठरला आणि आम्ही गेलों.

ती बंगल्याची विहीर म्हणजे खरोखरच एक पहाण्यासारखी चोज होती. तिचे ते एकंदर तीन मजले, विहिरीच्या मधोमध बांधलेले असूनहि ज्यांत पाण्याचा शिरकाव होत नव्हता असे छोटे छोटे महाल, त्या महालांचे दरवाजे, कमानी, रोषणाईसाठीं केलेल्या व्यवस्थेच्या आतां उरलेल्या फक्त खुणा, इत्यादि गोष्टी पाहून आम्हीं सगळीजणं चकितच होऊन गेलों. विहिरीचं पाणी तर असं कांहीं काळंभोर आणि स्वच्छ होतं कीं जणूं काचेचं भिंगच बसविलं होतं. त्याकडे पाहिल्यावर पोहण्याची इच्छा आम्हाला झाली. यशोदा मावशीच्या देखरेखीखालीं राईत स्वयंपाक तयार व्हायचा होता. खाना तयार व्हायला दोन तीन घटका तर सहज लागणार, तोपर्यंत कांही तरी गमतीचा उद्योग आम्हाला हवाच होता. कावळ्याच्या डोळ्यापेक्षांदेखील अधिक निर्मळ दिस-णाऱ्या या चार पांच पुरुष खोल पाण्यांत मजेनं डुंबण्यापेक्षां अधिक सुंदर कार्यक्रम दुसरा कोणता असूं शकणार? पोहायची कल्पना निघाल्याबरोबर आम्ही कपडे उतरायला सुरुवात केली. कुणीशी शंका काढली, "पण या कुव्यांत पोहायची परवानगी असेल ना?" पण लगेच दुसऱ्या कुणी तरी त्याला वेड्यांत काढून म्हणालं, "हिः! परवानगी नसायला काय झालं." ज्यानं

शंका काढली तो म्हणाला, " एख दे वेळेस पोहायचा हुकूम नसला म्हणजे ! रखवालदाराला विचारलेलं बरं." " कांहीं नको " असे दोघातिघांनीं उद्‌गार काढले. पण तितक्यांत रखवालदारच त्या ठिकाणी आला. त्याला विचारतां तो म्हणाला, " परवानगी वाटेल तेवढी आहे, पण या कुव्यांत कोणी उतरत नाहीं. आणखी तुम्ही देखील उतरूं नये हें चांगलं. " आम्ही विचारलं, " कां ? " तेव्हां त्यानं सांगितलं, " या कुव्यांत भूत आहे. आणि आंघोळ करणाऱ्याला तें झपाटतं अशी समजूत आहे. इथल्या या भूताच्या बाधेनं हिवताप येऊं लागून दहा वीस माणसं मेलीं, तेव्हांपासून या कुव्यांत आंघोळीला कोणी उतरत नाहीं. कुव्यांतलं पाणी स्वच्छ ठेवायची कामगिरी आमच्याकडे आहे पण आम्ही-सुद्धां या पाण्यांत कधीं आंघोळ नाहीं करीत. " रखवालदार निघून गेला. आमच्यात चर्चा सुरूं झाली, कुव्यांत उतरायचं कीं नाहीं. आम्ही सर्कशींतलीं माणसं धाडशी खरी. पण भुताखेतांच्या अगर चेटकाच्या गोष्टी मनांत आल्या कीं आमच्यासारखीं भित्रीं माणसं दुसरीं नसतील. कुव्यांतल्या त्या सुंदर पाण्यांत डुंबायचा विचार आमच्यापैकी बहुतेकांनीं सोडून दिला. पण " कसलं आलं आहे भूत आणि कसलं काय ? आणि असलं तरी आपल्याला काय कर-तंय ? " अस म्हणणारं कुणी तरी निघालंच; आणि एकानं धीटपणा दाख-विल्यावर दुसरा तयार झाला, तिसरा तयार झाला. अंगावरचे कपडे काढून ' बेदिंग सूट ' घालतां घालतां टोनी मला म्हणाला, " भितेस होय ? " त्या-बरोबर मीं कपडे उतरले आणि त्याच्याबरोबर सूर मारला !

रात्रीं मेकअप करायला बसलें तों मला हिंव भरणार असं वाटूं लागलं. अंगावर अेकदम कांटा उभा राहिला, हात थरथरूं लागला. रखवालदारानं सांगितलेल्या भुताच्या गोष्टीची मला एकदम आठवण झाली आणि मी मनांतून चरकलें. पण मी कोणाजवळ कांही बोललें नाही. ओठ दांतांखाली दाबून धरला आणि मनाशी म्हटलं ताप येतां कामा नये, नंबर व्यवास्थित पार पडलाच पाहिजे... नेहमींप्रमाणें मी आपलं काम व्यवास्थित कसं पार पाडलं तें माझं मलाच माहीत. पण काम आटपल्यानंतर मुजरा करून मीं रंगणाकडे पाठ फिरविली तेव्हा मला असं झालं होतं कीं केव्हां एकदां राहुटींतलं अंथरूण

गांठीन आणि अंगाला रग लपेटून घेऊन निजेन. तंबूच्याबाहेर आल्यावर नेहमींप्रमाणें माझा हात सोडून दूर होण्याऐवजीं तो घट्ट धरून टोनीनं मला हलकेंच विचारलं,

" तुझे हात किती कढत लागताहेत ? चांगलाच ताप भरला आहे तुला. आधीं सांगायचं नव्हेस. अंगांत असा ताप असतांना काम करणं बरं नाहीं. पुन्हां असा वेडेपणा करूं नकोस. ताप आलाय ना तुला ? खरं सांग ? "

मीं नुसती मान हालविली आणि राहुटीकडे धांवलें. टोनी माझ्या मागोमाग आला ही गोष्ट मीं खाटेवर अंग टाकल्याबरोबर त्यानं माझ्या अंगभर रग दाबून लपेटलं तेव्हां माझ्या लक्षांत आली. माझ्या गळ्यापाशीं रग खोचून लावतां लावतां तो म्हणाला, " थोडी ब्रँडी आणून देतों तुला. " तो गेला केव्हां आणि परत आला केव्हां तें मला धड कळलंसुद्धां नाहीं. मीं डोळे मिटले होते. " तोंड उघड, घे " हे त्याचे शब्द ऐकताच मीं घोंट घेतला, व डोळे उघडून त्याच्याकडे पाहिलं. ग्लास बाजूला ठेवून त्यानं विचारलं, " घाबरलीस ? "

मीं म्हटलं, " टोनी, मला कुव्यांतल भूत लागलं खास. आतां मीं मरणार ! "

" शीः ! वेडी तर नाहींस तूं. "

मीं झटकन् दुसऱ्या कोपऱ्यांतल्या खाटेकडे पाहिलं. माझा बाप डाराडूर झोंपला होता.

मी टोनीला विचारलं, " मीं मेलें तर तूं काय करशील ? "

त्यानं आपल्या उजव्या हाताच्या बोटांनीं माझं तोंड दाबल्यासारखं केलं आणि म्हटलं, " मी तुला मरूं देणार नाहीं. "

मीं चटकन् दोन्ही हात पांघरुणांतून काढले. त्याचा हात धरून माझ्या उजव्या गालाशी घट्ट धरला, आणि म्हटलं, " पुन्हां सांग. आत्तां बोललास तें पुन्हां बोल. "

त्यानं आपल्या मोकळ्या हातानं मला हळुंच मारल्यासारखं केलं आणि हंसत माझ्याकडे पाहिलं.

त्या क्षणीं इतके दिवस जें मला कळत नव्हतं तें एकदम कळलं. आतांशा कोणत्या असमाधानाचा मला त्रास होत होता तें त्या क्षणीं एकदम ध्यानांत आलं. माझ्या जीवाला कसली ओढ लागली होती तें मला समजलं...इतकंच नव्हे तर लिझी जिवंत असतांना तिचा मत्सर मीं कोणत्या कारणानं केला होता तें पूर्वी माझं मला कळलं नव्हतं, पण आतां एकदम कळलं. गेल्या कित्येक दिवसांतल्या माझ्या हुरहुरीचं कारण कोणतं त्याचा तर मला उलगडा झालाच, पण तें कारण फार पूर्वीपासून माझ्या मनांत खोल कुठें तरी होतं, ही गोष्टसुद्धां माझ्या लक्षांत आली...

मी कांहीं बोललें नाहीं, पण टोनीकडे पाहून हंसलें.

त्यानं विचारलं, " बरं वाटतं आहे ना आतां ? "

" फार " असं हलकेंच म्हणून मीं आपली जीभ ओंठांवरून फिरविली.

माझ्यापासून दूर होऊन त्यान ग्लासांत आणखी ब्रँडी ओतून माझ्या ओंठांशीं धरली आणखी म्हटलं " आणखी घे थोडी. "

मीं घेतली, त्याचा हात दोन्ही हातांनीं पुन्हां धरला, आणि डोळे मिटले.

तो केव्हां गेला तें मला समजलं नाहीं.

पण मला काय हवं होतं तें या प्रसंगानं मला समजलं, व तें मिळवायसाठीं माझी धडपड सुरू झाली.

मला हिवतापाच्या आणखी दोन पाळ्या आल्या. माझा व टोनीचा नंबर चार पांच खेळांत झाला नाहीं. मला कुव्यांतलं भूत लागलं अशा समजुतीनं यशोदा मावशीनं अंगारे धुपारे केले, मंतरलेली मुळी माझ्या दंडाला बांधली. या उपायांनीं म्हणा किंवा डॉक्टरनं इंजेक्शनं दिलीं म्हणून म्हणा माझा हिंवताप बंद झाला आणि दरभंग्याला जाण्यासाठीं आमचा मुक्काम हालला तों-पर्यंत मी बरी झालें आणि काम करूं लागलें.

दरभंग्याच्या मुक्कामांत एके दिवशीं दौलतराव काकांनीं मला मुद्दाम आपल्या राहुटीवर बोलावून घेतलं, आणि मी गेल्यावर थोडा वेळ इकडल्या तिकडल्या गप्पा करून ते मला म्हणाले, " किट्टू तुला घेऊन आमची सर्कस सोडून दुसरीकडे जायचं म्हणतो. "

तें ऐकून मी चकितच झालें. मीं म्हटलं, "त्याला दुसरीकडे जायचं असलं तर तो जाईल. मी नाहीं कधीं जाणार. तुमच्याकडे मी लहानाची मोठी झालें ही सर्कस म्हणजे माझं घर आहे. माझा बाप दुसरीकडे जायच्या गोष्टी कां बोलतो तें मला माहीत आहे"

"कां ?" त्यांनीं विचारलं.

मी हंसून म्हटलं, "काका, माहीत नसल्यासारखं विचारूं नका मला. कां तें तुम्हांलाहि माहीत आहे, यशोदा मावशीला माहीत आहे, आपल्यांतल्या पुष्कळ लोकांना माहीत आहे. माझ्या बापाचीं आणखी माझीं आतांशा वरचेवर भांडणं होतात, तीं काय कुणाला ऐकूं जात नसतील ?"

"भांडणं कशाबद्दल होतात ?"

मीं म्हटलं, "त्याला वाटतं मी अजून फ्रॉक नेसणाऱ्या लहान मुलीप्रमाणें त्याच्या शब्दांत रहावं. त्याचं म्हणणं मी टोनीबरोबर हिंडतां फिरतां कामा नये. त्याच्या राहुटींत जातां कामा नये. त्याला आमच्या राहुटींत येऊं देऊं नये. आतां तुम्हींच सांगा काका, हा त्याचा जुलूम कसा मानायचा ?"

ते म्हणाले, "जुलूम मानूं नकोस, पण डोकं अगदींच भडकूं देऊं नकोस. तुझ्यासारख्या तरुण मुली प्रेमांत सांपडल्या कीं संकटांतहि सहज सांपडतात. भलतीच चूक करशील आणि मग तिचे परिणाम भोगावे लागतील. तुझा बाप तुझ्याशीं भांडतो त्यांत अगदीं तथ्य नाहीं असं नाहीं. तुझ्यावर माझी किती ममता आहे हें तुला माहीत आहे. मलासुद्धां तुझी काळजी वाटते. तुला सांगावंसं वाटतं, पोरी, सांभाळ! चुकशील."

"काका अजून तरी मी चुकलें नाहीं."

हें म्हणतांना त्यांच्याकडे लावलेली माझी नजर एकदम खालीं झाली. कारण 'अजून चुकलें नाहीं' हे माझे शब्द जरी खरे होते, तरी ज्या गोष्टीला काका चूक म्हणत होते, ती मला तशी वाटत नव्हती, उलट ती गोष्ट घडावी म्हणून मी मनांतून अधीर झालें होतें.

हा अधीरपणा हाच माझा नवा मनस्ताप होता. माणसाच्या मनाचा काय चमत्कार आहे पहा. पूर्वी जेव्हां मनाच्या असमाधानाचं कारण मला कळत

नव्हतं तेव्हां मला वाटत असे कीं तें कारण एकदां समजलं कीं माझं असमाधान नाहींसं होईल. आतां मला तें कारण कळलं होतं, पण त्यामुळें मनाचा त्रास संपण्याऐवजीं वाढला मात्र होता. टोनी माझ्यावर फार ममता करीत होता. माझ्याविषयीं त्याला किती अभिमान वाटत होता, मी सुखांत आणि मजेत रहावं अशी त्याची केवढी इच्छा होती ते त्याच्या बोलण्याचालण्यांत पदोपदीं दिसत असे. परंतु एवढ्यावर संतुष्ट रहायला माझं मन तयार नव्हतं. कित्येकदां तो असे वागे कीं मला वाटे अगदीं माझ्या शब्दांत रहायला तो तयार आहे, मला तो कधींदेखील नाराज करणार नाहीं, त्याच्यांत आणि माझ्यात कसलंदेखील अंतर उरलेलं नाहीं. परंतु याच्या उलट कधीं कधीं अशा कांहीं चमत्कारिक रीतीनं तो वागे कीं मला वाटे मी भ्रमांत आहे, माझ्या मनाची त्याला पर्वा नाहीं, त्याच्यांत आणि माझ्यांत अजून पुष्कळ अंतर आहे. माणूस प्रेमांत सांपडलं कीं हें अंतर अगदीं नकोसं होतं. एकीकडे मला वाटे कीं टोनीनं माझ्यावर आपलेपणाचा अधिकार चालवावा, मी एखादी चूक केली तर त्यानं मला सपाटून रागं भरावं, कांहीं चांगलं केलं तर मला खूप शाबासकी द्यावी, माझ्यावर त्याची संपूर्ण हुकुमत असल्याप्रमाणें त्यानं अमूक कर अमूक करूं नकोस असं त्यानं मला म्हणावं; आणि दुसरीकडे मला वाटे, टोनीवर माझा एकटीचा अधिकार असावा, माझ्या लहरीप्रमाणें त्यानं वागावं, मी चुकलें तरी त्यानं माझं कौतुकच करावं, मी म्हणेन तिकडे चलावं, माझी मर्जी सदा संभाळावी. पुष्कळदां माझं मलाच वाटे या काय माझ्या मनाच्या चमत्कारिक वेगळ्या इच्छा. त्यानं मला एखाद्या गुलामासारखं वागवावं अशीहि माझी इच्छा होती; आणि त्यानं माझी ताबेदारी पत्करावी अशीहि होती! हा काय चमत्कार? परंतु हळुहळुं माझ्या लक्षांत येऊं लागलं की यात चमत्कार नव्हता. ज्या दोन इच्छा मला वेगळ्या वेगळ्या वाटत होत्या, त्या मुळीं दोन निरनिराळ्या नव्हत्याच. त्या दोहोंच्या बुडाशीं जी एकच मनाची ओढ होती त्या ओढीला कधीं या इच्छेचं तर कधीं त्या इच्छेचं रूप येत होतं. ती ओढ अशी कीं माझ्यांत आणि टोनींत अंतर म्हणून येवढंदेखील नसावं. माणूस प्रेमात सांपडलं कीं हें अंतर त्याला नकोसं होतं. ज्याच्यावर प्रेम जडलं

त्याला सर्वस्व देऊन टाकणं, आणि त्याचं सर्वस्व घेणं या दोन्ही गोष्टी मिळून प्रेम हें बनलेलं असतं. प्रेम म्हणजे देण्याची इच्छा कीं घेण्याची इच्छा, शरण जाण्याची इच्छा कीं जिंकण्याची इच्छा तें सांगणं खरंच कटीण आहे...

मी जेव्हां जेव्हां एकटी असे तेव्हां या विचारांनीं मन भारावून जात असे. आणि एकटी नसलें तरी त्या विचारांची खळखळ मनांत चाललेलीच असे, त्यामुळें कुणाशीं बोलावं असं वाटत नसे, कुणी बोलूं लागलं तर मी चिडखोर-पणानं उलट उत्तर देत असे. झोंपेंतून मधेच जाग आली की मग कांहीं केल्या डोळ्याला डोळा लागत नसे. आणि मग वाटे राहुटीबाहेर पडावं, मोकळ्या रानांत भटकावं, चांदण्यांच्या छताखालीं मातींत अस्ताव्यस्त पडावं, पहाटेचा गार वारा अंगावर घ्यावा, दंवानं भिजलेल्या गवतांत तोंड खुपसावं म्हणजे जीवाला अमळ बर वाटेल...असं करण्याचा मोह मी चार पांच वेळां टाळला. पण मग एके दिवशी मात्र खरोखरच खाटेवरून उटले, एक छोटी शाल डोक्याभोंवतीं व गळ्याभोंवतीं लपेटली, हातांत माझा आवडता छोटा चाबूक घेतला, आणि आपल्या खाटेवर उटून बसून चिरूट ओढणाऱ्या माझ्या बापाला म्हटलं, " मी जरा हिंडून येतें. "

त्यानं विचारलं, " या वेळेस ? "

मीं म्हटलं, " हं. "

" एकटीच ? "

" तर काय वाटलं तुला ? " मी एकदम रागानं विचारलं.

त्याला खोकल्याचा ठसका आला. मी राहुटीबाहेर पडलें. आम्हा सर्कस-वाल्यांच्या तंबूवर दिवस उजाडला म्हणून सांगणारी पहिली चाहूल म्हणजे जंगली जनावरांना घालण्याच्या मांसाचा रतीब घेऊन येणाऱ्या माणासाची, आणि त्याचा वास आल्याबरोबर पिंजऱ्यांत उठाबशा काढूं लागून हुंकारणाऱ्या जनाव-रांची. ह्याच्या आधीं राहुट्या राहुट्यांतून आदल्या रात्रीच्या खेळानं थकलेलीं माणसं गाढ निजलेलीं असतात. तंबू भोंवतालचं सारं आवार शांत असतं. मी राहुटी-बाहेर पडलें तेव्हां आजूबाजूला पूर्ण स्तब्धता पसरली होती. मी झपाझप पावलं टाकीत आवाराबाहेर पडलें, मोठा रस्ता ओलांडला, व पलीकडच्या छोट्याशा

टेकडीवर एक जुनं चर्च होतं त्याच्या आवारांत शिरलें. गेटापासून चर्चच्या दारापर्यंत गेलेली अरुंद वाट सोडली तर त्या आवारांत जिकडे तिकडे मोठमोठी झाडं उगवलेलीं होतीं, आणि झाडांमधल्या जागेत गवत माजलेलं होतं. मी वाट सोडली आणि गवत तुडवीत जाऊं लागलें. वाऱ्याची झुळूक झाडाच्या फांद्यांतून सळसळत होती. वर आभाळांत चांदण्या चमचमत होत्या. चंद्र नुकताच मावळला असावा, कारण त्याच्या चंदेरी प्रकाशाची खूण क्षितिजापाशीं दिसत होती. आणि त्या अंधुक प्रकाशानंच दिशा उजळल्यासारख्या भासत होत्या मी थोडीशी गवतांतून चालत गेलें, आणि मग एके ठिकाणीं खुशाल अंग टाकून दिलं, आणि झाडांच्या फांद्याफांद्यांतून दिसणाऱ्या चांदण्यांच्या पुंजक्यांकडे बघत, आणि चहुंबाजूंस पसरलेल्या स्तब्धतेचा कानोसा घेत मी पडून राहिलें. जिकडे तिकडे भरून राहिलेल्या शांततेनं माझ्या मनातहि प्रवेश केला कीं काय कुणास ठाऊक, पण माझं मनहि अगदीं शात होऊन गेलं. त्या ठिकाणीं असमाधानाची, शंकेची, रागाची खळबळ कधी होती हेंच मला खरं वाटेना. एखाद्या औषधाच्या गुंगीनं डोळे मिटून घ्यावेसं वाटावं त्याप्रमाणें चहुंकडे भरलेल्या अंधुक उजेडाचा आणि शांततेचा परिणाम माझ्यावर झाला. मीं डोळे मिटून घेतले...

माझ्या नाकावर मऊ मऊ असं कांहींतरी सरकलं आणि थोडा गोड थोडा तिखट असा वास एकदम नाकांत शिरला, तेव्हां माझ्या गुंगींतून मी जागी झालें. मी डोळे न उघडतां नाकावरून हात फिरविला. पण पुन्हां नाकावर कांहीं तरी हुळहुळलं आणि वास आला. मग मीं डोळे उघडले. आणि पहातें तों—

टोनी माझ्या डाव्या अंगाला गुढघे टेकून बसला होता, आणि कसल्या तरी वेलींची हिरवीगार पानं डाव्या हाताच्या चिमटींत धरून माझ्या नाकाला लावीत होता.

मला वाटलं हें स्वप्न असलं पाहिजे. माझे डोळे मिटलेले आहेत कीं उघडे आहेत हें मला क्षणभर कळेना. पण तितक्यांत नाकाला गुदगुल्यों होऊन मला मोठ्यांदा शिंक आली. टोनीच्या हंसण्याचा आवाज ऐकूं आला. दुसऱ्याच

क्षणीं मीं मानेखालीं ठेवलेले माझे हात त्यानं धरले, आणि मला अलगद उठवून तो पुन्हां हंसला. वाऱ्याची झुळूक आल्यामुळें त्याच्या कपाळावरचीं झुलपं हाललीं तीं मला अंधुक उजेडांतदेखील दिसलीं. डाव्या हातानं मीं त्याचे केंस धरले. मी स्वप्नांत नव्हतें. टोनी माझ्याजवळ होता याबद्दल माझी खात्री झाली. मी हळुंच विचारलं, " टोनी, या वेळेस तूं इथें कसा ? "

तो म्हणाला, " मी रोजच पहांटे इथें येऊन चर्चच्या पायऱ्यांवर बसतों. "

" कां ? देवाजवळ कांहीं मागत असतोस वाटतं ? "

" होय. माझं मागणं इतके दिवस देवानं ऐकलं नव्हतं. पण आज ऐकलं. तूं आलीस. मीं मघाशींच तुला पाहिलं. "

" टोनी, उगीच असं गोड गोड बोलून मला फसवूं नकोस. " त्याचा हात एकदम धरून मीं म्हटलं. " मला तुझ्याशीं पुष्कळ बोलायचं आहे. "

" बोल. " असं म्हणून तो नीट व्यवस्थित बसला, आणि त्यानं माझ्या डोक्याला डोकं टेकलं.

मला वाटलं होतं गेल्या कित्येक दिवस जो जाच माझ्या मनानं सोसला त्याचं वर्णन मला त्याच्याजवळ सहज करतां येईल. त्याच्या दुहेरी वागण्यानं जें दुःख मला होत होतं तें सांगून त्याला राग भरतां येईल. परंतु तसं होईना. शब्दाशब्दाला मी अडखळूं लागलें. माझ्या मनांत त्याच्याबद्दल जो राग होता तो बाहेर काढावा आणि त्याला शब्दांचे फटके मारावे म्हणून मी तो राग शोधूं लागलें, पण तो मला सांपडेचना. तो सारा राग एकदम कुठें नाहींसा झाला होता कुणास ठाऊक ? मी पुनःपुन्हां येवढंच म्हणत राहिलें, " मी मनानं, शरीरानं तुझी आहे. तुला मी हवी कीं नको तेवढं सांग. मला संशयांत ठेवूं नकोस. तुला मी नको असेन तर मला जगायचंच नाहीं... "

चंद्राचा रेंगाळणारा प्रकाश आतां नाहींसा झाला होता. अरुणोदयाचीं पहिलीं किरणं अजून क्षितिजाच्या खालीं होतीं. पहाटेच्या त्या अखेरच्या घटकेंत जिकडे तिकडे काळोख पसरला होता. वाऱ्यामुळें झाडाच्या फांद्यांची सळसळ होत होती, तिच्यांत माझा आवाज मिसळलेला माझा मलाच ऐकूं येत होता.

क्षणभर मला भास झाला, दुसरं कुणी तरी बोलतं आहे आणि मला ऐकूं येतं आहे.

शेवटीं मी थांबलें आणि " टोनी, तुझं माझ्यावर प्रेम असलं तर तसं सांग, नसलं तर तसं साग, पण आतां माझ्याशीं खेळूं नकोस—" असं म्हणून मीं त्याच्या डाव्या खांद्यावर डोकं टेकलं. मला हुंदका आला.

काहीं वेळ तो आणि मी दोघंहि अगदीं स्तब्ध राहिलों. वाऱ्याची कुजबुज-सुद्धां आजिबात थांबली होती. माझ्या लहानपणी मलबारातल्या आमच्या झोंपडींत रहात असतांना अथांग समुद्राचं शांत स्वरूप मी कधीं कधीं पाहिलं होतं, त्याची मला एकदम आठवण झाली स्तब्धतेचं अथांग पाणी चहुंकडे पसरलं असून मी आणि टोनी दोघंच त्यावर मधोमध तरंगत आहोंत असा भास मला झाला.

मग हळुंच टोनीचा हात माझ्या केसांवरून फिरूं लागला. त्याचा शब्द मला ऐकूं येऊं लागला...त्यानं मला परोपरीनं येवढंच सांगितलं कीं त्याचा धर्म निराळा होता, माझा धर्म निराळा होता, माझ्याशीं लग्न करणं त्याला शक्य नव्हतं...

मीं म्हटलं, " तुझा धर्म माझा धर्म ही काय भाषा तूं चालविली आहेस? माझ्याशीं लग्न कर असा तुझ्याजवळ कधीं मीं हट्ट घेतला आहे ? मला एकच गोष्ट सांग, तूं माझा आहेस कीं नाहीं ? तुला मी हवी कीं नको ? तुझं माझ्यावर प्रेम आहे कीं नाहीं ? या एका प्रश्नाचं मला उत्तर दे. दुसरं कांहीं नको. टोनी, सांग. "

तो कांहीं बोलला नाहीं. पण त्यानं आपल्या दोन्ही हातांत माझं तोंड अलगद धरून किंचित् वर उचललं आणि आपले ओठ माझ्या ओठांवर टेकले.

किती तरी वेळानं त्यानं ते दूर केले व मग एकदम दोन्ही हातांची मिठी माझ्याभोंवतीं घालून तो म्हणाला, " मी तुझा आहे ! "

★ ★ ★

## ५

आतां माझ्या सुखांत कसलीच उणीव राहिलेली नव्हती. माझं वागणं माझ्या बापाला पसत नव्हतं म्हणून तो वरचेवर माझ्याशीं भांडण काढी. पण मी त्याकडे लक्ष देत नसे. दारू घेतल्यानंतर कुणावर तरी तणतणण्यासाठीं कसला तरी विषय या दारुड्या लोकांना लागत असतो, इतकाच माझ्या बापाच्या त्या बडबडीचा अर्थ मी समजत असे. मला सोडून निघून जाण्याची धमकी तो वारंवार देई. पण एक तर तो गेला तर मला त्याचं वाईट वाटणार नव्हतं, आणि दुसरं अस कीं जातो जातो असं तो किती म्हणाला तरी तो कधीं जाणार नाहीं याची मला खात्री होती. या दारुड्यांच्या धमक्या केवळ बडबडण्यापुरत्या असतात. मला आतां मोठा पगार मिळत होता आणि त्याच्या वयाकडे पाहून मीं त्याला जसं संभाळायला हवं तसं संभाळीत होतें. तेव्हां तो माझ्याशीं भांडूं लागला कीं ही एक बरी फुकट करमणूक आहे अशा समजुतीनं मी त्याच्याशीं बोलत असे. सर्कशींतलं एक महत्त्वाचं काम करणारी म्हणून मला मान होता, मालकांचं आणि दौलतराव काकांचं माझ्यावर प्रेम होतं, यशोदा मावशी सख्ख्या आईप्रमाणें माझ्यावर ममता करीत होती, माझ्या हातांत पैसा खेळत होता, हवी ती चैन मला करतां येत होती, टोनी आतां निराळ्या राहुटींत रहात नव्हता, आम्ही एकत्रच रहात होतों. माझ्या सुखाला पारावार उरला नव्हता...दरभंग्याचा मुक्काम हलल्यानंतर लखनौ, कानपूर, बरेली, रामपूर, दिल्ली असे मुक्काम करीत करीत आम्ही पंजाबांत शिरलों. प्रत्येक मुक्कामाच्या गांवीं मी आणि टोनी मनाची सारी हौस पुरवून घेत होतों.

खावं, प्यावं, हिंडावं, नवे नवे उंची कपडेलत्ते करावे यांत आमचे दिवस कसे संपत तें आम्हाला कळत नसे. आणि पैसे कसे संपत तेंहि समजत नसे व त्याची पर्वाहि वाटत नसे. पैसे शिल्लक ठेवण्याचं काय कारण होतं ? चालू घटका सुखानं कांठोकांठ भरावी एवढंच मला समजत होतं. भविष्यकाल नांवाची कांहीं गोष्ट आहे याची जाणीवच मला नव्हती. उद्यां कसं होईल, परवां कसं होईल, असे विचार माझ्या मनांत कधीं येत नसत. चालू दिवसाच्या चैनी-पलीकडे माझी नजर कधीं जात नव्हती...

पण आमचा अमृतसरचा मुक्काम सुरू होऊन पांच सहा दिवस गेल्यावर एके दिवशीं अकस्मात् माझ्या या चालू घटकेवर खिळलेल्या नजरेला धक्का बसला. आज मी अशी आहे, पण उद्यां मी अशी रहाणार नाहीं, असा एक नवीनच विचार माझ्या मनांत आला. भविष्यकाळाची दखलगिरी घेतली पाहिजे असं मला एकदम वाटलं. माझ्यावर कसलीदेखील जबाबदारी नाहीं, सुखाचा स्वैर उपभोग घ्यायला मी मोकळी आहे, अशा विचाराची माझी मस्ती एकाएकीं नरम झाली. एक जबाबदारी हलके हलके पावलं टाकीत माझ्याकडे येत आहे हें माझ्या लक्षांत आलं. मी गर्भार राहिलें आहे हें मी समजून चुकलें !

ज्या क्षणीं माझी अवस्था माझ्या लक्षांत आली त्या क्षणीं मला असा कांहीं आश्चर्याचा धक्का बसला की माझं मन सुंदच होऊन गेलं. कारण जें घडलं होतं तें निसर्गाच्या क्रमाप्रमाणें केव्हां तरी घडणार असंच जरी होतं तरी त्याचा संभव अजिबात विसरून मी वागत राहिलें होतें. ही गोष्ट कुणाला खरी वाटायची नाही. कारण संसारसुख घेणाऱ्या प्रत्येक स्त्रीला हें माहीत असत कीं आपल्याला मातृत्व येणार आहे; तें यावं म्हणून सामान्यतः स्त्रिया अधीरहि झालेल्या असतात. यामुळें माझी गोष्ट मुलखावेगळीच म्हणावी लागेल. पण तशी ती होती खरीच. दरभंग्यास त्या जुन्या चर्चच्या आवारांत पहांटेच्या शांत प्रहरीं " मी तुझा आहे " हे टोनीचे शब्द मीं ऐकले, आणि मग त्या दिवशीं रात्रीं खेळ संपल्यावर मी आपल्या राहुटींत परत आलें, मेक-अप काढला, कपडे बदलले, अंगाभोंवतीं रेशमी पायघोळ गाऊन घाईनं घेतला; टोनीच्या राहुटीकडे धांवलें, आणि माझं शरीर मीं त्याच्या स्वाधीन केलं,

तेव्हां स्वाधीन होण्याच्या उत्कंठेपलीकडे दुसरं कांहींसुद्धां मला समजत नव्हतं. आणि नंतर आम्ही एकत्र राहूं लागलों, टोनीचा सहवास म्हणजे मला रोजचा मिळणारा सुखाचा चारा होऊन बसला, तरी अगदीं पहिल्या वेळेप्रमाणेंच त्याच्याशीं एकरूप होण्याची उत्कंठा येवढंच काय तें मला कळत होतं. समुद्रांत वादळ उठावं त्याप्रमाणें ती अनावर उत्कंठा माझ्या अंगभर उठत असे, आणि वादळ निघून गेलं कीं खाऱ्या पाण्याचा अथांग शांतपणा तेवढा मागं रहावा त्याप्रमाणें ती उत्कंठा पूर्ण होऊन निवली कीं माझ्या शरिरावर आणि मनावर अगदीं अथांग अशी शांतीची धुंदी चढत असे. आधींच्या उत्कंठेची नशा, आणि नंतरच्या तृप्तीची धुंदी यांत मी इतकी बुडून गेलें होतें कीं दुसऱ्या कसल्या विचाराला माझ्या मनांत अवकाशच नव्हता...माझी दृष्टि कुणाला अविचाराची वाटेल, वेडेपणाची वाटेल, पण जें सुख मला मिळत होतं तें घेण्यांत मी इतकी रमून गेलें होतें कीं त्याच्या स्वरूपाकडे, त्यांतून काय काय निष्पन्न होईल त्याकडे, बघण्याची मला शुद्धच राहिली नव्हती. एखादं रंगीत खेळणं हातांत मिळतांक्षणींच तें तोंडांत घालून चोखणारं लहान मूल त्या खेळण्याचे कानेकोपरे, खिळे एखादे वेळीं तोंडाला लागतील याचा विचार करूं शकत नाहीं, तद्वत् माझी अवस्था झाली होती. माझ्या सुखानं मला असं कांहीं बेभान केलं होतं कीं त्या सुखांतून उद्‌भवणाऱ्या गोष्टी मला दिसत नव्हत्या. सुखानं भरलेल्या घटकेपलीकडे मला कांहीं कळत नव्हतं आजच्या-पेक्षां निराळा असा उद्यांचा दिवस असूं शकेल याची मला दाद नव्हती...

म्हणून मला दिवस गेले आहेत हें माझ्या लक्षांत आल्याबरोबर मला एक-दम भयंकर आश्चर्य वाटलं. जें कधीं ध्यानीं मनीं नव्हतं तें कसं घडलं असं मला वाटलं. खरंच का मला ही अवस्था आली, छे छे, ही गोष्ट कशी घडेल, असं विस्मयातिशयानं मनाशीं म्हणून आरशापुढें उभी राहून मीं आपलं प्रति-बिंब न्याहाळूं लागलें. माझं आश्चर्य इतकं मोठं होतं कीं जी गोष्ट मला दिसत होती ती खरी नाहीं, ती असल्याचा मला केवळ भ्रम होतो आहे, अशी समजूत करून घेण्याचा हट्ट मी करूं लागलें...

पण या हट्टांत काय अर्थ होता? जें घडलं तें इतकं स्पष्ट होतं कीं तें

मानल्यावांचून मला गत्यंतरच नव्हतं...आणि ही गोष्ट जेव्हां मी पुरती उम-ज़लें तेव्हां माझ्या मनांत एकदम संतापाची लाट उठली...माझं मन प्रथम ज्याप्रमाणें आश्चर्यानं धसकून गेलं होतं त्याप्रमाणें तें आतां संतापानं भडकलं. संताप ! कुणावर संतापलें मी ? कुणाचा राग आला मला ? कुणाची चीड ? कुणाची म्हणजे काय ? ज़ें घडलं त्याची ! माझ्यावर मीं तें ओढवून घेतलं होतं म्हणून माझी स्वतःची ! आणि टोनी कारण झाला म्हणून टोनीची !... माझ्या गर्भारपणावर मी कां संतापलें तें सामान्य वायकांना कळणं कठीण आहे. त्याना एक नव्हे दहा मुलं झालीं तरी त्यांच्या आयुष्यांत त्यामुळें फारसा फरक पडत नाहीं. माझी गोष्ट तशी नव्हती. गर्भारपण, त्यामागून येणारं बाळंतपण, त्यानंतर तान्ह्या मुलाची जोपासना करण्याची जबाबदारी या गोष्टी माझ्या आयुष्याच्या चौकटींत बसण्यासारख्या नव्हत्या. कसरतीच्या साऱ्याच कामांत शरीराची ताकद, श्वास, हातापायांचा स्थिरपणा आणि तोल या गोष्टी मुख्य असतात. माझं मोटरसायकलवरचं काम तर जिवावरचं होतं. शरीराची शीर न् शीर काबूत ठेवतां आली, नजर क्षणभरदेखील चळणार नाहीं अशी स्थिरावतां आली, अंग न् अंग तोलांत ठेवतां आलं तरच साधणारं तें काम होतं. जवानी आणि अगदीं शंभर नंबरी तनुदुरुस्ती यांची या कामाला गरज होती. या कामावर माझी नोकरी अवलंबून होती हें तर झालंच, पण शिवाय या कामाच्या वेळेस शरीरावर आणि मनावर जो उन्माद चढत असे त्याचं व्यसन, आणि माझ्या प्रेमांतल्या टोनीबरोबर मी काम करीत आहे. या जाणिवेनं अवर्णनीय सुखाचे जे शहारे अंगभर उठत असत त्यांचंहि व्यसन मला लागलं होतं. रोज हा उन्मादाचा आणि आनंदाचा रतीब मिळेनासा झाला तर ज्याची दारू सक्तीनं बंद केली अशा एखाद्या दारुड्याप्रमाणें माझी स्थिति भ्रमिष्टासारखी होणार होती. रोजच्या त्या साहसी कामावांचून माझं आयुष्य साऱ्याच दृष्टींनीं खराब होणार होतं. मला दिवस गेले होते याचा सरळ अर्थ असा होता कीं माझं आयुष्य उजाड करणारं संकट जवळ येऊन ठेपलं होतं. त्या संकटानं अगदीं प्रथम मीं आश्चर्यचकित झालें, पण आश्चर्याची लाट ओसरल्यावर केवळ अमर्याद संताप मनांत मावेनासा झाला. वाटलं कसल्या तरी

उपायानीं पोट रिकामं करून टाकावं आणि या संकटाचं निवारण करावं...

पण या गोष्टीला टोनी कांहीं केल्या कबूल होईना त्याचा तो हट्ट मला पटेना. माझा बाप दारू पिऊन माझ्याशीं भांडत असे त्याप्रमाणे मनांतल्या संतापाच्या कैफानं मी त्याच्याशीं भयंकर भांडूं लागलें. या गोष्टीला तूं जबाबदार आहेस असं म्हणून मी नाहीं नाहीं ते अपशब्द त्याला बोललें. माझं तें संतापाचं बोलणं तो शांतपणें ऐकून घेई आणि पुनःपुन्हां येवढंच म्हणे कीं, " तूं काय वाटेल तें म्हण, पण जी गोष्ट करावयाची तूं म्हणतेस ती मी तुला कधीं करूं देणार नाहीं ! " हें ऐकलं कीं माझा राग आणखीच भडके आणि एखाद्या वात झालेल्या माणसाप्रमाणें मी आदळआपट करूं लागे, स्वतःला थाडथाड मारून घेई, डोकं आपटून घेई. " माझा नाश तूं केलास ! तूं या गोष्टीला जबाबदार आहेस "असं मी मोठमोठ्यांदा ओरडत सुटे. एकदां टोनीनं माझे दोन्ही हात घट्ट धरले, माझी हनुवटी उचलून मला आपल्याकडे पहायला लावलं,आणि तो म्हणाला,

" तूं जबाबदार आहेस, तूं जबाबदार आहेस, असं उगीच वेड्यासारखं बडबडतेस, तुला कांहीं वाटत नाहीं ? "

मीं म्हटलं, " मग तूं जबाबदार नाहींस काय ? "

तो म्हणाला, " आहे. पण मी एकटाच जबाबदार आहे काय ? या गोष्टींत तुझा वांटा नाहीं ? "

त्याचे ते शब्द ऐकून मी क्षणभर त्याच्याकडे पहातच राहिलें त्याचा तो प्रश्न मला निरुत्तर करणारा होता त्याचं म्हणणं अगदीं खरं होतं जें घडलं होतं तें त्यानं एकट्यानं का केलं होतं ? माझा भाग त्यात होताच !...पण त्याचं म्हणणं अगदीं खरं होतं व त्याचा प्रश्न बिनतोड होता यामुळेंच मी आणखी चिडलें. संतापलेल्या माणसाला कुणी त्याची स्वतःची चूक दाखविली कीं रागाची आग विझण्याऐवजीं तिच्यांत तेल पडल्याप्रमाणें आणखीच भडकते. आपल्याजवळ उत्तर नाहीं असं पाहिलं कीं तें माणूस शांत होण्याऐवजीं आणखीच संतापाचा देखावा करतं...मीं टोनीकडे पाहिलं, पण लगेच नजर वळवून " होय रे बाबा ! मींच गाढवपणा केला ! " असं ओरडत मीं स्वतःचं तोंड बडवून घेतलं, आणि खाटेकडे धांवून, अंग टाकून मी ओक्साबोक्सीं रडूं लागलें...

माझ्या गर्भारपणाची मला चीड आली होती, पण त्यांतून सुटका करून घेण्याची जी वाट मला दिसत होती त्या वाटेनं मला टोनी जाऊं देत नव्हता या गोष्टीची चीड मला त्याहून अधिक आली होती.

मला वाटलं होतं यशोदा मावशी माझ्या म्हणण्याला दुजोरा देईल आणि टोनीचं मन वळवील. पण तिच्याजवळ मीं विषय काढला तेव्हां ती मलाच शहाणपणाच्या गोष्टी सागूं लागली. "चार सहा महिने तुला स्वस्थ बसावं लागेल यापलीकडे काय होणार आहे ?" ती मला म्हणाली, "सर्कशींतल्या बायकांना मुलं होत नाहींत कीं काय ? मूल झालं कीं शरीराचा तोल संभाळतां येणार नाहीं हें तुला कुणी सांगितलं ? उगीच वेडेपणा करूं नकोस. भलते उपाय करून गर्भारपणांतून स्वतःची सुटका करून घेण्याचा विचार मी तुला कधींच करू देणार नाही "...मी टोनीवर संतापलें तशी यशोदा मावशीवर कशी संतापणार ? पण मला मनांतून तिचा राग मात्र आला. सकटांतून सुटण्याचा जो उपाय मला करावासा वाटत होता, तो हे लोक मला कां करूं देत नाहींत तें मला कळना या गर्भारपणामुळें मी कायमची निकामी होणार हें माझ्या मनानं पक्कं घेतलं होतं. एकदां मूल झालं कीं, माझं शरीर हवं तसं काम देणार नाहीं ही भीति माझ्या मनांत अगदीं खोल रुतली होती. माझं आयुष्य संपणार अशी धास्ती मीं पक्की घेतली होती...जो उपाय करावासा मला वाटत होतं त्याच्या आड आल्याबद्दल टोनीचा आणि यशोदा मावशीचा माझ्या मनांत उत्पन्न झालेला संताप वाढत गेला. मला कांहींच करतां येत नव्हतं म्हणून स्वतःवरहि मी अधिक अधिक संतापूं लागलें, आणि माझ्या पोटांत वाढणाऱ्या मुलाबद्दल माया वाटण्याऐवजीं विलक्षण द्वेष मला वाटूं लागला...

अमृतसर, लाहोर, इथले मुक्काम संपेपर्यंत मी नेहमींप्रमाणें टोनीबरोबरचं काम करीत होतें. परंतु नंतर सिंधकडे जायचं म्हणून दक्षिणेच्या दिशेनं आमची सर्कस निघाली, आणि आमचा पहिला मुक्काम गुरदासपूरला पडला तेव्हां मला रजा घेऊन स्वस्थ बसणं भाग पडलं. आमचा नंबर रोजच्या खेळांत होईनासा झाला. मालक आमचा पगार कसा चालू ठेवणार ? पण आम्हीं दोघांनीं सर्कसबरोबर रहावं असा आग्रह दौलतराव काकांनीं केला आणि आमच्या जेवण्या रहाण्याचा

खर्च सर्कसकडून चालूं रहावा या गोष्टीस मालकांकडून मंजुरी मिळविली. काम नाहीं, उद्योग नाहीं, खायचं प्यायचं आणि विश्रांति घ्यायची अशी माझ्या आयुष्याची तऱ्हा झाली. खरं पाहिलं तर यांत वाईट काय होतं ? पण मला विचार करतां येईनासं झालं होतं हेंच खरं. माझा वेळ चांगला जावा म्हणून टोनी परोपरीनं प्रयत्न करी. पण त्याच्या प्रयत्नांचं चीज मी होऊं देत नसे. प्रेमाचं बोलणं तर राहोच पण त्याच्याशीं सरळ साधं बोलणंदेखील मी करीत नसे. माझ्या प्रेमावरचा सगळ्याचा हक्क उडालाच अशी समजूत मीं करून घेतली होती, आणि ज्यानी मला सहानुभूति दाखविली नाहीं त्यांना हवीं तीं दुरुत्तरं करण्याचा हक्क मला मिळाला आहे असं मला वाटूं लागलं होतं. माझ्या आयुष्याचं वाटोळं झालं याचं दुःख, स्वतःच्या दुबळेपणाची आणि नशिबाची चीड, टोनीवरचा राग, आणि जं मूल माझ्या पोटीं येणार होतं तें माझ्या पूर्व-जन्मींचं वैरी होतं अशी त्याच्याबद्दलची तिरस्काराची भावना—यांत गुरफटून जाऊन मनांतल्या मनात कुढत संतापत मीं दिवसांमागून दिवस ढकलीत होतें. पुष्कळदां मनात येई, माझ्या आयुष्याची खराबी करणारं जें हें मूल पोटांत वाढत आहे, त्याला जन्म देता देतां मी मेलें तर फार बरं होईल ! सर्कसमधल्या कामाला नालायक होऊन माझा जीव मात्र राहिला तर ती मरणापेक्षांहि अधिक वाईट गोष्ट होणार हो ी. बाळंतपणानंतर माझं शरीर निकामी होणार असा माझ्या मनाचा पक्का ग्रह झाला होता. म्हणून मला वाटे माझं वैर साधून माझ्या पोटीं येणारं हें मूल जगात येता येतां मला जगांतून नाहींस करील तर फार चांगलं होईल.

माझे दिवस भरत आले तेव्हां टोनीची केवढी धांदल उडाली. मी ज्या वेळेस बाळंत होणार त्या वेळेस सर्कसचा मुक्काम मोठ्या गांवीं असेल कीं लहान गांवी, त्या मुक्कामाच्या ठिकाणी चांगलंसं इस्पितळ असेल कीं नाहीं, त्या इस्पितळांत सोय कशी काय असेल डॉक्टर चागला असेल कीं नाही, त्याची ओळख काढून कांहीं खास व्यवस्था करून घेता येईल कीं नाहीं, अशा चौकशा करतां करतां त्याची अगदीं धादल उडाली. दौलतराव काकाहि या साऱ्या गोष्टींत इतक्या आपलेपणानं लक्ष घालूं लागले कीं जणूं त्यांची स्वतःची लेकच बाळंत

होणार होती. दादू मास्तर, छोटू हलवाई, दामू विदूषक, तुक्या मिस्त्री, अर्जुना ट्रेनर, तोरवरची कसरत करणाऱ्या हिरा आणि तारा या बहिणी, निशाणबाजीच्या नंबरांतली गांगुलीची [illegible]दारीण उमादेवी, लखनौच्या मुक्कामापासून नोकरीला राहिलेल्या चिनी जादुगाराची बायको इत्सू— या साऱ्या मंडळींची वेड्यासारखी धांदल उडाली. जणूं माझं जवळ आलेलं बाळंतपण म्हणजे या साऱ्या लोकांच्या घरांतलीच एखादी गोष्ट होती. यशोदा मावशीला तर दुसरा विषय सुचतच नव्हता. टोनीबरोबर बाजारांत जाऊन ती कापड काय आणीत होती, माझ्यासाठीं सैल कपडे काय बेतीत होती, दुपटीं काय तयार करीत होती, अंगडीं टोपडीं काय शिवीत होती! त्यांच्या त्या धांवपळीकडे पाहून व त्यांची आपापसांतील बोलणीं ऐकून मला वाटे यांना वेडं तर लागलीं नाहींत जें मूल माझ्या पोटीं येऊन माझ्या आयुष्याची खराबी करणार त्याच्या स्वागताची यांनीं तयारी चालविली आहे! त्यांच्या त्या एकंदर उत्साहाचं कौतुक वाटण्याऐवजी हंसू मात्र मला येत होतं. माझ्या स्वतःच्या मनाला काडीचा उल्हास वाटत नव्हता. मी कुठेंहि कशीहि बाळंत झालें तरी त्याची मला फिकीर नव्हती. मनांत अलीकडे बळावलेली एकच इच्छा होती, ती अशी कीं या बाळंतपणांत मला मरण यावं...

पंजाब आणि सिंध यांमधील सरहद्दीजवळच्या डेरा-उस्मानखान या गांवीं आमचा मुक्काम असतांना एके दिवशीं संध्याकाळीं माझ्या पोटांत दुखूं लागलं. पहिल्या तासाभरांतल्या कळा मीं कशाबशा सहन केल्या. पण मग ज्या कळा सुरूं झाल्या त्या अगदीं प्राणांतिक होत्या. माझ्या पोटांत दुखूं लागल्याबरोबर मालकांच्या स्वतःच्या गाडींतून मला इस्पितळांत नेण्यांत आलं टोनी, दौलतराव काका, यशोदा मावशी माझ्याबरोबर आली. दौलतराव काका आणि टोनी बाहेर बसले. यशोदा मावशीच्या हाताचा आधार घेऊन मी नर्सबरोबर आंतल्या खोलींत गेलें. नर्सनं मला कॉटवर निजविलं. ती माझ्या एका बाजूला उभी राहिली, दुसऱ्या बाजूला यशोदा मावशी उभी राहिली. सोसण्यासारख्या कळा येत होत्या तोंपर्यंत मी त्या दोघींकडे मधून मधून पहात होतें, व मला त्या कांहीं तरी सांगत तें ऐकत होतें पण मग माझ्या पोटांत अशी कांहीं काळ एकदम उठली कीं जणूं मोटरसायकल सुरूं करतांना, स्टार्टरला लाथ

मारावी तशी कुणी तरी माझ्या पोटांत लाथ मारली. मी एकदम मोठ्यांदा गुरासारखी ओरडलें. क्षणभर माझी सारी होषच नाहींशी झाली. त्या बेहोषींतून मीं डोळे उघडले तों नर्सनं आणि यशोदा मावशीनं मला घट्ट धरलं होतं. जी भयंकर कळ मीं सोसली होती तिची याद झाल्याबरोबर मीं अगाला शहारे दिले. आणि त्याच क्षणीं जी एक कल्पना मनांत आली तिनं मला एकदम आनंद झाला. माझ्या मनांत आलं अशा प्राणांतिक कळा उठूं लागल्या तर मी खचित मरेन! सुटेन! निकामी होऊन जगण्याची विटबना टळेल! फार बरं होईल! या विचाराच्या समाधानानं पुन्हां भयंकर कळ केव्हां येते म्हणून मी वाट पाहूं लागलें. यशोदा मावशीकडे मी दृष्टि टाकली. माझी नजर अगदीं थकलेली होती. कोणत्याच वस्तूकडे स्थिरपणानं मला पहातां येत नव्हतं. सिनेमाचं यंत्र बिघडल म्हणजे पडद्यावरचं चित्र थरथरावं त्याप्रमाणें यशोदा मावशीची आकृति थरथरा हालत आहे असं मला वाटलं. परंतु मी तिच्याकडे पहात आहे आणि माझ्या मनांतून कांहीं तरी बोलायचं आहे हें मावशीनं ओळखलं. तिनं अगदीं माझ्या तोंडाजवळ तोंड आणलं, अन् माझ्या केसांवरून हात फिरवीत विचारलं,

" काय म्हणतेस ? काय हवं ? "

मीं म्हटलं, " कांहीं नको. माझी आठवण ठेव म्हणजे झालं मी यांतनं जगत नाहीं हें खचित. टोनीला माझा निरोप सांग—"

तिनं आपला उजवा पंजा माझ्या तोंडावर हलकेच ठेवला व ती म्हणाली, " सू !— असं बोलायचं नाहीं वेडी का काय तू ? ह्याहूनदेखील भयंकर कळा आल्या तरी भ्यायचं कारण नाहीं. उगीच भलतं सलतं बोलूं नकोस -"

पण मावशीचे ते शब्द मीं पुरते ऐकले न ऐकल तोंच माझ्या पोटात मघप्रांमाणेंच एक लाथ बसली! लगेच दुसरी! आणि तिच्या मागोमाग— छे! आतां मात्र मी मरत होतें खास मीं एखाद्या वासरासारखा हंबरडा फोडला! डोळे घट्ट घट्ट मिटून धरले आणि मरणाला म्हटलं, " लवकर ये! सोडव ! "



# १

हरिणीचं तें गुरासारखं ओरडणं माझ्या कानांत नंतर इतके दिवस घुमत होतं कीं मला वाटूं लागलं होतं, ऐकणाराच्या हृदयाचं पाणी करणारा तो तिचा आवाज मला कधींच विसरतां येणार नाहीं.

त्या गोष्टीला आतां सात वर्षे झालीं. या सात वर्षांत आम्ही किती गांवं हिंडलों, आणि आमच्या सर्कशीच्या छोट्याशा जगांत किती घडामोडी झाल्या. कितीक जुने खेळाडू गेले, कितीक नवे आले; जुनीं सुखं शिळीं झालीं, त्यांची जागा नव्यांनी घेतलीं; आणि सुखाप्रमाणें दुःखंदेखील त्यांवर दिवस-गतीचीं पुटं बसून विसरलीं गेलीं. आणि इतर अनेक गोष्टींचा जसा आम्हांला विसर पडला त्याप्रमाणेंच हरिणीचं तें भयंकर ओरडणं आणि त्यानंतर त्या इस्पितळांत आम्हाला काढावी लागलेली ती रात्र, या गोष्टीदेखील आम्ही हळुहळुं विसरलों. पण एखाद्या चाळणींतून सारी बारीक माती खालीं पडते पण मोठाले खडे वरती उरतात त्याप्रमाणें माणसाच्या मनाचं होतं कीं काय कुणास ठाऊक. पुष्कळशा गोष्टींच्या आठवणी बुजतात, पण कांहीं गोष्टी मागं शिल्लक उरून मनाच्या सांदी कोंपऱ्यांत लपून रहातात, आणि कसल्या तरी

निमित्तानं त्यांच्या आठवणी प्रसंगाप्रसंगानं होत रहातात. इस्पितळांतल्या त्या खोलीतल्या हरिणीच्या त्या ओरडण्याचीच गोष्ट पहा. तें मी आतां बहुतेक विसरलें आहे, पण कधीं तरी त्याची अशी कांहीं जोराची आठवण मला होते कीं कॉटवर हरिणी पडली आहे, तिच्या एका अंगाला नर्स उभी आहे, दुसऱ्या बाजूला मी उभी आहे, असा देखावा मला स्पष्ट दिसूं लागतो, आणि हरिणीचा हंबरडा मला स्पष्ट ऐकूं येत आहे असा भास मला होतो सात वर्षांच्या गोपालकडे मी पहात राहिलें कीं पुष्कळदां एकाएकीं उगीचच ती आठवण मला येते आणि मग मी त्या पोराकडे आणखीच निरखून पहात राहिलें कीं किती तरी गोष्टींचा इतिहास माझ्या डोळ्यांपुढून सरकूं लागतो...

तो पहा गोपाळ! बँडवाल्याच्या राहुटीपुढच्या जागेत महंमदच्या मांडीवर तो बसला आहे, आणि दोन्ही हातात टिपऱ्या घेऊन ड्रमवर टऽ टर टऽ टरर असा आवाज काढीत आहे. सकाळचीं कोंवळी उन्हं जिकडे तिकडे पडलेलीं आहेत तबेल्यांत घोड्यांचे खरारे चालले आहेत. जंगली जनावरांचे पिंजरे धुतले जात आहेत. कांहीं राहुट्यांत चुली पेटल्या आहेत त्यामुळें धूर बाहेर पडून आभाळांत चढत आहे. तिकडे तबूंत नवीन खरीदलेली घोड्यांची एक जोडी मालक शिकवून तयार करीत आहेत, त्यांच्या हातांतल्या चाबकाचे काडकाड आवाज आणि त्यांच्या तोंडचे दटावणीचे शब्द ऐकूं येत आहेत. मीं चूल पेटवून चहा तयार केला आहे, रोटी भाजली आहे, रोटी आणि चहा गोपालला देण्यासाठीं राहुटीत बसल्या बसल्या मी "गोपाल! गोपाल!" अशा त्याला किती हांका मारल्या तरी तो आला नाहीं म्हणून मी बाहेर येऊन उभी राहिली आहे, त्याला शोधण्यासाठीं इकडे तिकडे दृष्टी टाकल्यावर बँड-वाल्यांच्या तंबूपुढें महंमदच्या मांडीवर तो मला दिसतांच मी स्वतःशीं म्हणत आहे, "तो पहा गोपाल!"...

मी त्याला "गोपाल गोपाल" अशा मोठ्यांदा हांका मारणार होतें. पण महंमदजवळ ड्रम वाजवायला शिकण्यांत तो इतका गढून गेला होता कीं माझ्या हांकांकडे त्याचं लक्ष जाणं शक्यच नव्हतं. मी त्याच्याजवळ गेलें आणि त्याला ओढून उठवून हातांनीं धरून नेला तरच तो येईल हें मला माहीत होतं.

त्याच्याकडे जाण्यासाठीं म्हणून माझ्या पायांची हालचाल झाली. पण मी थबकलें. उन्हात बसलेल्या गोपालचं तें रूप इतकं गोजिरवाणं दिसत होतं की वाटलं तें दुरून पहात रहावं, जवळ जाऊन तें चित्र बिघडवूं नये. एक लांडी चड्डी आणि एक मळकट गंजिफ्रॉक येवढेच कपडे त्याच्या अंगांत होते. पण शरीर बांधेसूद आणि बाळसेदार असल्यानं अर्धच अंग झांकणाऱ्या त्या साध्या मळकट कपड्यांत तो किती चागला दिसत होता. अजून त्याच्या नाकाडोळ्यांना कायमचा आकार आलेला नव्हता. पण तो काहींसा आईसारखा, कांहींसा बापासारखा दिसणार असं त्याच्याकडे पाहिलं की मला नेहमी वाटे. हरिणीइतका नाहीं तरी त्याचा वर्ण पुष्कळसा काळाच होता, आणि त्याच्या टपोऱ्या डोळ्यांची नजर पाहिली कीं मला पुष्कळदा भास होई, हरिणीच माझ्याकडे पहात आहे. त्याचा चेहरा टोनीसारखा किंचित् लांबट होता, नाक त्याच्यासारखंच सरळ आणि शेंड्या-जवळ थोडं उचललेलं होतं, आणि केसांचा रंग टोनीच्या केसांसारखा नव्हता, पण झुलपाची तऱ्हा अगदी तीच होती...आत्तां त्याच्या त्या झुलपांवर ऊन पडलं होतं आणि वाऱ्याच्या झुळुकेबरोबर ती झुलपं भुरुभुरु हालत होती... गोपालचं तें गोजिरवाणं रूप पहात मी जागच्या जागी उभीं राहिलें. आणि पाहता पाहतां माझ्या मनांत एकदम आलं, याला पाहायला, आणि याचं कौतुक करायला याचे आईबाप नसावेत हें केवढं दुर्दैव तीं दोघजणं आज इथें असतीं तर——

आणि त्या क्षणीं जी एक आठवण कधीं कधीं माझ्या मनाच्या कोपऱ्यांतून एकदम उसळून वर येत असे ती आठवण मला झाली. इस्पितळांतली ती खोली माझ्या दृष्टीपुढें उभी राहिली. हरिणीचा हंबरडा मला स्पष्ट ऐकूं आला. आणि गेल्या सात वर्षांतल्या अनेक गोष्टींचीं चित्रं माझ्या नजरेपुढून सरकलीं...

हरिणीला पुनःपुन्हां प्राणांतिक कळा येत होत्या, आणि एकेक कळ आली कीं ती अशी कांही ओरडे कीं जणूं तिचा कासावीस होणारा प्राण दुसऱ्याच क्षणीं निघून जाणार. कांहीं वेळानं कळा बंद झाल्या. हरिणी निपचित पडून राहिली. मला वाटलं बरं झालं. पण माझं तें समाधान थोडाच वेळ टिकलं. कारण मधेंच डॉक्टर आले ते म्हणाले, " कळा येत होत्या तेंच बरं होतं. त्या

बंद झाल्या ही गोष्ट कांहीं बरी नव्हे. अशानं ऑपरेशन करायची पाळी येईल. ” कळा पुन्हां सुरू व्हाव्या म्हणून एक इंजेक्शन देऊन ते गेले. नर्स आणि मी दोघींजणी हरिणीच्या कळा पुन्हां केव्हां सुरू होतात म्हणून वाट पहात उभ्या राहिलें. अर्धा तास झाला, तास झाला, दोन तास होऊन गेले. हरिणीच्या पोटांत उगीच एखादी बारीक कळ उठावी आणि लगेच ती विरावी असं व्हायला लागलं. नर्स घाबरून म्हणाली, “ हें लक्षण कांहीं ठीक नाहीं. ” ती तसं स्पष्ट बोलली नाहीं, पण तिच्या चर्येवरून तिचा अभिप्राय माझ्या लक्षांत आला. की कळा थांबणं हें पोटांतल्या मुलाची हालचाल बंद झाल्याचं लक्षण होत, कदाचित् तें मेलेलंहि असेल...त्या शंकेनं माझ्या पोटांत एकदम चर्रर झालं. नर्स हरिणीच्या कानांत म्हणाली, “ कळ आवरून धरूं नकोस. उलट आली कीं श्वासाचा दाब देऊन ती वाढविण्याचा प्रयत्न कर. ” आधींच चिडलेली हरिणी तिला म्हणाली, “ तुझं शहाणपण मला नको सांगूंस. मला माहीत आहे कीं यांत मी मरणार आहे. आणि मी फार आनंदानं मरणार आहे. तुम्ही सारीं जणं माझ्यापासून दूर व्हा पाहूं. ” तिनं त्या नर्सचे हात झटकून टाकले, आणि माझ्याकडेसुद्धां रागानंच पाहून ती म्हणाली, “ मला एकटीला मरायला टाकून तुम्ही जाल तर बरं होईल. मला वांचवायसाठीं का धडपडतां आहांत तुम्हीं सगळीं ? जा ! जा ! ” तिचा हा वैताग मला आवडला नाहीं. पण ती वेळ अशी चमत्कारिक होती कीं तिला रागं भरणं शक्य नव्हतं. कांहीं न बोलतां फक्त प्रेमळ नजरेनं तिच्याकडे पहात मी तिच्या पाठीवरून हात फिरवूं लागलें.

डॉक्टरनीं आणखी एकदां येऊन इंजेक्शन दिलं. पण त्याचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं. जोराची कळ तिला कांहीं येईना. शेवटीं त्यांनीं ऑपरेशन करायचं ठरविलं. हातगाडी आली. तिच्यावर हरिणीला निजविण्यांत आलं. डॉक्टर पुढें निघून गेले. ऑपरेशनच्या खोलीकडे नोकर हातगाडी ढकलीत नेऊं लागला. मी झपाझप मागोमाग निघालें. व्हरांड्यांत काका आणि टोनी बसले होते. त्यांच्या अंगावरून गाडी गेली. त्या दोघांनीं दचकून माझ्याकडे पाहिलं. मीं हळुंच त्यांच्या कानांत काय तें सांगितलं. टोनीनं माझ्याकडे पाहिलं,

मग काकांकडे पाहिलं. त्याच्या डोळ्यांत पाणी थरथरलं. त्याला हुंदका आला. त्याचं डोकं आपल्या खांद्यावर चटकन टेकून घेऊन काका त्याला म्हणाले, " सगळं ठीक होईल." मी दूर झालें व हातगाडी बरीच पुढें गेली होती म्हणून पाऊल घाईनं उचललं. " मला फार भय वाटतं ! " असे टोनीचे शब्द माझ्या कानीं पडले. ते ऐकून माझ्या मनांत आलं, मोटरसायकलवरचं काम करतांना मरणाच्या अंगणांत रोज बेडरपणें खेळणारा टोनी हरिणीच्या ऑपरेशनच्या नुसत्या कल्पनेनं भिऊन रडूं लागावा ? माणसाचं अंतःकरण प्रेमानं हळवं झालेलं असलं की त्याच्या अंगी कसा भित्रेपणा येतो पहा. मनाशीं हा विचार करीत मी भराभर पावलं टाकीत होतें. माझ्या मागून फरशीवर होणारे बुटांचे आवाज मला ऐकू आले. टोनी आणि काका ऑपरेशनच्या जागेकडे येत होते हें मीं ओळखलं.

ऑपरेशनच्या खोलीत मी गेलें. टोनी आणि काकाहि आंत आले, पण दूर अंतरावर उभे राहिले. हरिणीला टेबलावर टेवण्यांत आलं क्लोरोफॉर्म देणारा तिच्या उशागती उभा राहिला. एकदां माझ्याकडे व एकदां दूर उभे असलेले टोनी आणि काका यांच्याकडे बघून डॉक्टरनीं विचारलं, " कुणाला वांचविण्याचा जास्त प्रयत्न करूं ? मुलाला की आईला ? " माझ्या तोंडून चटकन् उत्तर गेलं नाहीं. टोनीनं तर उत्तर देण्याऐवजी " माय गॉड ! " येवढाच उद्‌गार काढला. पण डॉक्टरांचा प्रश्न हरिणीनं ऐकला होता, आणि ती मात्र अगदीं स्पष्ट आवाजांत म्हणाली, " कुणालाच वांचवूं नका डॉक्टर. आम्हाला दोघांनाहि मरूं द्या. तुमची बडी मेहेरबानी होईल. मी तुमची प्रार्थना करतें—" पण पुढचे शब्द तिच्या तोंडून बाहेर पडले नाहीत. कारण तिची ती बोलण्याची तऱ्हा पाहून डॉक्टरांनीं माझ्याकडे पाहून अगदी किंचित् हास्य केलं, नंतर लगेच क्लोरोफॉर्मवाल्याला खूण केली, आणि त्या माणसानं हरिणीच्या नाकातोंडावर यंत्राची वाटी टेकली...

ऑपरेशन करतांना डॉक्टरांची जी खटपट चालली होती ती पाहून माझ्या तोंडचं पाणी पळालं. हरिणी आणि तिचं मूल यापैकीं कोणीच हातीं लागणार नाहीं असं लक्षण मला दिसूं लागलं. मी पुनःपुन्हां खोलीच्याबाहेर ऱ्हरां-



६......

ड्यांत येत होतें, कटड्याच्या खांबाला रेलून उभी रहात होतें, आवारांतल्या लिंबाच्या झाडाकडे पहात आंसव गाळीत होतें, व्हरांड्याच्या टोकाला दूर टोनी आणि काका उभे होते, त्यांना माझं रडणं दिसतां कामा नये हा विचार मनांत आला की चटकन डोळे पुसून पुन्हां आंत जात होतें ! आंत गेले की पुन्हां घामाघूम होऊन झटापट करणारे डॉक्टर मला दिसत, हत्यारांचा आवाज ऐकूं येई, माझा सारा धीर खचून जाई...

पण अखेर हा मनाचा ताण एकदांचा संपला. हरिणीचं मूल सुखरूप जन्मलं. तिला मुलगा झाला ही विशेषच आनंदाची गोष्ट होती. आणि ती स्वतःदेखील सुखरूप राहिली होती मी धांवत बाहेर गेलें आणि ती बातमी टोनीला आणि काकाना सांगितली...हरिणीला पंधरा दिवस इस्पितळांत रहातां यावं म्हणून काकांनी सर्कसचा मुक्काम आठ दिवस वाढविला. आमचा मुक्काम त्या गावाहून हालला तेव्हां तिचा प्रवास अगदीं सुखाचा व्हावा असाहि बंदोबस्त त्यांनीं केला. मला वाटलं हरिणी आतां पूर्वीसारखी आनंदानं वागूं लागेल. दीड दोन महिन्यांच्या विश्रांतिनंतर ती आपलं मोटरसायकलीवरचं कामदेखील करूं लागेल...

पण हळुहळुं असं दिसून येऊं लागलं कीं बाळंतपणाच्या वेळच्या त्या ऑपरेशनमध्यें हरिणीच्या एका नाजुक ठिकाणच्या हाडाला इजा पोंचली होती. वेगानं चालणं, धांवणं या गोष्टी तिच्यानं होण्यासारख्या नव्हत्या. मोटरसायकलीवरच्या कामाची तर गोष्टच सोडा, पण कसरतीचं कोणतंहि तोलाचं काम तिच्या हातून होण्याजोगं नव्हतं. तिच्या पायात उत्पन्न झालेल्या या दोषाची शंका आल्याबरोबर शक्य तितक्या उत्तम डॉक्टरी सल्ल्याची आणि उपचारांची व्यवस्था करण्यांत आली. परंतु याचा कांहीं उपयोग होईल असं लक्षण दिसेना. हरिणीचा पहिला आनंदी खेळकर स्वभाव पुन्हां परत येईल अशी आशा करतां येईना. आपण गर्भार आहोंत हें कळल्यापासून तिचा जो संतापी आणि चिडखोर स्वभाव बनला होता त्याला या नव्या घटनेचं खाद्य मिळून तिच्या स्वभावाची आणि संतापाची आणखीच घट्ट निरगांठ बसूं लागली...

मालकांशीं, काकांशीं, माझ्याशीं सगळ्यांशीच ती फार चमत्कारिक वागूं

लागली. बापाला ती इतक्या शिव्या मोजी कीं तो तिच्यापुढें उभा राहिनासा झाला. शेवटीं बिचारा आमचा मुक्काम सिंधमध्यें लारखान्याला असतांना मेला. सुटला. टोनीशींदेखील ती इतकी सतत भांडायला लागली कीं तिच्याशीं प्रेमानं वागणं, तिला संभाळणं त्याला कठीण जाऊं लागलं. तिच्या मुलाला जन्म देणारा तो होता, हा एकच त्यानं तिच्या दृष्टीनं येवढा भयंकर अपराध केला होता कीं त्या अपराधाला क्षमाच नव्हती. " तूं माझ्या आयुष्याचं वाटोळं केलंस ! " ती त्याला संतापानं म्हणे, " आतां तुझ्या कामांतली जोडीदारीण म्हणून माझा उपयोग राहिला नाहीं. साधी संसारांतील जोडीदारीण म्हणूनहि राहिला नाहीं. तुझी माझी जोडी फुटली. तूं फोडलीस. मला माहीत आहे आतां लवकरच तूं दुसरी एखादी मुलगी बघशील, तिला तयार करशील, आणि मग केवळ तुझा आणि तिचा बटीकपणा करणं एवढंच काम माझ्या नशिबी येईल. आणि तेंसुद्धां तूं माझ्याजवळ राहिलास तर. पण मला ठाऊक आहे कीं तूं रहायचा नाहींस. तूं मला टाकून केव्हां तरी जाणार हें स्वप्न मला केव्हांच पडलं आहे. माझ्यावर दया करणार असशील तर येवढीच कर कीं लवकर जा. माझ्या खराब नशिबाशीं झगडायला मला एकटीला सोडून लवकर नाहींसा हो. माझ्या नजरेपुढून लवकर जा. ऐकलंस ? चालता हो ! जा !..."

टोनी खरोखर फार चांगल्या स्वभावाचा मुलगा. हरिणीनं अशा प्रकारचीं कितीहि दुरुत्तरं केलीं तरी तो तिला जवळ घेई आणि तिची समजूत घाली. पोटासाठीं काम करण्यावांचून त्याला गत्यंतर नव्हतं, आणि कामासाठीं दुसरी जोडीदारीण शोधून तिला तयार करणंहि त्याला भाग होतं. पण तो हरिणीला वरचेवर सांगे, " तुला मी कधीं कधीं अंतर देणार नाहीं. मी सदा तुझा राहीन. तुला नेहमी माझी समजेन. ..."

पण त्याचं हें सारं बोलणं पालथ्या घड्यावरच्या पाण्यासारखं होई. शांतपणा आणि सुविचार या गोष्टी जणूं हरिणीच्या ठिकाणीं शिल्लकच उरल्या नव्हत्या. आपलं सर्कसमधलं पूर्वीचं आयुष्य आता कायमचं संपलं, आपल्या आयुष्याची आतां खराबी झाली, आणि या दुर्दैवाला कारण टोनी आणि आपल्या पोटीं आलेला मुलगा गोपाल हे दोघं असल्यामुळें त्यांचा आपण द्वेष आणि तिरस्कारच

केला पाहिजे— या समजुतीचा असा कांहीं घट्ट पगडा तिच्या मनावर बसला होता कीं सांगतां सोय नाहीं. त्यामुळें तिला वाटे कीं आपण कितीहि चिडखोरपणानं आणि संतापानं वागलों, स्वतःच्या जीवाचा जळफळाट करून घेतला, दुसऱ्या माणसाला वेडंवाकडं बोललों तरी तें बरोबरच आहे.

हें सारं पाहून माझा जीव कासावीस होत असे. आणि मी तिची समजूत घालण्याचा परोपरीनं यत्न करीत असे. तिचं आयुष्य बदललं होतं यांत संशयच नव्हता पण ज्या कारणानं हा बदल घडून आला होता तें कुणी काय मुद्दाम घडवून आणलं होतं? ज्याच्यापुढं इलाज नाही अशा गोष्टी माणसाच्या आयुष्यांत घडायच्याच. त्या घडल्या कीं ज्या सुखाला आपण मुकलों तें गेल्याच्या वैतागांत जें हातांत उरलेलं आहे तेंहि त्याबरोबर उगाचच्या उगाच फेंकून द्यायचं काय? जे हातीं राहिलं तेवढं तरी आतां नेहमीं कसं मिळेल याचा विचार आणि प्रयत्न करायला नको काय? " नीट विचार केलास " मी हरिणीला जवळ घेऊन सांगत असे, "तर अजूनहि किती तरी सुख तुझ्या आयुष्यांत आहे. टोनीसारखा विचारी आणि प्रेमळ जोडीदार तुला मिळाला आहे. असं भाग्य फार थोड्यांच्या वाट्याला येतं. टोनीच्या जागी एखादा दुसरा पुरुष असता तर तो केव्हांच त्रासून कंटाळून तुला टाकून चालता झाला असता. पण त्याचं तुझ्यावर फार प्रेम आहे. असा पुरुष तुला मिळाला ही इतकी भाग्याची गोष्ट आहे कीं या एकाच सुखाच्या संगतींत तुला कोणत्याहि दुःखाची किंवा संकटाची पर्वा वाटूं नये. " तान्ह्या गोपालाला मीं माझ्या मांडीवर घेतलेलं असे. मीं चुटकी वाजवली कीं गुलाम हंसायचा आणि माझीं बोटं पकडायसाठीं आपल्या लुसलुशित व तांबूस हातांच्या घट्ट मिटलेल्या मुठी वर करायचा त्याच्याकडे बोट दाखवून मी हरिणीला म्हणे, "बघ बघ तरी किती सुंदर मूल देवानं तुला दिलंय. मी तुझ्या जागी असतें तर याच्यावर अशी माया केली असती की केवळ याच्यासाठीं उरलेलं सर्व आयुष्य खर्चतांना दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीचं भानच मला राहिलं नसतं..."

एकदां माझं असलं बोलणं ऐकून हरिणी मला चट्कन म्हणाली, " मग ठेवा कीं त्याला तुमच्याजवळ आणि संभाळा. नाहीं तरी मीं त्याला तुमच्याच

ओटींत घातला आहे. मला तो कुठें हवा आहे? हें पोर म्हणजे माझं साता जन्मींचं वैरी आहे. त्याला पाहून मला मायेचा पान्हा अगदीं फुटत नाहीं. हें जन्मलं तेव्हा मी शुद्धीवर असतें तर तेव्हांच याच्या गळ्याला नख लावून—"

तिच्या त्या बोलण्याचा मला इतका संताप आला कीं वाटलं घोड्याचा चाबूक घ्यावा आणि या हट्टी मुलीला फोडून काढावं. माझ्या मनांतला हा विचार माझ्या नजरेंत दिसला असावा. कारण ती एकदम गप्प झाली, व तिनं मान खालीं घातली. मीं म्हटलं, "असं बोलण्याची अन् वागण्याची तुला शरम कशी वाटत नाहीं?" ती गप्प राहिली. मीं पुढें म्हटलं, "तूं आपलं वागणं सुधारलं नाहीस तर काय काय परिणाम होतील तें मला दिसतंय. टोनी एक दिवस तुला सोडून जाईल. तुझा छळ तो किती दिवस सहन करील? कांहा एका मर्यादेपलीकडे पुरुषांचा सोशिकपणा उरत नाही. टोनी निघून गेला तर तुझी काय अवस्था होईल याचा कधीं विचार करतेस काय?" तिच्या हट्टीपणावर तडाखे उडवायसाठी तिला वाईट वाईट बोलायची माझी इच्छा माझ्या मनातून एकदम नाहीशी झाली. ही बारा वर्षांची पोर असतांना आमच्या सर्कशीत प्रथम आली तेव्हापासून आतांपर्यंत तिनं आपल्या गुणांनीं मला किती लळा लाविला होता तें आठवलं, तिच्या विषयींच्या माये-च्या उमाळ्यानं ऊर एकदम भरून आला, आणि मीं आपल्या डाव्या हातानं तिला झट्कन जवळ ओढून घेत म्हटलं, "पोरी! स्वतःचा असा घात करून घेऊं नकोस ग!"...

मी मग पुष्कळ वेळ तिच्याशीं बोलत राहिलें आणि तीहि शांतपणानं माझं बोलणं ऐकत राहिली. मला साहजिकच वाटलं कीं माझ्या बोलण्याचा तिच्या मनावर परिणाम झाला असावा. पण लौकरच मला कळून आलं कीं तो माझा भ्रम होता. तिनं माझं बोलणं शांतपणें ऐकलं तें तिला ते पटत होतं म्हणून नव्हे तर माझ्याशी वाद घालण्याची तिची इच्छा नव्हती म्हणून. दारूच्या व्यसनाच्या आहारीं गेलेला माणूस नाहीं का पुष्कळदां दुसऱ्याचा उपदेश शांतपणें ऐकून घेत? बोलणाऱ्या माणसाला वाटतं आपला उपदेश त्याला पटतो आहे, पण त्याला तो पटत नसतो, आपलं वागणं बदलायचं नाहीं हें त्यानं

पक्कं ठरविलेलं असतं म्हणून तो सारा उपदेश मुकाट्यानं ऐकतो. त्याचं पिणं चालूंच रहातं. हरिणीच्या बाबतींत हाच अनुभव मला आला. त्या दिवशीं माझं बोलणं ऐकतांना ती अगदीं गप्प राहिली खरी, पण तिच्या वागण्यांत कांहीं फरक झालेला मला दिसेना. अंगाचा तोल रहात नाहीं म्हणजे काय बिशाद, राहिलाच पाहिजे— असं म्हटलं कीं कसरतीचं कोणतंहि काम माणूस शिकूं शकतं; पण उलट तोल रहाणार नाहीं असं माणसाच्या मनानं एकदां घेतलं कीं तारेवर काय जमिनीवरसुद्धां चालणं त्याला साधायचं नाहीं. मनाच्या तोलाची गोष्ट अशीच आहे कीं काय कुणास ठाऊक ? बहुतेक अशीच असावी. कारण या हरिणीचंच पहाना. आपलं मन बेतोल होणार असं तिनं ठरविलं होतं आणि ती दिवसेंदिवस तोल सोडून भडकत होती...तिचं वागणं कांहीं सुधारत नाहीं हें पाहून मला सगळ्यांत मोठी चिंता वाटत होती ती ही कीं टोनी हिला एक दिवस टाकून जाईल...

माझी ही भीति अखेर खरी ठरली. आमचा मुक्काम कराचीस असतांना एके दिवशीं टोनी नाहींसा झाला ! केव्हां तरी ही गोष्ट घडणार हें मला गेल्या कित्येक दिवस दिसत होतं. पण तरी ती प्रत्यक्ष घडली तेव्हा मला अतिशय दुःख झालं. हरिणीनं हजारदां त्याच्याशीं भांडण करून त्याला शिव्या देऊन त्याला म्हटलं होतं, “ जा, चालता हो ! ” पण तो आतां खरोखर गेला तेव्हां त्या गोष्टीचं निमित्त करून ती डोकं पिटून घेऊं लागली. ‘ कसाई, चांडाळ ’ अशा त्याला शिव्या घालून ती म्हणूं लागली, “ मला असं टाकून त्याला जाववलं तरी कसं ? ” तिचं तें रडणं भेकणं ऐकून मला तिची काडीभर दया आली नाहीं. तिनं आपल्या आततायीपणानं आणि हट्टानं हें संकट स्वतः-वर ओढवून घेतलं होतं. यांत टोनीकडे कांहीं दोष नव्हता. सारा दोष या मूर्ख पोरीचा होता. मग तिची ती अवस्था पाहून माझं किंवा इतर कोणाचंहि मन द्रवणार कसं ?...

मात्र हरिणीबद्दल जरी मन द्रवलं नाहीं, उलट जाणून बुजून स्वतःच असा घात करून घेण्याच्या तिच्या मूर्खपणाचा थोडा रागच आला, तरी तिच्या तान्ह्या मुलाची एकदम फार दया वाटली. टोनीचं त्या मुलावर फार

प्रेम होतं. हरिणीवरचं त्याचं प्रेम तिच्या नवीन संतापीपणानं कदाचित् उडालं असेल. पण या अपत्यावर त्याचा जीव दिवसेंदिवस अधिक जडत गेलेला मी पाहिला होता. गोपालला टाकून जातांना त्याला किती दुःख झालं असेल तें मला ओळखतां येत होतं. दोनी गेल्यामुळें तें मूल आतां माये-विना उघडं पडलं होतं. कारण हरिणी त्याला प्रेमानं संभाळील वाढवील अशी शक्यता दिसत नव्हती...

याशिवाय दुसरीहि एक चिंता माझ्या मनांत येऊं लागली, व ती मी दौलतराव काकांना बोलून दाखविली तेव्हां तेदेखील तीच चिंता करीत होते असं दिसलं ही चिंता अशी की जिला कांहीच काम करतां येईनासं झालं होतं त्या हरिणीला आमचे मालक आणखी किती दिवस ठेवतील ? दौलतराव काका स्वभावानं फार उदार होते आणि हरिणीवर त्यांचा विशेष जीव होता. पण मालकांची गोष्ट निराळी होती. ते स्वभावानं कांहींसे करडे होते आणि शिवाय फार व्यवहारी होते. केवळ मोहब्बतीखातर ते हरिणीला जेवूं खाऊं घालून ठेवतील अशी अपेक्षा करतां येण्याजोगी नव्हती. ज्यांत शरीरकष्ट नाहीत असं कांही तरी काम तिला करायला सांगावं म्हणजे आठवड्याचे दहा बारा रुपये तरी तिला देतां येतील, मालकांची कांहीं कुरकूर रहाणार नाही, आणि गोपालला घेऊन ती आमच्यांत यापुढेहि कायमची राहूं शकेल असा आपण बेत केला असल्याचं काकांनी मला सांगितलं. हा बेत हरिणीला सांगून तिची संमति मिळविणं ही गोष्ट इतक्यांत करतां येण्या-सारखी नव्हती. कारण आमच्याशीं धड बोलून स्वतःच्या पुढच्या व्यवस्थेची आमच्याशी चर्चा करण्याइतकं तिचं मन ताळ्यावर कुठें होतं ? शिवाय काका जरी आपल्या अधिकारांत पुष्कळशा गोष्टी करूं शकत होते तरी हरिणीची व्यवस्था करण्याचा जो बेत त्यांनी मनाशी योजला होता तो मालक खुषीत आहेत असं पाहून केव्हां तरी त्यांच्या कानांवर घालायला पाहिजे होता. आणि तसं करूनहि त्याची परवानगी मिळेलच अशी कांहीं खात्री नव्हती या साऱ्या कारणासाठी मी आणि काका चिंतेंत होतों कीं हरिणीचं आणि तिच्या मुलाचं पुढें कसं व्हायचं ?

पण आमची ही चिंता हरिणीनं एके दिवशीं अकस्मात् संपविली !

कराचीहून आगबोटीनं निघून द्वारकेला जाण्याच्या गडबडींत आम्हीं सगळीजणं होतों सकाळच्या आगबोटीनं आम्ही सगळीं निघणार होतों आदल्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं 'लाइट हाऊस' बघायला जाण्याचा बेत ठरला. लाइट हाऊसवरचा मुख्य अधिकारी काकांच्या ओळखीचा झाला होता आणि त्यानं मुद्दाम आमंत्रण देऊन मोठ्या लॉरीतून आम्हांला नेण्याची आणि पोंचविण्याची व्यवस्था आपल्या खर्चानं केली होती. लॉरी आली तेव्हा आम्ही दहा पंधराजण निघालों. आमच्याबरोबर येण्याचा आग्रह मीं हरिणीला केला. पण ती तयार झाली नाहीं. मी निघालें तेव्हा ती मला म्हणाली, "गोपालला मात्र घेऊन जा." मीं त्याला चागले कपडे घातले, आणि त्याला कडेवर घेऊन निघालें. पण मीं निघालें तेव्हा ती म्हणाली, "मावशी, जरा इकडे दे त्याला. मी त्याला पाजवतें. म्हणजे तो रडणार नाही." कोणतीहि आई करील असंच तिचं तें करणं होतं. पण तिच्या त्या करण्याचं मला जरा आश्चर्य वाटलं. कारण गोपालच्या बाबतींत ती असा काही मूर्ख संतापीपणा करी व त्याच्याविषयी असा कांहीं तिरस्कार दाखवी की कितीदा तरी त्यानं जरी रडून आकांत केला तरी ती कांहीं त्याला पाजायला घेत नसे. तिच्या ह्या मूर्खपणाबद्दल आणि दुष्टपणाबद्दल मीं तिला राग भरले कीं ती म्हणे, 'त्याला पाजायची मला बिलकूल इच्छा नाहीं. त्याचं तोंड माझ्या अंगाला लागलं तरी दूध फुटतच नाहीं, बघ!" असं म्हणून ती मला आपला उघडा स्तन पिळून दाखवीत असे. आणि आश्चर्य असं की खरोखरीच तिच्या त्या भरदार वाटोळ्या स्तनाच्या टोंकाशीं फिकट पाढऱ्या रंगाचा उगीच चारकासा थेंब तेवढा आलेला दिसे कितीदा तरी गोपाल अगदी आक्रंदून रडूं लागला, व त्याला पदराखाली न घेण्याचा हट्ट हरिणीनं केला की मी तिला रागानं शिव्या देई, आणि अखेर त्या तान्हुल्याचं रडणं बघवेनासं झालं कीं त्याला उचलून घेऊन मी आपल्या पोटाशीं धरीत असे. माझ्या अंगावर त्याला दूध कुठून मिळणार ? पण तो नुसता चोखूं लागे आणि गप्प होई...

या साऱ्या गोष्टी आठवल्यामुळें गोपालला मुद्दाम माझ्याजवळून मागून

घेऊन त्याला पाजतें असं हरिणी म्हणाली तेव्हां मला साहजिकच आश्चर्य वाटलं. मीं तें बोलून दाखविलं नाहीं. पण माझ्या मनांत इतकंसुद्धां आलं कीं हिची माया जर अशी थोडी जागी झाली तर हळुहळुं हिचा स्वभाव आणि हिचं वागणं पूर्वस्थळावर येईलसुद्धां...मनांत असे विचार आल्यामुळें मी हरिणीकडे पाहून हंसलें. तीदेखील थोडी हंसली. पोटभर पिणं झाल्यावर गोपालनं मान वळवून तिच्याकडे पाहिलं आणि तो हंसला. तिनं झटकन् वांकून त्याचा मुका घेतला, त्याला मांडीवर उभा करीत ती त्याला म्हणाली, " आतां मावशीकडे जायचं बरं काय. " आणि मग त्याला माझ्या-कडे देतां देतां ती म्हणाली, " संभाळा ह. " मी त्याला घेतला आणि लॉरींत आधींच बसून तयार झालेली मंडळी माझी वाट पहात होती म्हणून हरिणीशीं अधिक कांहीं न बोलतां मी राहुटींतून बाहेर पडलें. लाईट हाऊसकडे जातांन तें ठिकाण पहातांना, आणि परत येतांना मी विशेष आनंदांत होतें. हरिणीनं आज आपण होऊन मुलाला प्यायला घेतलं होतं. माझ्या मतानं हें एक मोठं सुचिन्ह होतं...

परंतु आम्ही परत आलों आणि गोपालला परत देण्यासाठी म्हणून मी हरिणीच्या राहुटींत गेलें, तों ती मला कॉटवर निजलेली दिसली नाहीं. मोरी-कडे गेली असेल अशा कल्पनेनं मी तिच्या कॉटवर बसून राहिलें. पण अर्धा तास झाला, पाऊण तास झाला, तरी ती आली नाहीं. मला हें जरा चम-त्कारिक वाटूं लागलं.आणि तितक्यांत माझ्या लक्षांत आलं कीं राहुटीच्या खांबांना बांधलेल्या आडव्या दोरीवर हरिणीचे कपडे टाकलेले नेहमीं दिसायचे ते दिसत नव्हते. मी चट्कन कॉटवरून उठलें आणि कॉटखाली डोकावून पाहिलं. हरिणीचो ट्रंक उघडी होती आणि ट्रंक मधले बरेच कपडे दिसत नव्हते, व जे होते त्यांच्या घड्या उसकटून घाईनं कोंबल्यासारखे दिसत होते. मी झट्कन तिच्या टेबलापाशी गेलें आणि ड्रॉवर उघडले. कागदांचे चिटोरे, फेस पावडरचं रिकामं खोकं, दोन फाटलेले डागळलेले रुमाल, गोपालच्या तोंडांत द्यायचं रबरी बूच, अशा वस्तूंखेरीज दुसरं कांहीं त्या ड्रॉवरमध्यें नव्हतं. मीं वळून अिकडे तिकडे पाहिलं तों सॅडलच्या अेका फाटक्या जोडीशिवाय तिच्या बुटांच्या

बाकीच्या जोड्या मला दिसेनात...चार घटकांपूर्वी मी गोपालला घेऊन निघालें तेव्हां तिनें मुद्दाम त्याला प्यायला घेतलं होतं या गोष्टीचा, आणि त्याला माझ्याकडे देतांना 'संभाळा' असा उद्‌गार काढला होता त्या उद्‌गाराचा भयंकर अर्थ माझ्या मनांत एकदम आला. आणि तो आल्याबरोबर माझ्या हृदयाचं पाणीच झाल !...

मीं मनांतून देवाची प्रार्थना केली कीं माझी शंका खोटी ठरूं दे. परंतु जें होऊं नये असं मी देवाला विनवीत होतें तें होऊन गेलं होतं. आतां माझ्या प्रार्थनेचा काय उपयोग होता ? आणखी असल्या प्रार्थना देवानं ऐकल्या असं तरी कधीं होतं ? मी काकांच्या राहुटीकडे धांवलें. आजचा रात्रीचा खेळ अखेरचा होता. सकाळीं मुक्काम हालायचा होता. तोसुद्धां आगबोटीनं. त्यामुळें काका मनस्वी कामांत होते. तरीसुद्धां माझी शंका त्यांना सांगितल्याबरोबर हातांतलं सारं काम टाकून मालकांची मोटर घेऊन तें पोलीस ठाण्यावर गेले. हरिणी पोलिसांच्या नजरेस कुठें तरी पडेल व ते तिला आणतील अशा विचारानं स्वस्थ बसण्यापलीकडे दुसरं कांहींच आमच्या हातांत नव्हतं. आणि मालकांच्या मतानं तर पोलीस हरिणीला आणतील अशी आशा करणारे आम्ही मूर्खच होतों. " हें बघ यशोदा " ते माझ्याकडे आणि काकांकडे बघत म्हणाले, " हें काय एखादं लहानसं का गांव आहे ? मुंबईच्या तोडीचं शहर झालं आहे हें आतां. पोलीस काय हरिणीचा मुद्दाम शोध करीत हिंडणार आहेत ? सहजगत्या त्यांना ती कुठें दिसली तर ते तिला आणतील. आणि एक हरवलेली बाई या अफाट शहरांत सहजासहजीं सांपडणं गाळांत पडलेली आंगठी सांपडण्याइतकंच कठीण आहे. आणखी असं पहा कीं हरिणी हरवली म्हणजे काय वाटबीट चुकून हरवली आहे ? जायचं म्हणून निघून गेली आहे ती. ती काय पोलिसांपुढें जाऊन मला वाट सांपडत नाहीं, मला घरीं पोंचवा असं म्हणणार आहे होय ? तुम्ही शहाणे असाल तर हरिणी कायमची नाहींशी झाली असं धरून चाला. आणि हें बघ यशोदा, तिचं तें पोर एखाद्या अनाथाश्रमांत ठेवून देऊं म्हणजे आपली जबाबदारी संपली. "

काकांनीं आणि मीं हरिणीचे भलते लाड केले व त्यामुळें ती अधिकाधिक मूर्ख आणि हट्टी होत गेली अशी मालकांची समजूत होती म्हणून ते असं बोलत होते ते कितीदां तरी आमच्या जवळ म्हणाले होते, "माझ्या स्वाधीन करा तिला. हंटरनं फोडून काढतो अन् कशी ताळ्यावर येत नाहीं ते पहातों." हरिणीवर मालकाचं प्रेम नव्हतं असं नव्हे, ती सर्कशींत दाखल झाल्यापासून तिच्या हुशारीचं त्यांनी नेहमीं कौतुक केलं होतं. पण त्याच्या प्रेमळपणाची तऱ्हा आमच्याहून वेगळी होती. कुणाचे भलते लाड त्यांच्याजवळ चालत नसत. मी मूळ त्यांच्या गांवची, आणि आज इतकी वर्षे त्यांच्याजवळ होतें, पण ज्यामुळें ते रागावतील असं कांही करण्याची छाती नव्हती माझी. एक दोनदां त्यांच्याकडून मला मार खावा लागला होता. ते माया करीत. पण त्या मायेच्या आहारीं जाणारे ते नव्हते हरिणीच्या स्वभावाला लागलेलं संतापीपणाचं आणि हट्टीपणाचं वळण कांही केलं तरी बदलणार नाहीं अशी जेव्हां त्यांची खात्री झाली तेव्हांपासून त्यानी तिचा विषय सोडून दिला होता. त्यामुळें हरिणी नाहींशी झाली हे कळल्यावर दौलतराव काकांची जशी चिंतेनं आणि दुःखानं धांदल उडाली होती तशी मालकांची उडाली नव्हती. उलट बरं झालं ब्याद गेली एकदांची, अशाच कांहींशा विचारानं ते बोलूं लागले होते...तेव्हा हरिणी पोलिसांना सापडेल अशी आशा ठेवण्याबद्दल त्यांनीं मला आणि काकांना वेड्यांत काढलं हें पाहून मला कांहीं आश्चर्य वाटलं नाहीं...पण गोपालला अनाथाश्रमांत पोंचवून टाकूं असे उद्गार त्यांनीं काढले तेव्हां मात्र मला त्याचा फार राग आला.

मीं म्हटलं, " ही गोष्ट मात्र मी ऐकणार नाहीं हं. "

मालकांनीं विचारलं, " ऐकणार नाहींस तर त्या पोराला कायमचा संभाळणार आहेस काय तूं ? "

" तुम्हाला शंका वाटते कीं काय ? " डोळे मोठमोठे करून त्यांच्याकडे बघत मीं म्हटलं.

हरिणी जर खरोखर नाहींशी झाली तर त्याचा संभाळ करण्याचा माझा किती दृढ निश्चय होता तें माझ्या या उद्गारांवरून मालकांनीं पुरतं ओळखलं

असलं पाहिजे. कारण ज्या वेळेस मीं हे उद्गार काढले त्या वेळेस तर ते गप्प राहिलेच, परंतु पुढें दिवसांमागून दिवस गेले, हरिणीचा शोध लागला नाहीं, आणि ती आतां कधीं परत येणार नाहीं असं मानणं आम्हांला हळु हळुं भाग पडलं तेव्हांसुद्धां गोपालचा संभाळ करण्याच्या माझ्या इच्छेविरुद्ध त्यांनीं तोंडातून कधी शब्द काढला नाहीं. एक दोन वेळां ते काकांच्या जवळ थट्टेनं फक्त इतकंच म्हणाले, " या यशोदाला मूल झालं नाहीं. तिची हौस राहिलीच होती. बरं झालं हरिणीचा हा मुलगा तिला संभाळायला मिळाला. त्याला नाहीं आई, हिला नाहीं मूल बरी गांठ पडली ! "

सर्कसमधलीं सारींच माणसं मला मावशी म्हणत असत. त्यामुळें साहजिकच गोपालला बोलता येऊं लागलं तेव्हां तोदेखील मावशी म्हणूनच मला हांक मारूं लागला. मावशी आणि आई या दोन शब्दांतला फरक त्याच्या बालबुद्धीला कळत नव्हता तंवर ठीक होतं. परंतु मुलांचं लहानपण संपायला लागतं तसतसा त्यांच्या मनाचा अनोखेपणाहि संपतो किंवा खरं म्हणजे भोंवतालचीं माणसं तो संपावितात. अशा पुष्कळशा गोष्टी अडतात कीं लहान मुलं त्यांबद्दल आपणहून कधीं चौकसपणा दाखवीत नाहींत, पण भोंवतालचीं माणसं त्याचा चौकसपणा जागा करतात. सहज गंमत म्हणून तीं माणसं कांहीं तरी विचारतात, त्या प्रश्नांनीं मुलं गांगरलीं कीं आपली करमणूक करून घेतात, आणि त्या मुलाच्या मनांत केवढा गोंधळ आपण उत्पन्न करतों त्याची फिकीर त्यांना नसते सर्कस म्हणजे तर एक प्रकारची चावडीच. तिथें कोण कुणाजवळ काय बोलेल याचा नियम असतो काय? आपल्याला आई बाप नाहींत हा विचार पोरक्या मुलापासून दूर ठेवण्यासारखं दुसरं अवघड काम नसेल आपला बाप आणि आपली आई आपल्याला टाकून गेली आहे ही गोष्ट गोपालपासून मी काहीं जन्मभर लपविणार नव्हतें. केव्हा तरी ती त्याला समजणार होती पण मला वाटे लहानपणीं त्याच्या कोंवळ्या मनाला या विचाराचा धक्का बसूं नये म्हणून त्याच्याशीं मी फार काळजीनें वागत असे. पण तो कांहीं चोवीस तास माझ्याजवळ नसे. मधून मधून कुणाजवळ तरी संभाळायला म्हणून त्याला देणं मला भाग पडे; किंवा तो हिंडूं फिरूं लागल्यावर तो आपणहून खेळायला म्हणून इकडे तिकडे जाई.

असा तो गेला म्हणजे कुणी तरी त्याच्याजवळ कांहीं तरी बोलत, आणि त्या बोलण्यानं त्याचं मन गोंधळून गेलं कीं माझ्याकडे परत आल्यावर तो मला कांहीं तरी प्रश्न करी. " मावशी, मी आई कुणाला म्हणूं ग ? " " मावशी, हिरा म्हणते मला बाप नाहीं हें खरं का ग ? बापावांचून मूल असतं का कधीं ? "—असे प्रश्न त्यानं केले कीं मी त्याला म्हणे, " गोपाल, असल्या गोष्टी तुझ्याजवळ कुणी बोललं तर तूं ऐकत जाऊं नकोस. " पण अशा मलमपट्ट्या मी किती दिवस बांधणार असं मला हलके हलके वाटूं लागलं, आणि मग एके दिवशीं मी त्याला जवळ घेऊन खरी हकीगत सांगून टाकली. त्या वेळेपासून कुणी त्याची चेष्टा केली की तो म्हणे, " मला सारं माहीत आहे. मला उगीच नका चिडवूं. माझे आईबाप नसले तरी मला काय कमी आहे ? मावशी नाहीं काय मला ? "

गोपाल मोठा होऊं लागला तेव्हां सर्कसच्या जगांत राहाला योग्य असे गुण त्याच्या अंगीं उपजतच होते, ही गोष्ट उघड होऊं लागली. हरिणीचं बाळंतपण नैसर्गिक रीतीनं झालं नव्हतं शस्त्रक्रिया करावी लागली होती डॉक्टरांच्या चिमट्याचे दोन मोठाले वण गोपालच्या कपाळाच्या दोन्ही बाजूंस राहिलेले होते. परंतु येवढे वण सोडले तर त्याच्या चेहऱ्यांत तर कांहीं व्यंग नव्हतंच, पण तब्येतींतहि नव्हतं मी त्याला हौसेनं कपडेलत्ते ि वीत असे. पण मला आटवड्याला सारे दहा तर रुपये मिळत मी कितीशी हौस करणार ? पण गोपालचं शरीर जात्याच असं सुदृढ होतं की एक कुडतं आणि एक चड्डी घातली तरी तो गोंडस दिसे आईबापांच्या मायेला तो पारखा झाला होता. पण सर्कशीच्या साऱ्याच माणसांची माया त्यानं लावून घेतली होती. दिवसभर तो कोणाच्या तरी राहुटींत असे. तालमी चालल्या तर तंबूंत असे, जंगली जनावरांच्या पिंजऱ्यांपुढें घोंटाळत असे, कुत्र्या-माकडांशीं खेळत असे, घोड्यांच्या तबेल्यांत रेंगाळत असे. त्याच्या वयाच्या मानानं जीं कामं त्याला शिकविण्यासारखीं होतीं तीं त्याला कोण शिकवी आणि तो केव्हां शिके त्याचा मला पत्तासुद्धां लागत नसे. एके दिवशीं विदूषकांच्या नंबरांत तोंडाला रंग फासून तो रंगणांत गेला आणि वांकड्या तिकड्या उड्या

मारूं लागला, आणि इतका विलक्षण छोटा विदूषक दृष्टीस पडल्याबरोबर प्रेक्षकांत कडकडून टाळी झाली तेव्हां मी थक्कच झालें. मी मालकांना चेष्टेनें म्हटलं, " आतां या पोराला आठवड्याचा पगार किती देतां, सांगा ? " ते हंसले व म्हणाले, " एखादा रुपाया द्यायला कांही हरकत नाहीं. " इतर कोणाला ऐकूं जाणार नाहीं अशा बेतानं मीं त्यांना म्हटलं, " तुमच्यासारखा मारवाडी दुसरा नसेल कुठें ! इतकं सुंदर हें पोर काम करतंय आणखी तुम्ही उदार होऊन एक रुपाया द्यायचा म्हणतां होय ? " पण हें सारं चेष्टेचं बोलणं होतं. सर्कसच्या जगांत जगायची लायकी गोपालच्या अंगीं आहे हें पाहून माझी एक काळजी संपल्यासारखं मला वाटत होतं मला त्रास होई तो एका गोष्टीचा की तो केव्हां कुठें असे त्याचा नियम नसे, आणि चहा-साठीं, आंघोळीसाठीं, जेवणासाठीं, आणि झोंपायसाठींसुद्धां त्याला दहा ठिकाणीं शोधावं तेव्हां तो मला सांपडत असे...

आत्तां चहा तयार करून " गोपाल ! गोपाल ! " अशा हांका मारीत मी राहुटीबाहेर आलें तेव्हांसुद्धां मी मनाशीं म्हणत होतें, आतां या पोराला कुठें कुठें शोधायचं. आवारांत सगळीकडे हिंडेन तेव्हाच स्वारी सांपडेल हें मला माहीत होतं. मी बाहेर आलें आणि इकडे तिकडे दृष्टी टाकली तेव्हां बॅंड-वाल्यांच्या तंबूपुढें महंमदच्या मांडीवर बसलेला तो मला दिसला. दोन्ही हातांत टिपऱ्या घेऊन ड्रमवर टऽटर टऽटर असा आवाज काढण्यांत स्वारी गुंग होऊन गेली होती. त्याच्या झुलपावर ऊन पडलं होतं आणि वाऱ्याच्या झुळुके-बरोबर ती झुलपं भुरुभुरु हालत होतीं...गोपालचं तें गोजिरवाणं रूप पहात मी जागच्या जागीं उभी राहिलें. आणि पहातां पहातां माझ्या मनांत एकदम आलं याला पहायला आणि याचं कौतुक करायला याचे आईबाप इथें नसावेत हें केवढं दुर्दैव !...

" गोपाल ! गोपाल ! " अशा मीं हांका मारल्या. पण त्या त्याच्या गांवीं देखील नव्हत्या. महंमदनं त्याला सांगितलं, " मावशी तुला हाक मारते आहे बघ. " पण तो कांहीं ऐकेना. त्याचं टऽटर टऽटर सुरूंच राहिलं. शेवटीं महंमदनं त्याच्या हातांतल्या टिपऱ्या काढून घेतल्या तेव्हां तो उठला. पण दूर

होतां होतां तोंडानं पिरिक् पिरिक् असा फाजील आवाज काढून, नाक खाज-वून महंमदला वेडावून दाखवायला तो चुकला नाहीं. महंमदनं टिपरी उगा-रली तेव्हां मात्र धांवत येऊन त्यानं माझ्या कमरेला विळखा घातला.

रोटी खातां खातां आणि चहा पितां पितां तो म्हणाला, "मावशी, मी आतां ड्रम वाजवायला शिकतों आहे."

"होय, तें पाहिलंच मीं" मी म्हटलं, "तूं शिकणार आहेस तरी काय काय ?"

तो अगदी गंभीर चेहऱ्यानं म्हणाला, "सारीं कामं शिकणार आहे ! घोड्यावर बसायला, सिंगलबारवरचं काम करायला—" तो हाताचीं बोटं दुमडून मोजायला लागला.

मीं त्याला म्हटलं, "बरं बरं. आधीं बशींतून चहा न सांडतां प्यायला शिका आपण !"

माझी चेष्टा न कळल्यामुळें तो माझ्याकडे पहात राहिला तेव्हां मी झट्कन त्याला जवळ घेतलं आणि त्याच्या खरकट्या तोंडाचा मुका घेतला. त्याच्या तोंडाला चिकटलेले रोटीचे तुकडे माझ्या तोंडांत आले, ते मी थुंकूं लागलें तेव्हां तो मोटमोठ्यांदां हसूं लागला, व त्यानं तोंडानं पिरिक् पिरिक् असा विदूषकी आवाज काढला. मीं हात उगारून रागानं म्हटलं, "गोप्या ! असला आवाज सदा करायचा नाही हं ?"

★ ★ ★

## २

मला वाटलं होतं कीं गोपालचा स्वभाव व्रात्य आणि द्वाड होईल. पण तो जसजसा वाढूं लागला तसतसा त्याच्या अंगांतला हूडपणा नाहींसा होऊं लागला. बेडरपणा त्याच्या ठिकाणीं होता. पण दुसऱ्याला उगीच उपद्रव देण्यांत तो कधीं व्यक्त होत नसे. एखादं नवं कसरतीचं काम तो शिकूं लागला म्हणजे तेवढी त्याची ही बेडरवृत्ति दिसून येई. लहानपणीं सारींच कामं शिकायची त्याच्या मनाची धांव असे ती आतां तशी राहिली नव्हती. फक्त दोनच गोष्टींत तो आवडीनं लक्ष घाली. त्यांपैकी एक म्हणजे विदूषकाचं काम आणि दुसरी म्हणजे सरकशींतलीं घोडीं !

विदूषकाच्या कामाची त्याला खरोखर उपजतच देणगी होती. सर्कशींतल्या विदूषकांच्या पुष्कळशा चेष्टा ठरींव ठशाच्या असतात. या चेष्टा आणि अंग-विक्षेप विदूषकांच्या पिढयान्‌पिढया करीत आलेल्या आहेत. तुम्ही कोणतीहि सर्कस बघा, तिच्यांत तुम्हांला या पहायला सांपडतील. विदूषकानं आपल्या नाकावर लाल रंगाचा ठिपका द्यायचा हें जसं ठरलेलं त्याप्रमाणेंच तोंडानं काढण्याचा पिरिक् पिरिक् आवाज, पडणं धडपडणं, वांकुल्या दाखविणं,

जरासे चावटपणाचे अंगविक्षेप करणं या गोष्टीदेखील ठरून गेल्यासारख्या असतात. सर्कसमध्यें कांहीं दिवस काढले कीं कोणतंहि पोर या गोष्टी करूं लागतं. त्यामुळें गोपाल त्या करूं लागला तेव्हां मला येवढंच आश्चर्य वाटलं कीं इतक्या लहान वयात या गोष्टी तो इतक्या सफाईनं कशा करतो? म्हणजे त्यानं विदूषकी चाळे केले या गोष्टीचा नव्हे तर ते अगदी बालपणीं केले या गोष्टीचं मला आश्चर्य आणि कौतुक वाटलं. पण तो मोठा झाला तसतसं हें उघड दिसूं लागलं की विदूषकाचं काम करण्याची त्याला मनस्वी हौस होती, आणि तें काम करतांना केवळ वर्षानुवर्षे चालत आलेल्या टिवल्या बावल्या करण्याऐवजीं कांही तरी नवीन गंमत करून लोकांना हंसविण्याची त्याची खटपट असे, आणि ही गंमत अशी असे कीं ती त्याला आयत्या वेळीं सुचली असावी हें उघड दिसे. आणि कधीं कधीं एखादी गंमत त्यानं अगाऊ योजून ठेवलेली असे पण आम्हांला कोणाला त्यानं ती सांगून ठेवलेली नसे, व ती पाहिली कीं प्रेक्षकांप्रमाणेंच आमची देखील हंसून हंसून मुरकुंडी वळत असे. एकदां मालकानीं चार छोट्या तट्टांचा नंबर घेतला, तो आटपल्यावर तट्टांनीं टाकलेली लीद नोकर खरवडून काढूं लागले, त्याबरोबर विदूषकाच्या पोषाखांतला गोपाल रिंगमधें धांवत गेला आणि नोकरावर ओरडूं लागला, “अरे, अरे इतकी सुंदर ताजी मिठाई खुशाल केरासारखी फावड्यानं ओढतां, तुम्हांला कांहीं वाटत नाहीं?” आणि असं ओरडता ओरडतां स्वतःच्या मुठींत येईल तेवढी लीद उचलून तो ती आपल्या खिशामध्यें भरूं लागला, व मधून मधून ती तोंडात टाकल्यासारखं करून मिटक्या मारूं लागला तें पाहून अर्थातच लोक खद्‌खदां हंसत सुटले. जमिनीवर बसलेला एक म्हातारा ओरडला, “अरे घोड्याची लीद खातो काय?”

गोपाल त्याच्याजवळ गेला आणि म्हणाला, “वा, मामा! मी चांगली मिठाई खातो आहे आणि तुम्ही तिला लीद म्हणतां होय?”

त्या म्हाताऱ्यानं प्रतिपादलं, “अरे बेट्या, सरळ लीदच खातो आहेस कीं!”

“लीद?” असं विचारीत गोपाल पुढें झाला आणि त्या म्हाताऱ्याला

उठवीत रंगणांत आणून म्हणाला, " मामा, आमची ही सर्कस अशी तशी नाहीं. "

तो काय म्हणणार तें लक्षांत न आल्यामुळें तो म्हातारा आ वासून उभा राहिला.

गोपाल म्हणाला, " आमच्या सर्कशीचं नांव माहीत आहे ना ? द ग्रेट रॉयल सर्कस म्हणतात हिला. फालतु सर्कस नाहीं ही. बादशाही सर्कस आहे. या सर्कशींतली घोडीं लीद नाही हागत. पेढे हागतात, पेढे ! " तें ऐकल्या-बरोबर तंबूंत प्रचंड हंशा झाला.

त्या म्हाताऱ्याला गदगदां हालवून गोपाल पुढें म्हणाला, " मामा, तुमच्या गांवांतले हलवाई आमच्या तबेल्यांत पडलेली मिठाई घेऊन जातात आणि पराती भरून ठेवतात माहीत आहे काय ? "

त्या बरोबर लोक आणखी गदगदून हंसले. गर्दीतला एक वात्रट माणूस ओरडला, " अरे खाऊं घाल, खाऊं घाल मामाला ती मिठाई. "

त्या माणसाकडे पाहून गोपाल म्हणाला, " हां हां खाऊं घालणारच आहे. त्यासाठीं तर मामाला रंगणात आणला आहे. " मग तो म्हाताऱ्याकडे पाहून म्हणाला, " मामा, लई नामी मिठाई आहे माझ्या खिशांत. जरा टेस्ट घेऊन बघा ! " त्यानं खिशांत हात खुपसला, मूठ भरून बाहेर काढली आणि म्हाताऱ्याच्या तोंडांत कोंबायला सुरुवात केली.

" अरे ए ! ए ! " असं ओरडून म्हाताऱ्यानं धूम ठोकली आणि आपली जागा गांटली. लोक हंसत सुटले.

" आतां काय म्हणावं या वेड्या मामाला ? त्याला काय मी मिठाई देत नव्हतों ? ही बघा ! " असं म्हणून गोपालनं मूठ उघडून दाखविली. खरो-खरच सात आठ पेढे होते त्याच्या मुठींत ! ते पहातांच लोकांनीं टाळ्या वाजविल्या. गोपालनं आपल्या मुठींतील सारे पेढे प्रेक्षकांत भिरकावून दिले. ज्यांच्या हातीं ते लागले त्यांनी ते खाऊन टाकले. गोपालनं पुन्हां खिशांत हात खुपसला, पेढे काढले, आणि फेंकले प्रेक्षकातलीं पोरं सोरं आणि मोठीं माणसं ओरडूं लागलीं, " आम्हाला ! आम्हाला ! "

गोपाल ओरडला, " दंगा करूं नका. सगळ्यांना देणार आहे. मिठाईला काय तोटा आहे आपल्याजवळ ? " त्यानं खिशांतून भला जंगी कागदाचा पुडा बाहेर काढला आणि प्रेक्षकांकडे भिरकावला. त्यांतले पेढे पकडायसाठीं लोक उठले. पण पुडा हवेंतल्याहवेंत फुटला आणि लोकांच्या डोक्यावर लीदच लीद पडली ! गोपालनं सलाम ठोकला आणि तो रिंग बाहेर पळाला. हंशा, टाळ्या, शिट्या यांची प्रेक्षकांत फैर झडली. दाराशी आम्ही उभी होतों. ही नवी गंमत गोपालनं केव्हां ठरविली होती तें आम्हांला कुणालाच माहीत नसल्यामुळें आम्हीसुद्धां प्रेक्षकांप्रमाणें थक्क झालों आणि हंसत सुटलों.

अशा अनेक नव्या गमती गोपाल करीत असे. लोकांना हंसविण्याची त्याला फार हौस होती. आणि त्याबाबतींत तो जी हुशारी आणि कल्पकता दाखवी ती अगदीं थक्क करून सोडणारी असे. काका नेहमीं म्हणत, " आईबापांनीं टाकलेलं हें पोरकं पोर ! याच्या स्वतःच्या आयुष्यांत हंसण्यापेक्षां रडणंच अधिक भरलेलं आहे. पण असं असून लोकांना हंसविण्याची केवढी करामत याच्या अंगीं ! किती आनंदांत असतो. आणखी लोकांना किती आनंद देतो हा. असं पोर कधीं पाहिलं नव्हतं ! "

विदूषकाच्या कामाप्रमाणें दुसरा एक अमर्याद छंद गोपालला होता. तो म्हणजे घोड्याचा. लहानपणी त्याला कुत्रीं आणि माकडं फार आवडायचीं. पण पुढें पुढें त्याची ही आवड संपली. आणि घोड्यांविषयींचं त्याचं प्रेम इतकं वाढलं की घोडं म्हणजे त्याला परब्रह्म वाटूं लागलं. घोड्यावर बसण्याची त्याला मनस्वी हौस होती आणि बसण्यांत तो पटाईत झाला होता, यांत कांहीं विशेष नव्हतं. या गोष्टी सर्कशीतली पुष्कळ माणसं करतात. गोपालचं मला आणि इतरांनाहि विशेष आश्चर्य वाटे तें यासाठीं कीं घोड्यांची सेवा शुश्रूषा करण्याची त्याला विलक्षण हौस होती. एखाद्या घोड्याचा खरारा करण्यांत नोकरानं कसूर केलेली त्याला दिसली की त्याला तें खपत नसे. नोकरांना राग भरण्याचा कांहीं त्याचा अधिकार नव्हता, पण तो स्वतः हातांत खरारा घेई आणि घोड्याची चाकरी करी. एखादं घोडं कधीं ठोकर खाऊन लंगडूं लागलं तर त्याचा दुखरा पाय शेकीत तो तासन्तास उभा राही. घोड्यांच्या खोगिरांना पॉलीश करीत

तो घटका न् घटका बसे. वास्तविक हें कांहीं त्याचं काम नव्हतं. पण तें तो हौसेनं करी. तो लहान होता तेव्हां त्याचं उठणं बसणं माझ्याच राहुटींत असे आणि तो माझ्याच कुशींत निजत असे. पण हळुहळुं अशी वेळ आली कीं त्यानं वेगळं निजावं ही गोष्ट आवश्यक झाली. आतां तो विदूषकी नकलांचे दोन स्वतंत्र नंबर करीत असे, आणि एकंदर सगळ्यांच्याच उपयोगी तो हर-प्रकारें पडत असे. त्याचा हूडपणा अजिबात नाहींसा होऊन तो इतका साधा, सरळ, भोळा झाला होता कीं कुणीहि त्याला कांहीहि काम सांगावं आणि त्यानं तें हौसेनं करावं. " गोपाल, माझा बाजार कर. " " गोपाल, माझं औषध आण. " " गोपाल, मला पोस्टांतून कार्ड आणून दे. " अशाप्रकारें दहा जणांनीं दहा हुकूम दिवसाकाठी सोडावेत आणि त्यानं कोणाला नाहीं म्हणूं नये. आतां सोळा सतरा वर्षांचा झालेला गोपाल कुणीहि काम सांगितलं तरी भोळेपणानं धांवत जातांना मला दिसला कीं माझ्या मनांत येई ज्या लहानग्या हूड, व्रात्य आणि लहरी गोपालला चहासाटी, आंघोळीसाठीं, जेवण्यासाठीं दहा ठिकाणीं शोधून ओढून आणावं लागत असे तोच का हा गोपाल ? लहानपणीं कुणी त्याला काम सांगितलं आणि त्यानं केलं असं कधीं होत नसे, आणि उलट आतां कुणी त्याला काहीं काम सांगितलं, आणि त्यानं नाहीं म्हटलं असं कधी घडत नसे. लहान मुलाच्या विषयीं तीं पुढें अमूक स्वभावाचीं होतील असं कोणी कधीं भविष्य करूं नये. लहानपणीं कुणाचं बोट कापलं तर त्यावर पाण्याची धार घाल म्हटलं तरी न घालणारा गोपाल आतां इतका निराळा झाला होता कीं ज्याला त्याला वाटावं गोपाल म्हणजे आपला एक हक्काचा नोकर. हें सारं पाहून खरं म्हणजे आमच्या मालकांनीं त्याला राहायसाठीं एक स्वतंत्र खोली द्यायला हवी होती. पण साऱ्या राहुट्या अड-लेल्या होत्या, आणि मीं आणि काकांनी सुचविलं कीं मिलिटरी मालाच्या लिलावांत एक छोटी जुनी राहुटी विकत घेऊन गोपालला द्या, तेव्हां मालकांनीं कबूल केलं नाही. त्यांचा कंजूषपणा मला आतां पुरता माहीत झाला होता. मीं आणि काकांनीं तो विषय सोडून दिला. गोपालविषयीं मला वाईट वाटलं. पण त्याला स्वतःला त्याचं कांहीं वाटलं नाही. तो मला म्हणाला, " मावशी, तूं

कां फिकीर करतेस ? मला रहायला आणि झोंपायला उत्तम जागा आहे ! ” मीं विचारलं, “ कुठें आहे ? ” “ आहे ! ” येवढंच तो म्हणाला आणि हंसला. मीं त्याला अधिक विचारलं नाहीं, पण हिंडून पाहिल्यावर मला आढळून आलं कीं घोड्यांच्या तबेल्यांतच त्यानं स्वतःसाठीं किनतान लावून छोटीशी आडोशाची जागा केली होती. तिथें तो रहात असे, तिथेंच मजेनं झोंपत असे. घोड्यांविषयींचं त्याचं प्रेम खरंच मुलुखावेगळं होतं.

कुणाचं आपल्यावर विशेष प्रेम आहे तें ओळखण्याची उपजत बुद्धि साऱ्याच जनावरांना थोडी फार असते, पण घोड्यांना विशेषच असते. गोपालचं प्रेम आमची घोडीं ओळखीत असत. कांहीं कांहीं घोडीं तर मालकांच्या खालोखाल त्याच्या आज्ञेत वागत. घोड्यावरची कसरत करणारे सर्कशींतले खेळाडू त्यांवर बसण्यांत पटाईत असतात, पण त्यांना सगळ्यांनाच घोड्याबद्दल मनापासून प्रेम असतंच असं नाहीं. घोडं म्हणजे सर्कशीचा नंबर करायच्या वेळेस वापरण्याचं एक जनावर अशा समजुतीनें वागणारे कांहीं खेळाडू आमच्या सर्कशीत होतेच. त्यांची कान उघाडणी करावयास गोपाल चुकत नसे. घोडं म्हणजे ज्याला अतिशय ममतेनं आणि आदरानं वागवायला पाहिजे असा मित्र होय अशी त्याची स्वतःची भावना होती, व तिचे धडे तो देऊं लागला कीं ज्याला आपण बोलतों तें माणूस आपल्यापेक्षां वयानं, अधिकारानं किती मोठं आहे याचा विचार त्याला रहात नसे. घोड्यांना कुणी येवढंसं जरी दुःख दिलं तरी तें त्याला खपत नसे. तो लगेच कैवार घेऊन उठे. काका मला पुष्कळदां म्हणत, “ हा गोपाल स्वतः आईबापांच्या प्रेमाला मुकलेला अनाथ मुलगा, म्हणून याला कुणाच्याहि दुःखाविषयीं सहानुभूति वाटते कीं काय कुणास ठाऊक. मानसशास्त्राचा असा नियम आहे म्हणतात-” त्यांनीं पुढें शास्त्रांतल्या ज्या गोष्टी सांगितल्या त्या माझ्यासारख्या सामान्य बाईला कळण्यासारख्या नव्हत्या. मी आपली उगीच हुं हुं करीत राहिलें. पण माझ्या मनांत मात्र येत होतं, काका सांगतात त्यांत तथ्य असलं पाहिजे. कारण घोडं असो, कुत्रं असो, पांखरूं असो, माणूस असो, मायेवांचून कुणी उघडं पडलेलं दिसलं कीं गोपालचं मन द्रवून जाई. लहानपणीं कितीदां

तरी त्यानं रस्त्यावरचं एखादं कुत्रं आणावं आणि तें बाळगायचा हट्ट करावा. तें घाणेरडं आहे, रोडकं आहे, गोचिड्यांनीं भरलेलं आहे, अशी त्याची समजूत मी घालूं लागलें कीं त्यानं नेहमी म्हणावं, " पण याची नीट निगा राखली तर हें किती सुंदर होणार नाहीं का ? " त्याच्या त्या उद्‌गारा-मागची त्याच्या मनाची ठेवण त्यावेळीं त्यालाहि सांगता आली नव्हती, मलाहि ओळखतां आली नव्हती. पण आतां तो सोळा सतरा वर्षांचा झाला होता, आणि मनांतले विचार अधिक चांगल्या रीतीनें सांगूं शकत होता. तो म्हणे, " माणसं काय जनावरं काय, त्यांची प्रेमानं निगा राखण्यावर सारं आहे. ज्यांची निगा राखली जाते तीं सुंदर दिसतात, बाकीचीं दिसत नाहींत याचं कारण त्यांची सदा आबाळ होत असते. त्यांना प्रेमाची निगा मिळाली तर तींदेखील अगदीं सुंदर दिसतील. खरं म्हणजे ज्याला सुंदर रूप येणार नाहीं असं माणूस किंवा जनावर जगांत असूंच शकत नाहीं. " काका म्हणत, " याच्या मनाचं हें तत्त्वज्ञान तयार झालं आहे याचं कारण याचं स्वतःचं आयुष्य ज्या तऱ्हेनं गेलं ती तऱ्हा होय. प्रेमाची भूक कशी असते तें याला माहीत आहे, त्यामुळें अितरांची प्रेमाची भूक तो ओळखूं शकतो. " ते मग त्यांनीं वाचलेल्या पुस्तकातल्या कांहीं गोष्टी सांगूं लागत. पुस्तकं लिहिणारे लोक ज्यांचा कुणीहि आपल्या स्वतःच्या अनुभवाशीं ताडून पाहून पडताळा घ्यावा अशा खऱ्या गोष्टी लिहीत असतील अशी माझी समजूत नव्हती. पण आतां तें मला कबूल करावं लागलं कारण काका पुस्तकांतलं म्हणून जें सांगत तें गोपालच्या वागण्याशीं अगदीं तंतोतंत जुळणारं असे. सगळ्या माणसांविषयीं त्याच्या मनांत ममता असे, आणि म्हणूनच कुणीहि कांहीं काम सांगितलं तर तो तें तत्परतेनं करी; आणि मुक्या जनावरांविषयीं—विशेषतः घोड्यांविषयीं—त्याच्या मनांत अितका ओलावा होता कीं घोड्यांना शिवी दिलेली सुद्धां त्याला खपत नसे. घोड्यांना वागवितांना कोणी दुष्टपणा केला म्हणजे तर त्याला अनावर राग येत असे. असा राग त्याला आला की मग तो कोणाचा मुलाहिजा ठेवत नसे. त्याचं आणि चार्लीचं कडाक्याचं भांडण झालं आणि त्या भांडणापायीं त्यानं मालकांचा राग स्वतःवर ओढवून घेतला तो यामुळेंच.

चार्ली म्हणजे मुंबअीच्या मुक्कामापासून मालकांनीं आमच्या सर्कशींत ठेवलेला अेक गोरा चाबुकस्वार होता. घोड्यांना शिकविण्याच्या कामांत तो वाकबदार होता यांत शंकाच नव्हती. तो तसा नसता तर आमच्या हिशोबी मालकांनीं स्वतःला मधून मधून विसांवा मिळावा या हेतूनं त्याला नोकरीवर घेतलाच नसता. पण या चार्लीची घोड्यांना वागविण्याची तऱ्हा प्रेमाची नव्हती. ममतेपेक्षां दराऱ्याच्या हत्यारावर त्याचा अधिक विश्वास होता. आपल्या चाबकाचा हवेंत कडाड् असा आवाज झाल्याबरोबर घोड्यांनीं चळचळा कांपलं पाहिजे, मग काय बिशाद् तीं बिनबोभाट काम न देतील अशा वृत्तीनं तो वागे. घोड्यांना शिकवितांना आणि मालकांना विश्रांति हवी असेल त्या रात्रीं खेळांत त्यांचे नंबर घेतांनासुद्धां घोड्यांनी चूक केली किंवा नाठाळपणा केला कीं, तो एकदम त्यांच्यावर खेंकसून ओरडे "गधा!" तें ऐकलं की गोपालला राग येई. तो चार्लीला म्हणे "माणसांप्रमाणेंच घोड्यांनासुद्धां स्वाभिमान असतो. तो कधीं दुखवूं नये. तूं घोड्यांना गाली देत जाऊं नकोस." चार्ली त्याला इंग्रजींत शिव्या देई आणि म्हणे, "तूं रंगणांतून चालता हो. मी घोड्यांना शिकवीत असतांना हजर रहाण्याचं तुझं काय काम? सर्कस काय तुझ्या बापाच्या मालकीची आहे.? ...मी तर ऐकतों की तुझ्या बापाचा पत्ता नाहीं! जा चालता हो येथून. खोगिरांना पॉलीश कर, तबेला झाड, बकेट घांसून साफ कर." हें सारं बोलण घोड्यांवरच्या प्रेमाखातर गोपाल सहन करी आणि रंगणांतच उभा राही. तो चार्लीशीं अधिक भांडण काढीत नसे. पण त्याच्या मनांत चार्लीविषयींचा तिटकारा धुमसत राही. त्यामुळें एके दिवशीं मालकांनीं नवीन दोन छोट्या 'शेटलंड' तट्टांना शिकवितांना जेव्हां चार्लीनं त्यांपैकीं एका तट्टाच्या पुढच्या पायांच्या गुढग्यांवर चाबकाच्या दांडीनं फाड्दिशीं मारलं तेव्हां गोपालनं एकदम झेंप घेऊन त्याची मानगूटच पकडली व त्याच्या हातांतला चाबूक हिसकावून घेऊन तो ओरडला, "चार्ली! हा चाबूक घ्यायची तुझी लायकी नाहीं. तुझी जात खऱ्या चाबूकस्वाराची नाहीं! दुसरीच कोणती तरी—" चार्लीनं त्याला एकदम हिसका देऊन दूर ढकललं, त्याच्या हातांतला चाबूक हिसकून घेतला आणि यथेच्छ चोप आणि शिव्या तर दिल्याच, पण

शिवाय मालकांकडे तणतणत जाऊन तो म्हणाला, " या गोपालला नीट ताकीद द्या, नाहींतर मी चाललों ! " मालकानीं गोपालला बोलवून घेतलं, रागानं ते त्याला खूप बोलले, आणि म्हणाले " तुझ्याकडे जे विदूषकाचे नंबर आहेत तेवढे करून गुण्यागोविंदानं रहायचं असेल तर रहा. नाहीं तर तूं चालता हो. घोड्यांच्या कामांत लक्ष घालायला मी तुला सांगितलेलं नाहीं. घोड्यांशीं तुझा संबंध काय ? तबेल्यांतून तूं आपली पथारी हालव पाहूं..." मालक रागाच्या भरांत जे अपशब्द बोलले होते ते गोपालनं मुकाट्यानं गिळले होते, पण त्यांचा अखेरचा तो हुकूम ऐकल्याबरोबर त्याचा सोशिकपणा संपला आणि त्यानं एकदम हुंदका दिला. मीं आणखी काकांनीं मालकांची परोपरीनं विनवणी केली तेव्हां कुठें त्यांचा राग शांत झाला, आणि त्यांनीं आपला हुकूम परत घेतला.

★ ★ ★

# ३

मलबार किनाऱ्यावरची सर्कसची सफर सुरूं झाली कीं एक गंमत नेहमीं घडते, त्या त्या गांवाचा. पाण्याचा अन् मातीचा गुण म्हणा, किंवा योगायोग म्हणा, पण सर्कशी काढणारे मालक मिरज तासगांवच्या भागांतले असायचे, आणि कसरतीचीं कामं करणारीं पुष्कळशीं माणसं मलबरांतलीं असायचीं, या दोन्ही गोष्टी ठरलेल्या आहेत. सर्कशीचे मालकच मराठी असल्यामुळें त्यांच्या-बरोबर मराठी बोली बोलणारीं माणसं बरीचशीं येतात, आणि मालकहि आपल्या देशच्या माणसांनीं कसरतीच्या आणि इतर खेळात बाकबगार व्हावं असा प्रयत्न करतात हें खर, पण कोणत्याहि देशी सर्कशींत मलबारी स्त्री पुरुषांचा भरणा तुम्हाला दिसेल. आमच्या सर्कशींतहि पंधरा वीस मलबारी नेहमीं असत, आणि कननूरपासून त्रिवंद्रमपर्यंतच्या पट्टीवर सर्कस हिंडूं लागली कीं हीं सारीं मलबारी माणसं विशेष खुषीमध्यें असत. कित्येक वर्षांनीं आपल्या जन्मभूमीला परत आल्याचा आनंद त्यांना होत असे; आणि मुक्कामाच्या शहरापासून ज्यांचीं गांवं चाळीस पन्नास मैलांच्या अंतरावर असत तीं माणसं घरीं जाऊन आपल्या नातलगांना आणि गांवकऱ्यांना

भेटून येत. त्यांना सर्कस दाखवावी अशीहि त्या खेळाडूंची इच्छा असे, आणि आपापल्या गांवाहून परत येतांना दहा वीस मलबारी खेडुतांचं टोळकं बरोबर घेऊन ते येत असत. कुणाच्या शेतजमिनी किंवा चंद्रमौळी घरं सावकाराच्या घशांत कायमची जायची वेळ आलेली असे, कुणाला थकलेला सारा भरायचा असे; कुणाला घरांत कांहीं लग्नकार्य किंवा धार्मिक विधी करायचे असत; सारांश या मलबारी खेळाडूंपैकीं जो तो काकां-जवळ लहान मोठ्या रकमांची मागणी करी. रजा, कर्जाऊ रक ा आणि खेळाचे फुकट पास देतां देतां काकांची धांदल उडून जाई. या गोष्टी देण्यांत ते कधीं कंजुषपणा करीत नसत. ते म्हणत, " फारा वर्षांनीं आपल्या देशाला हीं माणसं परत येतात. पुन्हां आपण कधीं परत येऊं कोण जाणे असं त्यांना वाटत असत. आपल्या नातलगांना आणि गावकऱ्यांना खूष करून टाकावं आणि ज्या सर्क-शींत आपण काम करतों ती इभ्रतदार सर्कस आहे असा सर्वांपुढें रुबाब मिर-वितां यावा असं या लोकांना वाटणं अगदीं साहजिक आहे. करूं दे त्यांना हवी तेवढी हौस. राहूं देत मजेंत. " काकांच्या या वृत्तीमुळे साऱ्या मलबारी खेळाडूंची त्यांच्यावर भक्ति असे. ते आपल्या घरातल्या आणि गावच्या लोकांना आणीत, आणि मालकाच्या आणि काकांच्या पायावर डोक ठेवायला सांगत सर्कसचा खेळ पहायला हे मलबारी खेडूत जायला निघाले की काकाचा निरोप घेतांना जो समारंभ चाले तो मोठा पाहण्यासारखा असे. ' आपण आमचे आईबाप आहांत–' ' आपण आमचे देव आहात–' असं वरचेवर म्हणून, आणि दरवेळीं काकांच्या पायांवर डोकं टेकून त्यांची जीं कोणी माणसं सर्कसमधें असतील त्यांना संभाळण्याची आणि कधीं अंतर न देण्याची प्रार्थना हे सारे खेडुत करूं लागले कीं, त्यांच्या गराड्यांतून आपण केव्हा एकदां सुटूं असं त्यांना होऊन जाई. मग ते कधीं मला हांक मारीत आणि त्या लोकांना सांगत, " तुम्हाला काय सांगायचं असेल तें या यशोदा मावशीना सांगा मला कामं आहेत. मी जातों. " ते निघून जात आणि मग त्या खेडुताच्या घोळ-क्याला बोळविण्याचं काम माझ्याकडे येई.

एकदां अशाच घोळक्यांत मी उभी होतें आणि निरोप देण्याचा समारंभ

पार पाडीत होतें. एक म्हातारा माझे पाय धरूं लागला तेव्हां त्याला तसं करूं न देतां मीं उठवलं आणि सहज विचारलं, " तूं कुठल्या गांवचा बाबा ? "

हातांतल्या भल्या मोठ्या दंड्यावर आपलं शरीर सांवरीत तो म्हातारा म्हणाला, " मायापुरम्‌जवळ एक खेडं आहे तिथला मावशी. "

मायापुरम्‌ ! तें नाव ऐकतांच मी चमकलें. मीं त्याला विचारलं, " मायापुरम्‌चा किट्टू आमच्या सर्कशींत होता. तो तुला माहीत आहे का ? "

तो म्हणाला " वा, माहीत आहे का म्हणजे ? किट्टू आणि त्याच्या दोन पोरी तुमच्याच सर्कशीत राहिल्या होत्या नव्हे ? त्यांची भेट इथें होईल असं मला वाटलं होतं पण तीं कोणी दिसलीं नाहींत. तीं दुसऱ्या सर्कशीत गेलीं काय ? "

मी म्हटलं, " हं. वर देवानं एक सर्कस काढली आहे त्या सर्कशींत किट्टू अन्‌ छबेली केव्हांच गेलीं ! "

माझ्या बोलण्याचा अर्थ त्या म्हाताऱ्याच्या लक्षांत चटकन्‌ आला नाहीं. पण जेव्हां आला तेव्हां दुःखाचा उद्गार काढून त्यानं डोक्याला हात लावला. कांहीं वेळानं मीं विचारलं, " किट्टूच्या घरी कोणी आहे का रे ? "

तो म्हणाला, " हो किट्टूचा बाप आहे, आई आहे. "

" किती वयाचीं आहेत तीं दोघं ? "

" आम्हाला वय काय समजतं मावशी ? पण तीं दोघं फार थकलीं आहेत एवढं सांगतों. मात्र किट्टू अन्‌ त्याच्या दोन पोरी इथें तुमच्याकडे असत्या तर म्हातारा म्हातारीला मायापुरम्‌हून घेऊन आलों असतों मी उद्यां. "

मीं एकदम म्हटलं, " किट्टू आणि त्याच्या दोन मुली नाहीत खऱ्या, पण हरिणीचा मुलगा आहे. "

" आं ? " त्या म्हाताऱ्यानं एकदम उद्गार काढला.

" आजच्या खेळात ज्या विदूषकानं तुम्हांला सगळ्यांत जास्त हंसवलं तोच हरिणीचा मुलगा. "

" होय ? मग यशोदा मावशी मला त्याला भेटूं द्या. मी मुद्दाम मायापुरम्‌ला जाईन आणखी म्हातारा म्हातारीला सांगेन तुमच्या पणतवाला भेटून

पाहून आलों मी. तो किती चांगलं काम करतो त्याचं वर्णन करीन, अन् माझ्या होडींत घालून त्यांना खेळ पहायलादेखील जमलं तर घेऊन येईन. ”

मीं म्हटलं, “ तसं नको. त्या थकलेल्या म्हताऱ्या माणसांना इकडे यायचा त्रास कशाला द्यायचा ? उद्यां किंवा परवां मीच गोपालला घेऊन मायापुरमूला येईन. ”

आपल्याला पणजा आणि पणजी आहे याची गोपालला मुळींच कल्पना नव्हती. त्यांच्याबद्दलची हकीगत मीं जेव्हां त्याला सांगितली तेव्हां त्याला फार, आश्चर्य वाटलं. आणि “ आज आपण मायापुरमूला जायचं आहे ” असं मीं त्याला म्हटलं तेव्हां त्याला फार आनंद झाला. आपल्याला आई बाप नाहीत. पण निदान पणजोळ आहे, आपण कांहीं अगदींच पोरके नाहीं, या कल्पनेनं त्याला विलक्षण समाधान झालेलं दिसलं. आम्ही दोघं मायापुरमूला निघालों तेव्हां काका म्हणाले, “ मीहि तुमच्यावरोबर येतों. मला काम करून करून कंटाळा आलाय्. मला थोडीशी सुट्टी मिळाली तर हवीच आहे. ” आम्ही नावेंत बसून मायापुरमूला गेलों. तें गांव छोटसंच होतं. किट्टूच्या बापाचं घर म्हणजे तर गोव्यांत खेडुतांच्या झोंपड्या असतात तसली एक झोंपडी होती. पण झोंपडी भोंवतालचं आणि एकंदर गांवाचंच सृष्टि–सौंदर्य असं कांहीं होतं कीं, तें पाहून डोळ्यांचं पारणं फिटावं. उंच उंच नारळी पोफळींच्या गर्द बागा, पाण्यांत तुडुंब बुडलेलीं छोटीं छोटीं खाचरं, पाण्याचे लहानमोठे ओहोळ, हजार रंगांचीं हजार फुलं— अशी जिकडे तिकडे लयलूट झालेली दिसत होती. तें सारं पाहून गोपालची चर्या आनंदानं फुलून आली. आपण पोरके नाहीं, आपल्यालाहि कुठें तरी लागाबांधा आहे, माझं मूळचं गांव अमकं अमकं असं आपल्याला सांगतां येण्यासारखं आहे, आणि इतकंच नव्हे तर ज्या गांवीं आपलं पणजोळ आहे तें गांव अतिशय सुंदर आहे या विचाराचा अभिमान आणि हर्ष त्याच्या मनांत त्यावेळीं दाटून आला असावा.

आम्हांला आलेलीं पाहून किट्टूचे आईबाप क्षणभर आश्चर्यानं भांबावूनच गेले. किट्टू, छबेली, हरिणी यांच्या हकीगती आमच्या तोंडून ऐकतांना तीं दोघं रडत होतीं, पण गोपालला मिठींत घेतल्यावर दुःखाच्या आंसवांऐवजीं

आनंदाचीं आंसवं त्यांच्या डोळ्यांतून वाहूं लागलीं. आणि निरोप घेतांना काकांनीं जेव्हां नगद शंभर रुपये म्हाताऱ्याच्या हातावर ठेवले तेव्हां तर कृतज्ञतेनं भांबावून जाऊन तो नुसते हुंदके देत राहिला. काका मुद्दाम आमच्याबरोबर कां आले होते तें माझ्या लक्षांत आलं व मी त्यांच्याकडे अशा अर्थानं पाहिलं कीं देव तुमचं कल्याण करो.

शेवटीं आम्ही अगदीं निघालों तेव्हां म्हातारी हळुंच म्हणाली, " या गोपालचं लग्न करून टाका. माझ्या बहिणीची एक नात आहे. चांगली आहे. आत्तांच मी तुम्हाला दाखवली असती पण ती आपल्या बापाबरोबर दूरच्या गांवीं गेली आहे. उद्यां परवांला येईल. तुम्ही पुन्हां आलांत तर— "

काका म्हणाले, " आजीबाई, आम्हीं कामाचीं माणसं. आम्ही कशी पुन्हां येणार ? पण गोपालला धाडीन पुन्हां एकदां."

त्याप्रमाणें नंतरच्या दिवसांत मीं आणि काकांनीं गोपालला दहादां आग्रह केला कीं एकदां पुन्हां मायापुरमूला जाऊन ये. पण तो तें मनावर घेईना. त्यानं अळं टळं करावी याचं मला फार आश्चर्य वाटलं. शेवटीं एके दिवशीं मीं त्याला खनपटीस बसून विचारलं, " अरे पणजीकडे जात कां नाहींस ? "

त्यानं मान खालीं घातली आणि हळुंच म्हटलं, " मला भीति वाटते."

मीं आश्चर्यानं विचारलं, " कसली ? "

तो पुटपुटला, " ती मला ती मुलगी दाखवील आणि लग्न कर म्हणेल याची."

तें ऐकून मला असं कांहीं हंसूं लोटलं कीं कांहीं विचारूं नका. मीं त्याला म्हटलं, " म्हणजे काय ? तुला लग्न नाहीं करायचं काय ? "

" शीः ! " असं म्हणून तो एकदम दूर निघून गेला !

कालिकतला जायसाठी सर्कशीचा मुक्काम हालण्याचा दिवस जवळ येऊं लागला तेव्हां माझ्या भरीला काकांनींहि गोपालला सांगितलं कीं, इथला मुक्काम उठण्यापूर्वी एकदां मायापुरमूला जाऊन ये. त्यानं तें कबूलहि केलं आणि मला वाटतं तो गेलाहि असता. परंतु तितक्यांत अशी एक गोष्ट घडली कीं,

सर्कसचा तंबू सोडून गोपाल पांच मिनिटांपुरताहि कुठें जाईल अशी अपेक्षा ठेवण्यांत अर्थ उरला नाहीं. चकोर घोडा आजारी झाला, आणि खाण्या-पिण्याचीहि शुद्ध न बाळगतां गोपाल त्या दुखणाईत घोड्याजवळ चोवीस तास बसून राहूं लागला.

चकोर म्हणजे लाल रंगाचं, रुंद पुठ्ठयाचं अति उमदं घोडं होतं. फार देखणं, कमालीचं हुशार आणि स्वभावानं भारी गरीब. त्याच्या पुठ्ठयावर उभं राहून छोटू हालवाई कसरतीचे एकाहून एक अवघड प्रकार करी आणि तो सांगे चकोर इतका शहाणा आहे कीं, माझा तोल संभाळायचं अर्धे काम तो करतो. सहा सहा आठ आठ खेळाडूंनीं पाटीवर चढावं, दोघां विदूषकांनीं त्याच्या झुपकेदार शेपटीला लोंबकळावं, पण न चमकतां न बिनसतां बँडच्या ताला-वरची त्याची रंगणांतली ठेकेदार दौड अखंड चालत राही. आमचे मालक नेहमीं म्हणत कीं, हें लाल पुठ्ठेदार घोडं म्हणजे एक रत्न आहे. ते माणसाशीं जरा कठोरपणानं वागत, पण जनावर म्हटलं कीं, त्यांच्या ममतेंत कधीं उणं पडत नसे. चकोर तर त्यांचा फारच लाडका होता.

पण मालकांनीं काय प्रेम करावं असं प्रेम गोपाल सगळयाच घोड्यांवर आणि विशेषतः चकोरवर करीत असे आमचा मुक्काम द्वारकेला होता तेव्हां छोटू हलवाईच्या उजव्या मांडीचं हांड कशानंस थोडं दुखावलं. पण त्याचा नंबर गाळण्याची पाळी गोपालनं येऊं दिली नाहीं. छोटूचीं कामं तो केव्हां शिकला होता देव जाणे, पण तीं सारीं कामं पार पाडून त्यानं माल-कांना थक्क करून टाकलं. गोपालला आठवड्याला पंचवीस रुपये सुरू करा असा हुकूम मालकांनीं काकांना दिला. मालकांचं औदार्य इतकं फळफळलेलं मीं कधी पाहिलं नव्हतं. मला फार आनंद झाला. गोपालची चकोरवर आधींच फार माया होती. पण मालकांची खुषी त्या उमद्या घोड्यामुळें आप-णाला मिळाली अशा भावनेनं तो तेव्हांपासून त्याच्यावर जिवापलीकडे प्रेम करूं लागला.

त्यामुळें चकोर आजारी झाल्यावर त्याची शुश्रूषा करण्यावांचून गोपालला दुसरं कांहीं सुचेनासं झालं हें साहजिकच होतं. तो मायापूरमूला आजेळीं

पुन्हां गेला नाहीं. जा म्हणून त्याला आग्रह करण्यांत हंशील नाहीं हें आम्ही ओळखलं. कालिकत, कोचीन, क्विलॉन, त्रिवंद्रम् असे मुक्काम करीत आम्ही मलबार किनाऱ्याच्या पट्टीवरून खालीं दक्षिणेकडे सरकत गेलों. आणि या साऱ्या अवधींत चकोरच्या शुश्रूषेखेरीज गोपालला दुसरं कसलं भान उरलं नव्हतं. तो आपल्या ठरलेल्या विदूषकी कामाचे दोन नंबर करी, आणि तेवढे पार पडले कीं पागेंत जाऊन चकोर जवळ बसे. तहान, भूक, इतरांशीं बोलणं चालणं, बाहेर हिंडाफिरायला जाणं इत्यादि गोष्टी त्याच्या गांवीं नव्हत्या. मालक पुष्कळदां म्हणत, " हें जनावर आतां बरं होणं शक्य नाहीं. त्याचा कोठा कुजला आहे. तें असंच सडत जाणार आणि एक दिवस राम म्हणणार! त्याच्या यातना उगीच कशाला लांबवायच्या? त्याला गोळी घालून मारून टाकावं हें चांगलं. " पण मालक असं बोलूं लागले कीं, गोपाल ऊर पिटून रडूं लागे आणि त्यांच्या पायां पडून म्हणे, " असं करूं नका. चकोर बरा होईल. बघा तरी. " जनावराची मायेनं निगा राखली कीं तें बरं झालंच पाहिजे हें गोपालचं ठरीव तत्त्वज्ञान उसळून वर येई, आणि मालकांची परोपरीनं विनवणी करून चकोरला गोळी घालून मारण्याच्या बेतापासून तो त्यांना परावृत्त करी. मालक म्हणत, " काय वेडं पोर आहे? " पण ते त्याचं ऐकत. मनांत मात्र ते ओळखून होते आणि आमच्याजवळ ते बोलूनहि दाखवीत, कीं एखाद्या रत्नाच्या किंमतीचं हें सुंदर घोडं आतां फार दिवस जगणार नाहीं. त्यांचं म्हणणं खोटं नव्हतं. आमचा मुक्काम त्रिवंद्रमला असतांना चकोरची अवस्था अगदीं बघवेनाशी झाली. मग गोपालचं कांहीं न ऐकतां मालकांनीं त्याची रवानगी सरकारी गुरांच्या दवाखान्यांत केली, आणि तिथें त्याला गोळी घालून मारविलं.

गोपालला ही बातमी कळतांच तो दुःखानं वेडा झाला. जनावरावर प्रेम करणारं गोपालसारखं दुसरं माणूस मी खरंच कधीं पाहिलं नाहीं. चकोर मेल्यापासून गोपाल आपल्या दुःखांत असा कांहीं चूर होऊन गेला कीं मला वाटे, अठरा वर्षांचा हा तरुण मुलगा एकदम म्हातारा झाला कीं काय! त्रिवंद्रम् सोडल्यावर तिनिवेल्ली, मदुरा असे मुक्काम करीत आम्ही ट्रिचीला

पोंचलों तरी गोपाल खिन्न आणि दुःखी—कष्टीच होता. मीं त्याला पुष्कळदां समजाऊन सांगे कीं असं काय वेड्यासारखं करतोस? पण यावर उत्तरादाखल तो जें बोलत राही त्यावरून माझी खात्री झाली होती कीं प्रेम करायला दुसरं घोडं त्याला मिळाल्यावांचून त्याच्या मनांतलं दुःख संपण्यासारखं नव्हतं. आणि ज्यावर त्याचं प्रेम जडेल असं दुसरं घोडं कुठें नसेल अशी माझी कल्पना होती.

पण माझी ती कल्पना खोटी ठरली.

ट्रिचीला आमचा तंबू गांवाच्या एका टोंकाला होता. तंबूपासून थोड्याशा अंतरावर जी पक्की सडक होती त्या सडकेनं पश्चिम दिशेकडे बारा चौदा मैल गेलं कीं एक छोटसं गांव लागत असे. लष्करी नोकरीतून पेन्शनींत निघालेल्या एका साहेबाचा मोठा मळा या गांवाजवळ होता. किंवा खरं सांगायचं म्हणजे साहेबाचा मळा, त्याचा रहाता बंगला, त्याच्या मळ्यावर काम करणाऱ्या मजुरांचीं घरं, आणि एक अगदीं छोटीशी बाजार पेठ या पलीकडे गांव असं फारसं नव्हतंच. या छोट्या गांवाला तिकडल्या भाषेंतलं कोणतंसं नांव होतं, पण तें आतां मला आठवत नाहीं. आम्ही सर्कशींतलीं माणसं त्या गांवाला कुक् साहेबाचा मळा म्हणत असूं. हा साहेब आमच्या खेळाला वरचेवर येत असे आणि आम्हा लोकांनाहि पुष्कळदां आपला मळा दाखवायला म्हणून आग्रहानं नेत असे या कुक् साहेबाची आणि काकांची चांगलीच गट्टी जमली होती. त्याला घोड्यांची पारख आणि हौस होती, अन् त्याच्या तबेल्यांत पांच सुंदर घोडीं होतीं. हीं सारीं घोडीं त्यानं आम्हांला दाखवलीं होतीं आणि तीं दाखवतांना दर वेळेला तो म्हणाला होता, "आणखी एक फर्स्ट क्लास घोडं आहे माझ्याजवळ. पण तें निकामी झालेलं आहे म्हणून त्याला या तबेल्यांत न बांधतां दोन मैलांच्या अंतरावर असलेल्या दुसऱ्या शेतावर ठेवलेलं आहे." तें आम्हांला दाखवाच असा आग्रह आम्ही केला नव्हता. कशाला करायचा? अगदीं फर्स्ट क्लास घोडं झालं तरी निकामी आजारीं अवस्थेंत पहाण्यांत काय मौज होती? कुक् साहेबाच्यांतला आणि आमच्यांतला त्या घोड्याबद्दलचा विषय नेहमीं तेवढयावर संपला होता.

पण ज्या दिवशीं ट्रिचीहून आमचा मुक्काम हालवून आम्हीं गाडीवाटेनं सालेमकडे जायला निघणार होतों त्याच्या आदले दिवशीं काकांना कुक् साहेबाची तांतडीची चिठ्ठी आली. त्यानं लिहिलं होतं " माझ्याकडचं आजारी घोडं निकालांत काढायचं मीं ठरविलं आहे. त्याला मीं गोळी घातली असती, पण त्यापेक्षां तुमच्या वाघ-सिंहाना त्याचं ताजं मांस खायला मिळालं तर त्याच्या शरीराचं अधिक सार्थक होईल असं मला वाटतं. घोड्याचं मास म्हणजे त्याना मोठी मेजवानी वाटेल तेव्हा हें घोडं तुमच्या स्वाधीन करावं सं मीं ठरविलं आहे. त्याला घेऊन जायसाठी कुणाला तरी धाडा. मी आणि माझी बायको उद्यां कोडाइ–कनालला जाणार आहोंत. जायच्या आत घोडं तुमच्याकडे गेलेलं दिसलं कीं मला बरं वाटेल. "

रात्रीचा खेळ आटपून दुसऱ्या दिवशीं मुक्काम हालविण्यासाटीं गाडे भरायचे असले म्हणजे मोठी धादल उडते. अशा वेळीं सर्कसमधला एकदेखील माणूस पळभरसुद्धा रिकामा असूं शकत नाहीं. कुक् साहेबाचं घोडं आणण्याण्यासाटीं कुणाला पाठवाव अशी काकांना पंचाईत पडली. पण गोपाल आपणहून म्हणाला, "माझे दोन नंबर आहेत ते आटपून मी रातोरात जातों साहेबाच्या मळ्यावर, अन् मुक्काम उठायच्या आत घेऊन येतों घोडं " काका त्याला म्हणाले, " ठीक आहे, जा, पण गाडे भरून व्हायच्या आंत परत मात्र ये. " त्याप्रमाणें गोपाल गेला. जाण्यापूर्वी आपल्या कपड्याचं गाटोडं बांधून त्यानं माझ्याजवळ दिलं, आणि म्हटलं, " मावशी, हें तुझ्या सामानांत टाक. कुक् साहेबाचं घोडं घेऊन मी शक्यतों लवकर येतोंच, पण समजा मला जरा उशीर झाला तर माझं हें बोचकं घेऊन तूं नीघ."

आमची कल्पना दुसऱ्या दिवशीं सकाळीं दहा अकरा वाजेपर्यंत गोपाल घोडं घेऊन येईल. कुक् साहेबाचं घोडं येणार अन् तें आलं कीं, वाघ-सिंहांना मेजवानी मिळणार या कल्पनेच्या खुषींत पिंजऱ्यावरचा कामगार होता. सकाळीं रोजच्या प्रमाणें खाटीक मांसाचा रतीब घालून गेला. पण कामगारानं त्या रतिबाचं जेवण वाघ-सिंहांना दिलं नाहीं. पिंजऱ्यापुढें उभं राहून तो त्या जंगली जनावरांना पुनःपुन्हां सांगत होता, " बेट्यांनो, खाटकाकडलं



८......

मांस कशाला खातां आज ? कुक् साहेबाची दावत आहे तुम्हाला. गोपाल घोडं घेऊन आला कीं तुमची चंगळ होते बघा. " तीं जनावरंहि त्याचं तें बोलणं समजल्याप्रमाणें जिभा चाटीत होतीं, पिंजऱ्यांच्या गजांवर पंजे मारीत होतीं, अन् डरकाळ्या फोडीत होतीं. खाऊ देईन म्हणणाऱ्या मोठ्या माणसाचं बोलणं ऐकून लहान मुलांनीं नाचूं बागडूं लागावं, आणि घाई करावी तशी त्या जनावरांची आरडाओरड आणखी धडपड चाललेली पाहून एकीकडे कामाच्या घाईत असलेल्या आम्हां सर्व मंडळीची मोठी करमणूक होत होती. अर्जुना ट्रेनर मला पुनःपुन्हां म्हणत होता, " मावशी, बघ तरी ही गंमत. " मी म्हणत होतें, " बघितली बाबा. आपल्यांत एक म्हण आहे ना, बामणाला जेवणाचं आमंत्रण मिळालं कीं त्याची खुषी कांहीं विचारूं नका. ही जंगली जनावरं, पण तींसुद्धां बामणासारखीं नाचायला लागलीं आहेत ! " अशा प्रकारें काम करतां करतां थट्टा विनोद चालला होता आणि गोपाल कुक् साहेबाचं घोडं केव्हां घेऊन येतो म्हणून आम्ही वाट पहात होतों. पण अकरा वाजून गेले. खेळाचा मला मोठा भव्य तंबू केव्हांच उतरला जाऊन त्याच्या मोठमोठ्या घड्या गाड्यांवर भरल्या गेल्या होत्या, आणि त्या तंबूनं मुक्कामाच्या दिवसात झांकलं गेलेलं मैदान रखरखीत उन्हांत उघडं बोडकं अन् भकास दिसूं लागलं होतं. आमच्या राहत्या राहुट्या-देखील उचकटल्या जाऊन गाड्यांवर भरल्या गेल्या होत्या. हत्ती तर हळु हळूं वाटेला लागले होते, घोडे रवाना होऊं लागले होते, अन् वाघ--सिंहांच्या पिंज-ऱ्यांचे गाडे देखील खरं म्हणजे जाऊं लागायचे पण मेजवानीसाठीं ती मंडळी खोळंबून राहिली होती. पण साडे अकरा झाले, बारा वाजले, तरी गोपालचा पत्ता नव्हता. शेवटीं मालक चिडून म्हणाले, " या कार्ट्यानं घोटाळा केला नाहीं असं कधीं झालंय ? आतां त्याची वाट नाहीं पहायची. खाटकाकडून रतिबाचं मास आलंय् तें जनावरांना खायला घाला आणि कूच करा पाहूं. आपल्या वाटेवरच कुक् साहेबाचा मळा आहे. आपल्याला भेटेल गोपाल कुठें तरी. " मालकांचा असा हुकूम झाल्यावर सारी मंडळी भराभर कामाला लागली आणि एक दीड घटकेच्या आंत आमच्या साऱ्या गाड्या निघाल्या. सालेमला

गाडीवाटेनं आम्ही जाणार होतों. मधें दोन गांवीं छोटे छोटे मुक्काम करायचे अन् पंधरा वीस दिवसांनीं सालेमला पोंचायचं, असं काकांनीं ठरविलं होतं.

ट्रिचीहून सालेमकडे गाडीवाटेनं जाऊं लागलं कीं विलक्षण रम्य प्रदेश दिसतो रस्त्याच्या दोहों बाजूंस एकेका हांकेच्या अंतरावर असलेल्या गर्द राई, खळखळून वाहणारे ओढे, लहानमोठे तलाव, छोट्या मोठ्या टेकड्या आणि त्यांपलीकडे दूर अंतरावरून काळीं निळीं दिसणारीं दाट जंगलं, अशा सौंदर्याची मेजवानी डोळे भरून झोडीत झाडांनीं बनवलेल्या कमानीखालून गाड्यांतून जाण्यांत मोठी मजा होती. सर्कसचा 'कारवान' असा गाडीवाटनं निघाला कीं आगगाडीच्या किंवा आगबोटीच्या प्रवासांत न येणारी अशी निराळीच गमत येते. गाड्यांच्या चाकांचा खडखड आवाज, बैलांच्या गळ्यातल्या घंटा-घुंगरांचा किणकिणाट, आणि शिकारखान्याच्या गाड्यांतून मधूनच उठणारे हुंकार, अशा पार्श्वसंगीतावर गाड्यागाड्यांतून गप्पागोष्टी, थट्टामस्करी, क्वचित् हंसण्यांच्या लकेरी, क्वचित् गाण्याचे सूर चालू असतात. नित्याप्रमाणें याहि वेळचा आमचा गाडीवाटेचा प्रवास अशाच थाटांत चालला होता. मधून मधून अर्जुना ट्रेनर किंवा दुसरं कुणीतरी आघाडीच्या गाड्यातल्या लोकांना ओरडून सागत होतं, " अरे गोपाल कुठें दिसतो का लक्ष ठेवा हं. " आणि त्या आरोळीला उलट जबाब येत होता, " अजून तरी कांहीं दिसत नाहीं. " जवळ जवळ सहा मैल आम्ही गेलों तेव्हां मला जरा काळजी वाटूं लागली. गोपालची इतकी खोटी कशामुळें झाली असावी याचा मला तर्क करतां येईना.

पण आम्ही सातवा मैल ओलांडून जरा पुढें गेलों तों आघाडीच्या गाडींतल्या लोकांनीं एकदम ओरडा केलेला ऐकूं आला, " अरे तो पहा गोपाल ! " ती आरोळी ऐकतांच साऱ्याच गाड्या रोखण्यांत आल्या आणि आम्ही खालीं उतरून गोपाल ज्या ठिकाणीं बसलेला होता तिकडे घाईघाईनें गेलों.

रस्त्यापासून सुमारें पांच पंचवीस यार्डांच्या अंतरावर एका खूप मोठ्या झाडाखालीं गोपाल बसला होता. कुक् साहेबाचं घोडं जमिनीवर निश्चेष्ट आडवं पडलं होतं. मालकांनीं गोपालला रागानं विचारलं, " तुला कांहीं अक्कल आहे

कीं नाहीं ! आम्ही तिकडे तुझी वाट पहात होतों आणि तूं इथें खुशाल झाडा-खालीं पेंगत बसला आहेस काय ? ” माझ्याकडे बघून ते पुढें म्हणाले, “ मावशी, या तुझ्या गोपालला शहाणपणा येणार तरी केव्हां ? ” तें ऐकून मी मनांतल्या मनांत हंसलें. गोपालबद्दल मालकांच्या मनात जी खोल अढी होती तिच्याबद्दल आतांशा त्यांचा राग येण्याऐवजी त्या गोष्टीची मला गंमतच वाटत असे. आणि गोपालची चूक झाली की त्यांनी ‘बघ मावशी’ असा उद्गार काढून मला जबाबदार धरल्यासारखं करावं याचंहि मला हंसू येत असे. मीं मालकांना म्हटलं, “ गोपाल उगीचच्या उगीच कसा इथें पेंगत बसेल ? काय झालं त्याला विचारा तरी ? ” आणि मालक त्याला विचारतील अशी वाट न पहातां मी पुढें झालें आणि गोपालला म्हटलं, “ कां रे गोपाल, या घोड्याला घेऊन इथें अर्ध्या वाटेवरच असा कां बसलास ? ”

प्रश्न मीं केला होता पण गोपालनं मालकांकडे पाहून उत्तर दिलं. कुकू-साहेबाचं तें घोडं अतिशय अशक्त झालेलं होतं. तें या ठिकाणापर्यंत कसं बसं आलं होतं पण नंतर त्याला पाऊल उचलणं अशक्य झालं होतं. त्याला पुढें दामटणं शुद्ध दुष्टपणा होता. “असला दुष्टपणा माझ्या हातून होईना” गोपाल म्हणाला, “ मी त्याला इकडे बाजूला कसंबसं आणलं अन् त्याच्यापुढें असा बसून राहिलों. या जागीं आणल्यापासून ते असं निपचित पडून राहिलंय. ”

गोपालच्या तोंडची ही हकीगत ऐकल्यावर त्याला दोष द्यायला कुठें जागा होती ? पण तरी आमचे मालक त्याला म्हणाले, “ गाढवच आहेस. बरं, आतां तूं इथून ऊठ अन् आपल्या गाडींत जाऊन बैस पाहूं. ”

गोपाल म्हणाला, “ पण या घोड्यापासून मी दूर कसा होऊं ? त्याची काय दशा झाली आहे पाहिलीत ना ? ”

“त्या दशेंतनं आपण सुटका करू ना त्याची ” मालक म्हणाले, “तूं कशाला चिंता करतोस ? ” तेवढ्यात जंगली जनावरांच्या पिंजऱ्यावरचा कामगार आमच्या घोळक्यांत येऊन सामील झाला होता. त्याच्याकडे बघून ते म्हणाले, “ लख्या, चल घे हें घोडं ताब्यांत. खांडोळी करून टाक त्याचीं, आणखी जनावरांना— ”

त्याच्या तोंडचे पुढचे शब्द ऐकूं येण्याऐवजी गोपालनं कर्कश किंकाळी फोडली ती आम्हाला ऐकायला आली. त्यानं झटकन् बसल्या जागेवरून उडी मारून घोड्याच्या मानेभोंवतीं हात टाकले आणि मालकांकडे पाहून तो ओरडला, " मालक ! असं करूं नका ! मी तुमच्या पायां पडतों ! "

पण त्याच्या विनवणीकडे लक्ष न देतां मालकांनीं लख्याला खूण केली. लख्या पुढें झाला आणि त्यानं खस्कन् गोपालला ओढून दूर केलं. आणि त्याच क्षणीं एक विलक्षण चमत्कार झाला. इतका वेळ निपचित पडून राहिलेलं तें घोडं एकदम चमकून उठलं आणि एखाद्या आश्चर्यचकित भेदरलेल्या माणसाप्रमाणें आम्हा सगळ्याकडे एकदां न्याहाळून पाहून त्यानं एकदम एक उडी मारली आणि मग चौखूर धूम टोकली ! जंगली जनावरांचा वास लख्याच्या अंगाला आल्यामुळें तें घोडं असं पळत सुटलं होतं !

घोड्यामागोमाग गोपालहि भरधाव गेला उजव्या अंगच्या दाट जंगलाकडे पुढें घोडं आणि मागं गोपाल अशा धांवणाऱ्या दोन आकृती आम्हांला कांहीं वेळ दिसल्या. थोड्या वेळात त्या आकृती खूपच दूर गेल्या आणि जंगलाच्या दाट झाडींत दिसेनाशा झाल्या. " गोपाल ! ए गोपाल ! अरे परत ये ! तें घोडं गेलं तर जाऊं दे ! परत ये ! " अशा हाका आमच्या घोळक्यांतल्या कांहीं लोकांनी कांहीं वेळ मारल्या, पण घोड्यासकट गोपाल दिसेनासा झाला तेव्हां त्यांनी हांका थांबविल्या, आणि मालकाकडे पाहिलं. मालक क्षणभर स्वस्थ उभे राहिले पण मग म्हणाले, " मरूं दे तें कुक् साहेबाचं घोडं. अन् मावशी, जाऊं दे तें हरिणीचं मूर्ख कार्टं. चला, आपापल्या गाड्यांत बसा अन् पुढची वाट चालूं लागा ! "

मालकांशीं वाद घालण्यांत अर्थ नव्हता. इतर सारी माणसं आपल्या गाड्यात जाऊन बसलीं तेव्हां मीहि आपल्या गाडींत जाऊन बसलें. 'कारवान' पुढें चालूं लागला. चाकांचा खडखडाट आणि घंटा-घुंगरांचा खळखळाट माझ्या कानावर येत होता. मी ज्या गाडींत बसलें होतें ती हांकणाऱ्या गाडीवानानं मल्याळी भाषेंतलं एक खेडुतांचं गाणं म्हणायला आरंभ केला, त्याबरोबर बाकीच्या गाड्या हांकणारेहि तें म्हणूं लागले, व त्यांचे उंच आवाज गर्द झाडींत घुमूं लागले.

पण माझ्या मनावर विलक्षण खिन्नता पसरली होती. एकाएकीं गोपाल नाहींसा झाला होता, आणि त्याला टाकून मी चाललें होतें. किट्टू मेला होता. हरिणी नाहींशी झाली होती. आणि आतां अकस्मात् गोपालची आणि माझी ताटा-तूट झाली होती ! मीं त्याला माझ्या पोटच्या लेंकराप्रमाणें संभाळला होता. त्यानंहि माझ्यावर प्रेम केलं होतं तरी मी त्याला टाकून निघालें होतें. आतां तो पुन्हां कधीं माझ्या दृष्टीस पडेल अशी आशा मला बाळगतां येत नव्हती ! माझ्या मनांत आलं, माणसाची पर्वा न करणारा किती दुष्ट आणि निर्दय हा सर्कसचा धंदा ! मला हुंदके आले. गोपालच्या कपड्यांचं बोचकं माझ्या जुन्या पेटीवर ठेवलेलं होतं, त्यावर मीं एकदम डोकं टेकलं आणि रडतां रडतां हांका मारल्या, " गोपाल ! अरे गोपाल "

● ● ●

# १

आम्ही मुक्कामाला पोंचलों तेव्हां चांगलीच रात्र झाली होती. पण रात्र चांदणी होती, आणि हवादेखील मोठी थंडगार पडली होती. ज्या मैदानावर आमचा तळ पडायचा होता त्याच्या एका भागांत भराभर किनतानाचे आडोसे करण्यांत आले व जनावरं बांधण्यांत आलीं. रहाण्याच्या राहुट्या झटाझट उभ्या करण्यांत आल्या, चुली पेटल्या, साऱ्यांनी आपलीं जेवणं आटपलीं. मग तंबूच्या अजस्त्र घड्या गाड्यांवरून काढण्यांत आल्या आणि तंबू उभा करण्याच्या कामाला कामगार लागले तेव्हां लोखंडी खुंट्या जमिनींत खोल ठोकण्यासाठीं त्यांनीं मारलेले हातोड्यांचे आवाज, आणि दोऱ्या ताणतांना त्यानीं एकमेकाना दिलेले इशारे यांनीं तिथलं वातावरण गजबजून गेलं. माझ्या राहुटीपुढें खाट टाकून अंथरूण तयार झालं होतं त्यावर मी पडलें. मी सर्कसचा मालक होतों, पण आमचे दौलतराव काका असे कांहीं पटाईत मॅनेजर होते कीं माझ्या वांट्याला कसलीच दगदग अगर चिंता ते सहसा येऊं देत नसत. त्यांच्या कडक आणि प्रेमळ देखरेखीखालीं साऱ्या गोष्टी व्यवस्थित आणि वक्तशीर पार पडायच्याच याबद्दल माझी नेहमीं खात्री असे.

आतां हेंच पहा ना, या मुक्कामाला पोहोंचून आम्ही जरा स्थिरस्थावर झालें तों जवळ जवळ मध्यरात्र झाली होती, पण दौलतराव काकांनीं इकडे पुढें रवाना केलेल्या माणसांनीं मुक्कामाची आणि जाहिरातीची सारी व्यवस्था चोख केलेली असणार, आणि अवघ्या अठरा तासांच्या अंतरानं सर्कसचा पहिला खेळ अगदीं सुसूत्र सुरूं होणार याबद्दल माझी खात्री होती मी अगदीं निश्चिंतपणानं खाटे-वर अंग टाकलं आणि सिगरेटचे झुरके घेत वर आभाळांत तरंगणाऱ्या चंद्रा-कडे पहात राहिलों.

मला वाटलं मला स्वप्न पडत असावं, पण मीं डोळे उघडून पाहिलं तो खरोखरच यशोदा खाटेच्या टोंकावर टेकून माझे पाय हळुंहळू दाबीत होती. माझा डोळा कांहीं फार वेळ लागला नसावा. कारण तंबू उभा करणाऱ्या काम-गारांची धांवपळ आणि गडबड अजूनहि चालूं होती, व त्यांच्यावर देखरेख करणाऱ्या दौलतराव काकांचा आवाज अजूनहि ऐकूं येत होता. मात्र मीं खूप वेळ झोंप घेतली असं मला वाटलं फार थकून गेल्यानंतर लागलेल्या झोंपेंतून कशानं तरी जागं झालं कीं वास्तविक थोडाच वेळ झोंप लागली असूनहि खूप वेळ निजल्यासारखं वाटावं असा चमत्कारिक अनुभव माणसाला पुष्कळदां येतो. निदान मला तरी हा अनुभव नवीन नव्हता. यशोदाच्या हाताचा स्पर्श झाल्यामुळें मीं डोळे उघडले तेव्हां भरपूर झोंप झाल्यानंतर सारा शीण जाऊन आपण ताजेतवाने झालों आहात असं मला वाटलं. यशोदा माझे पाय चेपीत बसली होती याचं मला आश्चर्य वाटलं नाहीं. ती पुष्कळदां अशी माझ्याकडे येत असे आणि माझ्या खाटेवर बसून माझे पाय दाबीत राही. तिचे माझे तरुणपणांतले संबंध आतां उरले नव्हते. मी ऐन ज्वानींत होतों, सर्कसची मालकी माझ्या वडिलांकडे होती, खूप खावं प्यावं, तालीम करावी, सर्कशीं-तलीं कामं शिकावीं, उंची कपड्यालत्त्यांचा षोक करावा, वडिलांना न कळेल अशा बेतानं चंगीभंगीपणा करावा, अशा प्रकारचं माझं आयुष्य होतं, तेव्हां आमच्या तासगांवच्याच एका सुताराची अवघ्या अठरा वर्षांची तरणी विधवा सून सर्कशींत येऊन दाखल झाली. तिला पहातांच मी तिच्यावर आषक झालों, तिच्या पुरताच नादीं लागलें, वडील माझ्यावर रागावले तर

मला वेताच्या छडीनं फोडूनच काढतील अशी भीति मनांतल्या मनांत वाटत असून देखील ती जुमानली नाहीं, आणि तिच्या माझ्या पहिल्या चोरट्या एकांताच्या वेळीं तिचा हात पकडून तिच्या तोंडावर तोंड टेकतांना 'यशोदा' अशी तिला लाडिकपणानं हांक मारतां मारतां माझा श्वास मला अपुरा वाटला ! त्या गोष्टीला आतां इतकीं वर्षं लोटलीं होतीं कीं मला पुष्कळदां वाटे तो मी आणि ती यशोदा आतां उरलेलीच नाहीं. भर ज्वानींतलं प्रेम करणारे ते दोघे आषुक माषुक काळाच्या उदरांत केव्हांच गडप झाले होते. आमच्या दोघांच्या तारुण्याचा बहर केव्हांच ओसरला होता, आणि त्या बरोबरच तारुण्यांतलं नातंहि हलकें हलकें लयाला गेलं होतं. मात्र कांहीं झालं तरी परस्परांविषयीं गोड जिव्हाळा आमच्या मनांत अजूनहि होताच. लोकांच्या देखत मी तिला मावशी म्हणत असे, त्यांत थोडीशी चेष्टा असे. शिवाय तिच्याविषयींचा वयपरत्वें वाढूं लागलेला व कित्येक वर्षांच्या नाजुक नात्यांतूनच उत्पन्न झालेला आदरहि असे ती इतर माणसांच्या देखत मला मालक म्हणे,पण कधी कधीं आम्ही दोघेच एकीकडे असलों कीं ती मला दादा म्हणे...

मीं डोळे उघडले, आणि खाटेवर माझ्या पायागतीं बसलेली यशोदा मला दिसली तेव्हां मला आश्चर्य वाटलं नाहीं. टिपूर चांदण्यांत दिसणाऱ्या तिच्या आकृतीकडे मी क्षणभर पहात राहिलों. मग मीं जांभई दिली, चुटक्या वाजविल्या, व उठून बसावं म्हणून अंगावरची पातळ शालजोडी दूर केली. पण यशोदानं माझ्या पायावर आपला तळहात अधिकच दाबल्यासारखं करून मला म्हटलं, " कशाला उठतां ? निजा कीं. दिवसभर दमलां आहांत. मी तुमचे पाय चेपतें. "

मी हंसून म्हटलं, " आणखी मला झोंप लागावी म्हणून गाणं नाहीं कां म्हणत ? "

ती म्हणाली, " तेंहि केलंय. पुष्कळदां आठवण नाहीं वाटतं ? "

" आहे कीं " असं किंचित् स्वगतच म्हणतांना माझी नजर यशोदाच्या डोक्यापलीकडे दिसणाऱ्या चंद्राकडे गेली, आणि माझ्या मनांत एकदम आलं,

तारुण्यांतल्या त्या रात्रीं आतां पुन्हां परत यायच्या नाहींत ! या कांहींशा खिन्न विचारानं मी मग जरा वेळ गप्पच राहिलों. यशोदाहि कांहीं न बोलतां माझे पाय चेपीत राहिली. थोड्या वेळानं मीं तिला विचारलं,

"तूं निजली कां नाहींस ?"

ती म्हणाली, "अगदीं झोंप येईना बघा."

"जेवण केलंस कीं नाहीं ?"

"नाहीं. तोंडांत अन्नाचा घास घालावासा वाटतच नाहीं.आज मला बेचैन वाटतंय्. म्हणून विचार केला जरा तुमच्याजवळ बसावं म्हणजे तरी बरं वाटेल. गोपालला तसाच सोडून आपण सारीजणं खुशाल इकडे आलों हें कांहीं बरं झालं नाहीं." तिचा स्वर हलकें हलकें रडवा होऊं लागला, "तुम्ही रागवाल म्हणून मीं मुक्याट्यानं गाडीत बसलें, आणखी इकडे आलें, पण खरं म्हणाल तर माझा सारा जीव तिकडे गोपालकडे लागलेला आहे. मला कांहीं तुमचा निर्दयपणा नवीन नाहीं. पुष्कळदां मी त्याचा अनुभव घेतलाय्. पण आज तुम्ही असं वागायला नको होतं. गोपालला टाकून पुढें निघायचा हुकूम तुम्ही द्यायला नको होता. मी माझ्या पोटच्या लेंकराप्रमाणें त्याला वाढविला हें तुम्हाला माहीत नाहीं ? आज माझ्या जिवाला अगदीं चैन नाहीं. असं कां केलंत तुम्ही ?"

मी म्हणालों, "अस्सं. पाय चेपायचं निमित्त करून आमची खरडपट्टी काढायला आलात एकूण ! तुम्ही बायका फार वस्ताद बुवा."

मी हंसलों तेव्हां तिनं रागानं मुरका मारला व म्हटलं, "चेष्टा नका करूं या वेळीं. मला हंसूं नाहीं यायचं. मला तुमचा फार राग आला आहे. गोपालला जंगलांत सोडून खुशाल इकडे येतांना, अन् मला यायला लावतांना तुम्हाला कांहीं कसं वाटलं नाहीं ? गोपाल तिकडे जिवंत राहिला अगर मेला तरी दोन्ही गोष्टी सारख्याच का वाटतील तुम्हाला ? आपण सारींजणं इकडे आलों तीं आलों, पण गोपालचा निदान कांहीं तरी शोध घ्यावा असं नाहीं तुमच्या मनाला वाटत ?"

माझा स्वभाव जरा अहंमन्य आणि हटवादी आहे. शिवाय सर्कशींतल्या

नोकर माणसांनीं बेशिस्तीच्या आणि मूर्खपणाच्या गोष्टी केल्या कीं त्याच्याबद्दलचीं माझी सारी माया उडून जाते. गोपालनं कुक् साहेबाच्या त्या घोड्याच्या मागोमाग दौडावं आणि किती हांका मारल्या तरी परत येऊं नये हा प्रकार मला अगदीं शुद्ध गाढवपणाचा वाटला होता. म्हणूनच मी एकदम ठरविलं होतं, मरूं दे तें घोडं अन् मरू दे तो गोपाल घोड्यावर कसं प्रेम करावं तें काय आम्हाला कळत नाहि ? पण या गोपालची तऱ्हाच मुलखा वेगळी गोपालला जंगलात सोडून आम्ही इकडे निघून आलो यांत माझी कांहीं चूक झाली असं मला मुळींच वाटत नव्हतं. त्यामुळें यशोदाचं तें बोलणं ऐकल्यावर माझ्या मनांत एकदां आलं की तिला सांगावं मी केलं तेंच बरोबर आहे. गोपालसाठीं तुला दुःख वाटावं यात तुझीहि चूक नाही. पण त्याला काहीं इलाज नाही. आणखी जसजसे दिवस जातील तसतस तुझं दुःख कमी होईल...

पण मी असं बोललों नाहीं. तारुण्यात ज्या नात्यानं मी यशोदाशीं वागलों होतों त्याच्या आठवणी एकदम फार तीव्रतेनं मला होत होत्या म्हणून कीं काय कुणास ठाऊक, तिच्याशी कठोर वागणं आज माझ्यानं होण्यासारखं नव्हतं. गोपालवर तिचा किती जीव होता आणि त्याची अशी एकदम ताटातूट झाल्यामुळें तिला किती दुःख होणं अगदी सहाजिक होतं याचेच विचार माझ्या मनात जोरानं आले, अन् माझा नेहमीचा हट्टीपणा विरघळला. मीं तिला म्हटलं,

" यशोदा, तूं उगीच दुःख करूं नकोस. उद्यां मी काकाकडून कुक् साहेबाला पत्र लिहवितों आणि गोपालची बातमी आणवितों. गोपाल सांपडला असला तर त्याला इकडे लावून द्या असं देखील कळवितों. अन् जरूर पडली तर आपण एखाद्या माणसाला तिकडे धाडूं अन् गोपालला आणूं तूं वाईट वाटून घेऊं नकोस. ऊठ, थोडंसं जेवण कर आणखी नीज पाहूं. ऊठ, ऊठ."

केवळ यशोदाचं ता पुरतं समाधान करण्यासाठीं मी असं बोललों नव्हतों. मीं दुसऱ्या दिवशी खरोखरच काकांकडून कुक् साहेबाला पत्र धाडविलं, अन् त्याच्या उत्तराची वाट पहात बसलों पण आठ दिवस झाले तरी कुक् साहेबाचं उत्तर आलं नाहीं. मग काकांना आठवण झाली व ते मला म्हणाले, " अहो, आपलं पत्र त्याला मिळणार कसं ? तो आपल्या बायकोला घेऊन गेलाय् कोडाइ-

कनालला. तिकडून तो परत आला म्हणजे मग त्याला आपलं पत्र मिळणार." मीं म्हटलं, " होय बरोबर आहे." मग सालेमच्या वाटेवरच्या आमच्या दुसऱ्या मुक्कामावरून काकांनी पुन्हां कुक् साहेबाला पत्र लिहिलं आणि त्या पत्रांत पुढच्या दोन मुक्कामांचे पत्ते लिहून कळविले. तरी कुक् साहेबाकडून कांहीं उत्तर येईना. ही गोष्ट मला जरा चमत्कारिक वाटूं लागली आणि गोपालचा शोध काढण्यासाठीं काय करावं अशा पंचायतींत मी पडलों. पण आम्ही सालेमला पोंचल्यावर चार दिवस झाले तेव्हां एके दिवशीं कुक् साहेबाचं पत्र आलं. आपल्या मळ्यापासून दोन मैलांवरच्या ज्या झोंपड्यांत कुक् साहेबानं पूर्वी आपलं घोडं ठेवलं होतं तिथंच तें घोडं आणि गोपाल दोघेहि होते. ' तूं इथं राहूं नकोस आपल्या मालकांकडे परत जा ' असं कुक् साहेबानं गोपालला दहादां सांगितलं होतं. पण तो कांहीं केल्या घोड्यापासून दूर व्हायला तयारच नव्हता. घोड्याला गोळी घालून ठार करण्याचा बेतहि तो कुक् साहेबाला अमलांत आणूं देईना. " हें घोडं बरं होणार, इतकंच नव्हे तर सर्कसच्या कामीं जें लाख मोलाचं ठरेल असं हें घोडं निघणार, साहेब, तुम्ही बघा तरी." असं गोपाल कुक् साहेबाला वरचेवर म्हणाला होता. गोपाल म्हणजे आचरट गाढव पोर आहे. असं कुक् साहेबानं मनांतल्या मनांत ठरवलं होतं. पण घोड्याला गोळी घालण्याचा हट्टहि त्याला पुरा करवला नव्हता, किंवा " ते मला कांहीं सांगूं नकोस. तूं आपला सर्कशीकडे परत जा कसा. माझ्याकडे थारा मिळायचा नाहीं " असं गोपालला बजावण्याचा कठोरपणाहि त्याच्यान करवला नव्हता. ही सारी हकीगत विस्तारानं कळवून कुक् साहेबानं पत्रांत लिहिलं होतं, " तेव्हां आतां तुम्हीच सांगा. या वेड्या पिराला तुमच्याकडे रवाना करूं कसा ? तुम्ही लिहितां, जरूर तर गोपालला घेऊन येण्यासाठीं मनुष्य पाठवूं पण तुमचा निरोप घेऊन प्रत्यक्ष परमेश्वर आला तरी गोपाल ऐकेल असं मला वाटत नाहीं. असा हेकेखोर तरुण पोरगा मीं जन्मांत कधीं पाहिला नव्हता. आणि त्याच्या हेकेखोरपणाबद्दल त्याला सर्वस्वी दोष द्यायलाहि मन तयार होत नाहीं. त्याची घोड्यावरची भक्ति अजब आहे आणि ' तें घोडं पुढं लाख मोलाचं होणार' हा त्याचा विश्वासहि अजब आहे. मला स्वतःला

घोड्याची फार पारख आहे असा मी गर्व वहातो आणि हा गोपाल जेव्हां या घोड्याबद्दल बोलतो तेव्हां मला हंसू आल्यावांचून रहात नाहीं. पण पुन्हां मनांत येतं, त्याचा काय नेम, या पोराला घोड्याची पारख करण्याची कांहीं अपूर्व ईश्वरी देणगी असेलहि. मागें एकदां माझ्या मळ्यावर मला विहीर बांधायची होती, तेव्हां चार ठिकाणीं मीं साठ साठ फूट खणलं तरी पाणी लागलं नाहीं, पण एका अडाणी शेतकऱ्याच्या पायाळू पोरानं 'अमक्या जागीं खणा' म्हटलं, तिथें कुदळ मारल्याबरोबर पांच फुटावर पाणी लागलं, तसाच कांहीं आशय या गोपालच्या म्हणण्यात असेलहि. सारांश काय तर तुमचा गोपाल माझ्या वाडी-वरच्या झोंपडीत पडून आहे, तिथून हालायला तो तयार नाहीं, आणि त्याला न्यायसाठीं माणूस पाठविलात तरी त्याचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं. त्या पोराची काळजी मी वहातों आहे, तुम्ही फिकीर करूं नका एवढंच शेवटीं लिहितो. ''

या पत्रानं यशोदाचं दुःख दूर होण्यासारखं नव्हतं हें मला कळत होतं पण निदान गोपालला परत आणण्याचा मी प्रामाणिक प्रयत्न केला एवढी खात्री पटून तिचा माझ्यावरचा राग या पत्रानंतर उरणार नाहीं असं मला वाटत होतं. माझी ही कल्पना खरी ठरली. कुक् साहेबाच्या पत्रांतला मजकूर तिला सांगितल्यानंतर तिनं माझ्याकडे बघून उद्गार काढला, " आतां यापेक्षां अधिक तुम्ही काय करणार ! गोपालला इकडे यायचं नाहीं ! मर्जी त्याची ! ''

या बोलण्यानं तिनं मला एक प्रकारें दोषमुक्त केलं होतं. तिला दुःख देण्यासाठीं एक गोष्ट मीं हट्टानं केली या जाणिवेची जी चुटपुट मला लागली होती ती संपली. पण यशोदाचं दुःख मी संपवूं शकलों नाहीं. याबद्दलची हुरहुर वरचेवर मनाला वाटे. सर्कसच्या धंद्याचं स्वरूपच असं आहे कीं त्यांत ज्याचा जन्म गेला तें माणूस अंतःकरणानं जरा धट्टच होतं. मरणाचा प्रश्न सोडला तर सामान्यपणें देखील माणसांची जा-ये दो घटकांच्या मुशाफिरां-सारखी चालू असते. हयातभर एकनिष्ठेनं टिकून राहिलेलीं दहा वीस माणसं सोडलीं तर बाकीच्यांची स्थिति चाहेल तंवर राहिले, नंतर सोडून गेले अशांत-लीच असते. ऋणानुबंधांच्या कायमपणापेक्षां क्षणभंगुरतेचीच संवय माणसाला

अधिक होते, आणि एखादे वेळेस ताटातुटीनं हृदयाला जखम झाली तरी ती अल्प काळांत बरी व्हावी अशी अनुकूल मनोरचना तयार असते. त्यामुळें यशोदानं गोपालला आपल्या पोटच्या मुलाप्रमाणं संभाळून मोठा केला होता, अन् त्याच्या सहवासाला एकाएकी अतरण्याचं दुःख तिला अगदीं आघातासारखं वाटणारं होतं. हें सार हिशोबांत घेऊनहि माझी कल्पना होती कीं, यशोदा फार तर चार सहा महिने दुःखानं चूर होइल, पण नंतर हलके हलके गोपालच्या ताटातुटीचा तिला विसर पडेल. परंतु तसं कांहीं लक्षण दिसेना. माझ्यावरच्या रागाची अढी तिनं सोडली होती पण तिच्या अंतःकरणांतलं दुःखाचं शल्य कांहीं गेलं नव्हतं. महिन्यांमागून महिने जात होते, सालेमहून आम्ही पुढें निघालो ते बंगलोर, कोलार, कांजीवरम्, मद्रास असे मुक्काम केल्यानंतर कोरोमांडल किनाऱ्यावरचीं मुक्कामाचीं गांवं घेत घेत सर्कस पुढें पुढें चालली होती, तथापि ज्याला पोटच्या मुलाप्रमाणें वागविला त्या गोपालला आपण अकस्मात् आणि कायमच्या अंतरलो, या दुःखाची व्यथा यशोदाच्या अंतःकरणांत होती तशीच होती. त्या व्यथेची वाच्यता ती आतां कुणाजवळहि करीत नसे. परंतु तिच्या अंतःकरणांतली खोल खिन्नता मी ओळखूं शकत होतों. आणि तिच्यावर काहीं उपाय नसावा याचा मला फार खेद होत होता. पण आतां यापुढें हें असंच चालायचं असं म्हणून स्वस्थ बसण मला भाग होतं. गोपाल कधीं परत आमच्याकडे येईल अशी खोटी अपेक्षा ठेवण्यांत काय अर्थ होता ?

★ ★ ★

## २

म्हणतां म्हणतां दोन वर्षं संपत आलीं. मच्छलीपट्टणपासून तों कटकपर्यंतचे मुक्काम आटोपून आम्ही पुन्हा कित्येक वर्षांनीं बेगमपेठच्या मुक्कामाला आलो. या ठिकाणचा मुक्काम प्राप्तीच्या दृष्टीनं अगदी उत्तम व्हायचा हें टरलेलं असे. आणि हें गांव आमच्या दौलतरावाच्या विशेष प्रीतींतलं असल्यामुळें इथून हालण्याच्या बाबतींत ते नेहमीं चालढकल करीत असत. पण अर्थात् कुठल्या गांवच्या मुक्कामांतलं उत्पन्नाचं प्रमाण अमुक एका आंकड्याखालीं जाऊं लागलं कीं मग पुढचा मुक्काम गांठण्यांत दिरंगाई करायची नाहीं या बाबतीत त्यांचं माझं एकमत असे. त्यामुळें एके दिवशीं मी जेव्हां त्यांना म्हटलं, " काय काका, बेगमपेठ सोडायची कीं नाहीं ? " तेव्हां ते म्हणाले, " मी उद्यांच्या उद्या दखील इथून मुक्काम हलवायला तयार झालों असतों पण आजच्या डाकेंत हें पत्र आलं आहे तें पहा आणि इथें आणखी दोन दिवस राहायचं कीं नाहीं तें ठरवा. मला वाटतं रहावं-" आणि असं म्हणून त्यांनीं एक जरा जाडसर लिफाफा माझ्या हातीं दिला.

पाकिटांतला कागद मीं काढून पाहिला, आणि लगेच तो काकांच्या हातीं

परत देत मीं हंसून म्हटलं, " माझी मस्करी करतां. कीं काय काका ? मला इंग्रजी पत्र वाचतां आलं असतं तर मग काय पाहिजे होतं. कुणाचं आहे हें पत्र ? "

ते म्हणाले, " कुक् साहेबाचं. "

" कुक् साहेबाचं ! " मीं एकदम अत्यंत आश्चर्यानं विचारलं, " काय लिहितो कुक् साहेब ? "

पत्रांतला मजकूर जेव्हां काकांनीं मला सांगितला तेव्हां माझ्या आश्चर्याला पारावर राहिला नाहीं. मी एका नोकराला बोलावलं आणि म्हणालो, " यशोदा-मावशीकडे जा, अन् तिला म्हणावं असशील तशी इकडे ये. " आणि थोड्याच वेळानं ती येऊन बसली तेव्हां कुक् साहेबाच्या त्या पत्रांतला मजकूर काकांच्या तोंडून मी पुन्हां एकदां वदवून घेतला.

"...कांहीं दिवसांपूर्वी " कुक् साहेबानं पत्रांत लिहिलं होतं, " मी प्रवासांत असतांना तुमच्या सर्कसमधील एका नोकराची व माझी सहज गांठ पडली. तो रजेवर घरीं चालला होता. रजा संपल्यावर परत कामावर जाण्याच्या वेळेस सर्कसचा मुक्काम बेगमपेटला असेल व त्या गांवींच आपण जाऊं असं त्याच्या बोलण्यांत आलं. दोन चार दिवसांपूर्वीं त्या बाजूकडलं एक इंग्रजी वर्तमानपत्र पाहिलं तों तुमची जाहिरात आढळली व तुम्ही बेगमपेटेलाच आहांत अशी खात्री झाली. गेल्या कित्येक दिवस गोपाल तुमच्याकडे परत येण्याच्या गोष्टी बोलत आहे. तुम्ही बेगमपेटेहून हालण्याच्या आंत तुमच्याकडे येऊन दाखल होण्याचं त्यानं ठरविलं आहे. मीं त्याच्याबरोबर आलं पाहिजे असा त्यानं अगदीं आग्रहच धरला. ' मला जावंस फार वाटतं, पण तुमच्या-वांचून मात्र जाणार नाहीं, ' हें आपलं पालुपद तो कांहीं केल्या सोडीत नाहीं. खरं म्हणजे मळ्यांत तंबाखूचं पीक तरारून उभं राहिलेलं आहे. तें उक्तं मागण्यासाठीं दहा व्यापारी हेलपाटे घालताहेत, अशा वेळेस दूरचा प्रवास पत्करून सात आठ दिवस इथें गैरहजर राहणं शहाणपणाचं नव्हे. पण गोपालनं पुन्हां तुमच्याकडे यावं अशी माझी फार इच्छा आहे, आणि तो यायला तयार झाला आहे, तेव्हां मी गेलों नाहीं म्हणून त्याचं जाणं राहिलं असं व्हायला

नको, असा विचार करून शेवटीं त्याच्याबरोबर यायचं मीं कबूल केलं आहे. त्याला घेऊन मी उद्यां किंवा परवां निघतों, आणि तुमचा मुक्काम बेगमपेठेसच असेल अशा हिशोबानं तिकडेच येतों. तुम्हांला सांगण्यासारख्या पुष्कळ गोष्टी आहेत त्या आतां समक्षच बोलूं. पत्रांत कशाला लिहायच्या ? एक सूचना मात्र देऊन ठेवतों. मी आणि गोपाल असे दोघंच येत नाहीं. आमच्याबरोबर आणखी एक प्रवासी असेल या तिसऱ्या पाहुण्याला पाहून तुम्हाला आश्चर्याचा धक्काच बसणार आहे. त्या धक्क्यासाठीं तुम्ही आपल्या मनाची तयारी करावी हें चांगलं. अधिक खुलासा समक्ष भेटल्यावर..."

कुक् साहेबाच्या त्या लिहिण्यानं आम्हांला आनंद झालाच, पण यशोदाला जो आनंद झाला त्यापुढें आमचा कांहींच नव्हे. "म्हणजे गोपाल येणार तर !" असा उद्गार तिच्या तोंडावाटे बाहेर पडला त्यावेळेस तिच्या डोळ्यांत पाणी कसं चमकलं तें मी कधीं विसरणार नाहीं. एके दिवशीं अकस्मात् गोपालची आणि तिची ताटातूट झाली होती, अन् आतां ध्यानींमनीं नसतांना अकस्मात् गोपाल येणार अशी बातमी कुक् साहेबाकडून आली होती ! यशोदाला अगदीं अमर्याद हर्ष व्हावा हें साहजिक होतं. त्या हर्षाच्या भरांत दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीचा विचार तिला सुचण्यासारखा नव्हता; पण मला आणि काकांना मात्र गोपाल येणार म्हणून जसा आनंद झाला त्याप्रमाणेंच कुक् साहेबाच्या त्या पत्रांतल्या अखेरच्या लिहिण्याचा नक्की अर्थ न कळल्यामुळें आम्ही त्या लिहिण्याची चर्चा करूं लागलों आणि तर्क लढवूं लागलों. कुक् साहेब आणि गोपाल हे दोघेच येणार नव्हते, त्यांच्याबरोबर आणखी तिसरं कोणीतरी येणार होतं. हें तिसरं कोण असावं ? आम्ही पुष्कळ तर्क केले पण कांहीं नक्की अंदाज करतां येईना. कुक् साहेबाची बायको तर येणार नव्हती ? किंवा गोपालचं लग्न होऊन त्याची बायको तर त्याच्याबरोबर येणार नव्हती ? माझा स्वभाव हिशोबी असल्यामुळें मीं चटकन् म्हटलं, "गोपाल बायकोला घेऊन येत असेल तर त्याच्यासाठीं स्वतंत्र राहुटीची तजवीज करायला हवी." पण काका हंसून म्हणाले, "तुम्ही फिकीर करूं नका हो. गोपाल बायकोला घेऊन येत असेल असं मला कांहीं वाटत नाहीं." यशोदा तर म्हणाली

कीं "छे ! गोपालनं लग्न केलं असेल हें शक्यच नाहीं. लग्न करावं लागेल या भीतीनं मायापुरम्ला आपल्या पणजोळी जायलासुद्धां तो तयार नव्हता, हें तुम्हाला आठवत नाहीं कां ?" मी यशोदाकडे पाहून हंसलों व म्हणालों, "तें चांगलं आठवत आहे मला. पण तरुण माणसाला बायको केव्हां हवीशी वाटूं लागेल त्याचा नेम नाहीं हें तूं विसरतेस." यावर आम्ही तिघेहि हंसलों. मग तर्क करण्याचं आम्हीं बंद केलं, पण आम्ही तिघंहि आपापल्या मनाशीं आश्चर्य मात्र करीत राहिलों कीं, कुक् साहेब आणि गोपाल यांच्याबरोबर येणारा तिसरा पाहुणा कोण असावा ?

कुक् साहेब आणि गोपाल दोघंच येऊन दाखल झाले तेव्हां काकांनीं कुक् साहेबाला विचारलं "हें काय, दोघंच आला ? तिसरं कोणी येणार होतं ना तुमच्याबरोबर ?" तेव्हां साहेब म्हणाला, "हां, येणार होतं अन् त्या-प्रमाणें ट्रिचीहून रवाना झालंहि आहे. बहुतेक उद्यां इथें येऊन दाखल होईल. डिलिव्हरी घ्यायला तुम्ही आम्ही मिळूनच जाऊं "

साहेबाची ती भाषा मला चमत्कारिक वाटली आणि गोंधळलेल्या स्वरानं मीं विचारलं, "डिलिव्हरी घ्यायला ? असं काय बोलतां ?"

साहेब आणखीच हंसून म्हणाला, "डिलिव्हरी घ्यायला म्हणूं, नाहींतर काय म्हणूं ? आम्ही कोणाला घेऊन आलों आहों अशी समजूत आहे तुमची ?" आम्ही त्याला उत्तर न देतां नुसते पहात राहिलों तेव्हां तो पुढें म्हणाला. "अहो, आमच्याबरोबर आलेला तिसरा पाहुणा म्हणजे कोणी माणूस नाहीं, घोडा आहे घोडा !"

तो खो खो करून हंसत सुटला आणि मी व काका एकमेकांकडे पहातच राहिलों.

आणि दुसऱ्या दिवशीं स्टेशनवर जाऊन व्हॅनमधून बाहेर काढलेला तो घोडा पहाताच माझं आश्चर्य पोटांत मावेना. आश्चर्याप्रमाणेंच आनंदसुद्धां ! मलाच नव्हे तर आम्हां सर्वांनाच विलक्षण आश्चर्य वाटलं तें या गोष्टीचं कीं जो घोडा ट्रिचीहून मुक्काम हालविण्याच्या दिवशीं हिंस्र श्वापदांना खायसाठीं म्हणून आम्ही कापणार होतों आणि ज्या घोड्यामागं पळत जाऊन गोपाल नाहींसा

झाला होता, तोच घोडा आतां जवळ जवळ दोन वर्षांनीं आम्ही पहात होतो. तंबूवर सगळीकडे ही बातमी पसरायला अवधी लागला नाहीं. सर्कस-मधलीं सारीं माणसं गोळा झालीं आणि तोंड वासून पहात उभीं राहिलीं. कुणाचा हि स्वतःच्या डोळ्यांवर विश्वास बसेना. कारण जो घोडा दृष्टीला दिसत होता तो आसन्नमरण अवस्थेंत आम्हीं दोन वर्षांपूर्वी पाहिलेला कुक्-साहेबाचा आजारी घोडाच होता– याबद्दल शंका नव्हतीच, आणि भल्या रुंद पुठ्याचा, मोतिया रंगाचा, तेजःपुंज कांतीचा, पुढच्या उजव्या पायाच्या खुरानं माती उकरीत आणि आपल्या किंचित् गुलाबी नाकपुड्या फुगवून फुरफुरत आमच्यापुढें उन्हांत चमकत उभा राहिलेला तो घोडा म्हणजे ज्यावर नजर सारखी लावावी असं एक सुंदर चित्र होतं !

आणि या घोड्याची गोपालनं कशी शुश्रूषा केली होती, त्या घोड्याला हें रूप किती कष्टानं आणलं होतं, इतकंच नव्हे तर पूर्वी आमच्या सर्कशींतला चकोर घोडा जीं जीं कामं करीत असे तीं तीं सारीं या घोड्याला किती श्रम घेऊन त्यानं शिकविलीं होतीं, याबद्दलची हकीगत कुक् साहेबानं आम्हांला सांगितली तेव्हा आश्चर्यानं आणि आनंदानं माझा ऊर भरून आला. माझ्याविषयीं निष्ठा ठेवून हा सुंदर शिकवलेला घोडा घेऊन गोपाल माझ्या सर्कशीत राहायसाठीं आला या विचारानं तर मला त्याच्याविषयीं एकदम कृतज्ञता वाटली. त्याच्याशीं पूर्वी मीं जी वागणूक केली होती तिची आठवण होऊन मला शरमल्यासारखं सुद्धां वाटलं. माझी शरम झाकायसाठीं मीं यशोदाकडे वळून म्हणालो, “ गोपालचा पगार किती असावा तें तूंच ठरव. ”

ती हंसली व म्हणाली, “ इतके उदार झालांत ? ”

मीं म्हटलं, “ उदार व्हावं असच काम गोपालनं केलं आहे. गोपालनं जो घोडा तयार करून आणला आहे त्याच्यावरून लाख रुपये ओंवाळून टाका-वेत घोड्यांचा राजा आहे नुसता ! राजा ! बस. हेंच नांव ठेवायचं या घोड्याचं ! काय गोपाल, हें नांव पसंत आहे तुला ? ”

गोपाल नुसता हंसला.

त्या घोड्याचं ‘राजा’ हें नांव कायम झालं, आणि त्या नांवानंच त्याचा

उल्लेख हँडबिलांत होऊं लागला. बेगमपेठचा मुक्काम आम्ही मग मुद्दाम वाढविला. काकांनीं गोपालची आणि राजाची खूप जाहिरात केली. राजाच्या पाठीवरची गोपालची कसरत म्हणजे आमच्या खेळांतलं एक प्रमुख आकर्षण ठरलं. आमची सर्कस जणूं नव्यानं आल्याप्रमाणे खेळाला गर्दी होऊं लागली. आठ दिवसांत भरगच्च उत्पन्न झालं कुक् साहेबाला मीं आग्रहानं ठेवून घेतलं होतं. शेवटीं आमचा मुक्काम हालण्याच्या आदल्या दिवशीं तो परत ट्रिचीला जायला निघाला तेव्हां मीं त्याला मोठा खाना दिला, आणि एक सुंदर नवी बंदूक भेट म्हणून देतांना त्याला म्हटलं, " साहेब, तुमचे माझ्या-वर जे उपकार झाले आहेत ते फिटण्यासारखे नाहींत. माझ्या आठवणींतून ते कधीं जायचे नाहींत, याची लहानशी खूण तुमच्याजवळ असावी असं वाटलं म्हणून ही भेट तुम्हाला देतों आहे. "

★ ★ ★

# ३

आम्ही बेगमपेठचा मुक्काम हालवून नेहमींप्रमाणें मयूरभंज, खरगपूर अशा मार्गानं कलकत्त्याकडे निघालो. गोपाल आणि राजा यांची जाहिरात काकांनीं खूपच मोठ्या प्रमाणावर चालविली होती, आणि प्रत्येक गांवच्या मुक्कामांत गोपालचं काम पाहायला प्रत्येक खेळाला विलक्षण गर्दी लोटत होती. आमच्या सर्कशींतले सारेच नंबर नेहमींप्रमाणें एकाहून एक चांगले होते. तारेवरची कसरत करणाऱ्या हिरा आणि तारा या बहिणी, निशाणबाजीचा नंबर करणारा गांगुली आणि त्याची जोडीदारीण उमादेवी, चिनी जादूगार व त्याची बायको इत्सू हे सारे जुने आर्टिस्ट आमच्याकडे होतेच, आणि नवी चांगलीं चांगलीं माणसंहि भरती झालीं होतीं. तोफेच्या तोंडांत बसून डागून घेऊन अंतराळांत उड्डाण करणारा जॉनसन नांवाचा एक गोरा पोऱ्याहि काकांनीं नव्यानं कामावर घेतला होता. परंतु या साऱ्या कामांची लोकप्रियता गोपाल आणि राजा यांच्या नंबराच्या लोकप्रियतेपुढें फिक्की पडली होती. गोपालच्या कामाचं लोकांना अक्षरशः वेड लागलेलं मला दिसत होतं. आणि गंमत अशी कीं गोपालपेक्षांहि घोड्यावर लोक अधिक खूष होते. केवळ घोड्यासाठीं सर्कशीचा खेळ पाहायला

येण्याची रसिकता फक्त गोरे लोक दाखवितात असा माझा आजपर्यंतचा अनुभव होता, पण ती माझी समजूत बदलण्याची वेळ लोकांनीं माझ्यावर आणली. लोक गोपालच्या घोड्यावर असे कांहीं खूष होते कीं विचारूं नका. पूर्वीं चकोर घोडा आमच्याकडे होता तेव्हा नंबराच्या वेळेस बँडवरची नवी गत सुरूं झाली कीं, तो आधीं रंगणात प्रवेश करून चकरा घेऊं लागे, आणि छोटू हालवाई नंतर दाखल होई राजाच्या प्रवेशाची निराळी तऱ्हा गोपालनं ठेवली होती. त्याला तो आपल्यापुढें रगणांत धाडीत नसे. गोपालनं पुढें व्हावं आणि त्याला चांचपल्याप्रमाणें त्याच्या अंगावर तोंड घाशीत, त्याला हुंगल्या-प्रमाणें करीत, आपली झुपकेदार शेपटी हालवीत राजानं प्रवेश करावा. मीं गोपालला एकदोनदां सांगून पाहिलं कीं घोडा रंगणांत आधीं जाऊं दे. पण तो म्हणाला, नको, माझ्या मागोमाग येण्याची मी त्याला संवय केली आहे, ती आतां बदलून उपयोगी नाहीं. मग मीं त्याच्याशीं वाद घातला नाहीं. आणि शिवाय त्यानं जें टरवलं होत त्यामुळे कांहीं विशेष बिघडत नव्हतं. लोकांना आतां माहीत झालं होतं कीं गोपाल आधीं पुढें येतो, आणि त्याला चांचपीत ढुशा देत आल्याप्रमाणें घोडा मागोमाग येतो. तसा तो आलेला पाहिल्याबरोबर साऱ्या तंबूतून एकच टाळी कडकडून उटत असे. सामान्य प्रेक्षकांनीं घोड्याच्या देखणेपणाचं असं कौतुक केलेलं मीं पूर्वीं कधीं पाहिलं नव्हतं. प्रत्येक खेळाच्या वेळेस गोपालच्या मागोमाग येणारा राजा दृष्टीस पडला कीं प्रेक्षकांकडून होणारा तो टाळ्यांचा गजर ऐकला कीं मला फार आनंद होई. माझं स्वतःचं गोपालपेक्षांहि राजावर अधिक प्रेम जडलं होतं; आणि सामान्य लोकांनींसुद्धां गोपालपेक्षांहि घोड्यावर अधिक प्रीति दाखविलेली पाहून मला सहाजिक आनंद होत असे. प्रेक्षकांची ती टाळी ऐकली कीं माझ्या मनांत येई, साहेब लोकांप्रमाणेंच आमच्याहि लोकांना घोड्याचं कौतुक कसं करावं तें कळूं लागलं म्हणायचं...

'राजा' घोडा केवळ सर्कस पाहायला येणाऱ्या प्रेक्षकांच्या कौतुकाचा विषय बनला होता असं नव्हे. त्यांचं कौतुक गांवभर होऊं लागलं. सर्कशींतल्या पहिल्या रांकेंतल्या खेळाडूचा दर्जा गोपालला आतां मिळाला होता. पण मोठा

पगार मिळूं लागला, रहायला स्वतंत्र राहुटी मिळाली तरी त्याचा पहिला साधा स्वभाव कायम होता. तो आपल्या राहुटींत क्वचित्‌च बसत उठत असे. सारा वेळ तो राजाजवळ असे. त्याचं झोंपणंसुद्धां त्या घोड्याजवळ होत असे. राजापासून दूर अशा दिवसांतून दोन घटका तरी तो घालवी कीं नाहीं कोण जाणें. आतां सर्केशींतलीं सारीं माणसं त्याला आदरानं वागवीत असत. पण त्याच्या भोळ्या स्वभावाचा फायदा घेऊन 'गोपाल माझं हें काम कर, तें काम कर,' असं सांगून कुणीहि त्याला राबवून घ्यावं आणि गोपालनं कुणाला नाहीं म्हणूं नये, असा प्रकार चालूंच होता. त्यामुळें गोपालच्या दिवसातल्या चार घटका तरी गांवांत भ्रमंति करण्यांत रोज जात असत. गंमत अशी कीं गांवांत जायचं झालं कीं तो कधी एकटा जात नसे. राजा त्याच्याबरोबर असायचा आणि बाजारांत किंवा इतर ठिकाणीं कुठेंहि गोपाल गेला कीं घोड्याला पाहण्यासाठी जमणाऱ्या लोकांच्या झुंडी त्या दोघांच्या मागून चालायच्या. आमच्या सर्कसच्या खेळाची ही एक नवीनच जाहिरात सुरू झाली होती म्हणाना. गांवांतल्या रस्त्यानं गोपाल निघाला कीं " राजा आला, राजा आला ! " अशी आरोळी पोरं ठोकीत आणि हां हां म्हणतां पांच पंचवीस पोरं आणि मोठीं माणसं घोड्याभोंवतीं जमा होत. बायका देखील त्या गर्दींत घुसायला कमी करीत नसत. एके दिवशीं मला जेव्हां कळलं की राजा पुढें कोरा कागद रस्त्यावर पसरायचा व त्या कागदावर त्यानं खूर टाकला कीं ती त्याची स्वाक्षरी म्हणून जवळ ठेवायची, अशी एक नवीन टूम कोणातरी कल्पक पोरानं काढली असून ती लोकप्रिय झालेली आहे. तेव्हां मीं मनाशीं म्हटलं आता मात्र हद्द झाली म्हणायची !

साराश, गोपाल दोन वर्षांच्या गैरहजेरीनंतर पुन्हां आमच्या सर्केशीत आला तो माझी पुरती मर्जी संपादन करून तर बसलाच, पण सर्केशीं-तल्या खेळाडूच्या वांट्याला येणाऱ्या वैभवाच्या आणि लोकप्रियतेच्या अगदीं शिखरावर चढला. डेरा-उस्मानखानच्या हॉस्पिटलमध्यें जन्मलेलं, आईबापा-विना यशोदाच्या मायेवर मोठं झालेलं, लहानपणीं फक्त एक लांडी चड्डी आणि एक मळका गंजीफ्रॉक एवढ्याच वेषांत वावरलेलं हरिणीचं हें पोर या स्थितीला

येईल असं मला कधीं वाटलं नव्हतं. यशोदा कधीं कधीं त्याच्याकडे बोट दाखवून मला म्हणे, "बघा, किती देखणा जवान दिसतो माझा गोपाल !" मी हंसून मान हालवीत असे. तिचा तो अभिमानाचा उद्‌गार खोटा नव्हता. आतां बावीस वर्षांचा झालेल्या गोपालकडे पाहिलं कीं त्याच्या आईची आठवण आम्हांला अधिक होई कीं बापाची अधिक होई तें सांगणं कठीण होतं तो सहासात वर्षांचा होता तेव्हां यशोदा नेहमीं म्हणायची, " हा आपल्या आईपेक्षां उजळ होणार बघा." पण आतां त्याचा वर्ण जवळ जवळ हरिणीइतकाच काळा वाटूं लागला होता. मी यशोदाला म्हणे, " उजळ होणार होता ना तुझा हा गोपाल ? बघ की किती काळा दिसूं लागला आहे ? " ती म्हणे, " काळा दिसला तर तेंच बरं त्याचं नांव 'गोपाल' आहे. मी यशोदेनं त्याला वाढविलं आहे. तेव्हां तो कृष्णासारखा काळा दिसला तर चांगलंच नाहीं का ? " तिचं त्याच्यावरचं प्रेम इतकं अमर्याद होतं कीं त्याची कोणतीहि गोष्ट वाईट म्हटलेली तिला खपत नसे, हें मी समजून चुकलों होतों तिचं उत्तर ऐकून मी हंसून म्हणत असे, " होय, तूं म्हणतेस तें बरोबर आहे गोपाल कृष्णासारखा आहे खरा. कृष्णाला गाईचं प्रेम होतं, याला घोड्यांचं आहे. "

एकमेकांत असं संभाषण करीत मी आणि यशोदा गोपालकडे बघत रहात असूं. त्याचा वर्ण तर हरिणीसारखा काळा दिसूं लागला होताच, पण शिवाय त्याच्या टपोऱ्या तेजस्वी डोळ्यांची नजर म्हणजे अगदीं हुबेहूब हरिणीची नजर होती आणि त्याच्या डोळ्यांकडे पाहातांच ज्याप्रमाणें हरिणीची आठवण होण्यासारखी होती त्याप्रमाणेंच त्याचा किंचित् लांबट चेहरा, शेंड्याजवळ थोडसं उचललेलं सरळ नाक, आणि रंगानं निराळ्या पण दाटपणात आणि मऊपणांत टोनीच्याच केसांसारख्या त्याच्या केसांची कपाळावर रुळणारीं झुलपं पाहिलीं कीं टोनीच उभा आहे असा भास होई...

खेळाच्या वेळीं राजाच्या पाठीवरच्या करसतीचा नंबर करण्यासाठीं प्रवेश करतांना राजा या कामाबाबत पूर्वीपासून पडलेल्या परंपरेप्रमाणें धोतर अंगरखा आणि मुंडासं घातलेल्या ढेरपोट्या म्हाताऱ्या यात्रेकरूच्या वेषांत प्रवेश करीत असे. पण या प्रवेशांतली प्रारंभींची सारी थट्टामस्करी व दांडगाई आटपल्यावर

यात्रेकरू म्हातारबुवांना घोड्यावर चढविल्यावर, भीतीनं गाळण उडाल्याचं नाटक केल्यावर, गोपाल जेव्हां मुंडासं, अंगरखा आणि नेसलेलं धोतर फेंकून देई, पांढऱ्या मिशांचे कल्ले ओरबाडून काढी, अंगरख्या खालचे शर्ट जाकिटांचे दहाबारा जोड काढून टाकतां टाकतां प्रेक्षकांना हंसवी, तोंडावरच्या गंधाच्या मुद्रा पुसून टाकी, आणि अखेर यात्रेकरूच्या पहिल्या सोंगाचं पुरतं विसर्जन करून तंग पोशाखावर चढविलेल्या जरतारी टिकल्यांच्या मखमली चड्डीनिशीं निष्णात खेळाडूच्या ऐटबाज पवित्र्यांत राजाच्या रुंद पुठ्ठयावर खडा राही, तेव्हां प्रेक्षकांत टाळ्यांचा एकच गजर व्हावयाचा हें रोजचं ठरलेलं होतं. त्या टाळीचा आभारपूर्वक स्वीकार केला असं दाखविण्यासाठीं गोपाल मस्तक किंचित् झुकवून हास्य करायचा, आणि मग पुढच्या अवघड कसरतीची पूर्व-सूचना घोड्याला देण्यासाठीं " हा ! हः ! हॅ ! " असे ठरलेले सांकेतिक इषारे देऊं लागायचा प्रेक्षकांना या नंबराचं एवढं वेड कां लागलं होतं या प्रश्नाचं उत्तर मला यावेळीं सांपडत असे. अश्व-सौंदर्य आणि मानवी-सौंदर्य यांचे ते अपूर्व नमुने कितीदांहि पाहिले तरी समाधान होऊं नये असे होते खचित्. गोपाल राजाच्या पाठीवर जी कसरत करी तिचा एक एक नवा प्रकार पहिल्याहून अधिक थक्क करणारा असे; परंतु दरवेळीं प्रेक्षकांत कडकडून टाळी उठे ती कसरतीच्या प्रकाराला वाहवा देण्यासाठीं जितकी असे तितकीच घोड्याच्या आणि खेळाडूच्या देखणेपणाचं कौतुक करण्यासाठीं असे.

गोपालचा हा नंबर चालू असतांना मी बहुधा रोज रंगणापासून थोड्याशा अंतरावर खेळाडूंच्या प्रवेशद्वाराच्या बाजूला कुठेंतरी उभा असे. एखाद्या-वेळेस यशोदा हळूंच माझ्याजवळ येऊन उभी रहात असे. मी तिला म्हणे, " किती सुंदर हा राजा घोडा ! " ती हंसून म्हणे, " तुम्हाला घोड्यापुढें माणसाचं भान कुठून राहाणार ? माझा गोपाल किती सुंदर दिसतोय तें बघा. " मीं तिला एक दिवस म्हटलं,

"तुझ्या गोपालचा देखणेपणा म्हणजे तुझ्यावर एक जबाबदारी आहे यशोदा. "

तिनं विचारलं, " कसली ? "

मीं म्हटलं, " गोपालसाठीं एक फक्कड बायको नको का पाहायला ? ही जबाबदारी तुझी नाहीं तर कुणाची ? "

ती म्हणाली, " आपली पणजी लग्नासाठीं मुलगी पहा म्हणेल या भीतीनं गोपाल मायापूरमला पुन्हां गेलासुद्धां नाहीं याची आठवण आहे ना तुम्हांला? "

मीं म्हटलं, " आहे "

यशोदा म्हणाली, " गोपाल अजूनहि लग्नाची किंवा बायकोची गोष्ट काढली कीं तसाच पळून जातो. निशाण बाजीचा नंबर करणारा आपला गांगुली आहे ना, तो गोपालची नेहमीं कशी चेष्टा करतो आणि त्याला खिजवितो तें तुम्ही ऐकायला पाहिजे एकदां ! "

" असं काय ? मला नव्हतं माहीत. " असं म्हणून मी रंगणांत चक्करा घालणाऱ्या मोतिया रंगाच्या त्या सुंदर घोड्याकडे पुन्हां बघत राहिलों, आणि अर्धवट यशोदाला सांगितल्याप्रमाणें अर्धवट स्वतःशीं मीं उद्गार काढला, " इतकं देखणं शहाणं घोडं कधीं पाहिलं नव्हतं. "



# १

मला थट्टामस्करी आवडते, पण गांगुलीनं जेव्हां तेव्हा “ तुला बायको हवीशी वाटत नाही ? असा कसा रे तूं भागूबाई ! ” असं म्हणून खो खो करून हंसावं, याचा अर्थ मला खरोखर कळत नसे. मला वाटे, थट्टेला दुसरे विषय नाहींत काय ? आणि हा गांगुली वरचेवर मला सांगतो त्याप्रमाणें बायको आणि बाटली या दोन गोष्टींखेरीज जगांत चैनीचे व सुखाचे विषयच नाहींत काय ? मला तर या विषयांची गरज चुकून देखील कधीं भासली नव्हती, आणि तरी मी इतका आनंदांत होतों कीं यशोदा मावशी मला म्हणे, “ तूं कसल्या मस्तींत आहेस रे ? ”

मी कसल्या मस्तींत होतों तें मावशीला सांगण्याचा मी प्रयत्न करीत असे; पण मला तें नीट सांगतां येत नसे. बोलून चालून आईबापांनीं लहानपणींच टाक-लेला, साऱ्यांनीं झिडकारलेला, केवळ मावशीच्या प्रेमावर वाढलेला असा मीं एक पोरका निरक्षर मुलगा होतों. माझं अंतःकरण उघड करून दुसऱ्याला दाखविणं मला कुठून जमणार ? जगाला वाटे या पोराच्या डोळ्यांत सदा आंसू दिसावेत अशी याची अवस्था आहे; आणि माझ्या तोंडावर सदा हंसूं

असतं, आणि इतर सर्वांना मी सतत हंसूं आणतो हें पाहून लोकांना आश्चर्य वाटे. डोळ्यांत आंसूं येऊं न देतां हंसूं तेवढं दाखवावं हा माझा जन्म-सिद्ध स्वभावच होता. तसा तो कां होता याचं कोडं मी लोकांना कसं उलगडून सांगणार ? तसा तो होता एवढं खरं, आणि मालकांच्या सर्कशींत मी पुन्हां येऊन दाखल झालों तेव्हांपासून तर अगदीं मस्तींत असल्याप्रमाणें मला वाटत होतं हेंहि खरं.

तुम्हीच सांगा, आतां माझ्या आयुष्यांत कसली कमतरता होती ? दादांनीं मला पुन्हां कामावर घेतलं होतं. माझ्यावरचा पूर्वीचा सारा राग विसरून ते माझ्यावर प्रेम करूं लागले होते. कुकू साहेबाच्या मरायला टेकलेल्या घोडयाची मीं शुश्रूषा केली तिचं सार्थक झालं होतं. त्या उमद्या जनावराविषयीं जो विश्वास मीं पहिल्यापासून धरला होता आणि ज्याबद्दल लोकांनीं प्रथम मला वेडयांत काढलं होतं तो विश्वास खरा ठरला होता, व माझा 'राजा' म्हणजे सगळ्यांच्या कौतुकाचा विषय झाला होता ! आयुष्याचं सार्थक झालं असं मला कां वाटूं नये ? आणि मीं मस्तींत कां असूं नये !

गांगुली मला वरचेवर थट्टा करून डिंवची त्याचा मला खरोखरी अर्थच कळत नसे. कित्येकदां मी मावशीच्या राहुटींत तिच्याशीं गप्पागोष्टी करीत बसलों असतांना गांगुली तिथें येई आणि मला म्हणे, " माझ्या राहुटींत चल. तुला थोडी दारू देतों. अरे एकदां घेऊन तरी बघ. "

मी म्हणत असे, " शीः ! मला नको. तूं घे हवी तेवढी. मला कशासाठीं ओढतोस ? "

तो म्हणे, " सुखाची चव तुला थोडी कळावी म्हणून. "
मावशीकडे वळून तो विचारी, " मावशी, हें तरणं ताठं फाकडं पोर असं कसं हो वैराग्यासारखं राहातं ? ना याला छानछोकीची हौस, ना कपड्यालत्त्यांची हौस, ना याला व्यसन ! " आणि पुन्हा माझ्याकडे बघून तो म्हणे, " दर आठवड्याला शंभर रुपये मिळतात त्याचं करतोस तरी काय गोपाल ? "

मी मावशीकडे बोट दाखवून म्हणे, " सारा पगार हिच्या स्वाधीन करतों. विचार हिला. "

गांगुली एकदां मावशीला म्हणाला, " हें पहा मावशी, यानं जरी सारा पगार तुमच्या हातीं दिला तरी तुम्ही पांचपंचवीस रुपये त्याच्या खिशांत नेहमीं ठेवीत जा हातांत पैसे असले कीं माणसाचं लक्ष चैनीकडे जातं. एरवीं जी चैन त्याला आठवत नाहीं ती मग हवीशी वाटते. माझं ऐका, तुम्ही या पोराच्या हातांत जरा पैसे खेळूं द्या. "

मावशी म्हणाली, " हात्तिच्या, माझं काय जातंय रे बाबा ? पांचपंचवीसच कां चांगले शेंपन्नास रुपये त्याच्या खिशांत घालून ठेवीत जाईन मी."

" छान छान !" गांगुली टाळ्या वाजवून म्हणाला. " आतां बघूं या हा गोपाल किती दिवस बैरागी राहतो तें. 'रिकाम्या डोक्यांत सैतानाचे खेळ सुरूं होतात' अशी इंग्रजींत एक म्हण आहे मावशी, ती खोटी नाहीं. पण रिकाम्या खिशांत सैतान कधीं शिरत नाहीं, अशी एक नवी म्हण बनविली तर जास्त खरी ठरेल. "

मला वाटलं होतं हें सारं बोलणं थट्टेचं आहे. पण दुसऱ्या दिवशीं मी बाजारांत जायला निघालों, आणि कपडे चढवून खिशांत हात घातला तों माझ्या हाताला खरोखरच नोटा लागल्या. मी मावशीकडे गेलों व " मावशी, हें ग काय ? " असं म्हणून नोटा तिच्या अंगावर फेंकल्या. पण पुन्हां दुसरे दिवशीं माझ्या खिशांत त्या परत आल्या. मग मात्र मावशीचा राग येण्याऐवजीं मला तिचं हंसूं आलं. मीं त्या तशाच खिशांत राहूं दिल्या आणि बाहेर पडलों. दौलतराव काकांचं एक पत्र छापखान्यांत नेऊन द्यायचं होतं, व तें काम करून मी लगेच तंबूवर परत येणार होतों, म्हणून राजाला मीं बरोबर घेतलं नाहीं. एकटाच निघालों. छापखान्यांतलं काम आटपून मी परतलों तों त्या हमरस्त्याच्या कोंपऱ्यावर कुणी तरी हांक मारलेली मला ऐकूं आली. " गोपाल ! ए गोपाल ! " मीं वळून पाहिलं तो जरा अंतरावर घोडागाडींत बसलेला गांगुली माझ्या दृष्टीस पडला. तो ओरडून म्हणाला, " अरे इकडे ये. " आणि मी जवळ गेलों तेव्हां माझा हात धरून तो म्हणाला, " बैस, गाडींत बैस. " मला त्यानं अधिक बोलूंच दिलं नाहीं. मी त्याच्या शेजारीं बसलों. तो कुठें निघाला होता, आणि कोंपऱ्यावरच्या गल्लीच्या तोंडाशीं गाडी उभी कां

राहिली होती तें मला कळेना. तोहि कांहीं सांगेना. मला बसवून घेऊन सिग-रेटचे झुरके मारीत तो आपला स्वस्थ बसून राहिला. मीं त्याला म्हटलं,

" परत तंबूवरच निघालास ना तूं ? "

त्यानं विचारलं, " तुला परत जायची घाई नाहीं ना ? " मीं मान हाल-विली तेव्हां तो म्हणाला, " मग बैस तर. "

मी बसून राहिलों. पण गाडी कां चालू होईना तें मला कळेना. हांकण्याच्या जागेकडे पाहिलं तों गाडीवान मला दिसला नाहीं. मीं गांगुलीला विचारलं, " गाडीवाला चहा प्यायला गेला आहे वाटतं ? " गांगुलीनं मान हालवितां हालवितां डोळा मिचकावला, " मुकाट्यानं बसून रहा तूं. "

मी मनाशीं म्हणालों, ' अरेच्या ! हा आहे काय प्रकार ? ' पण मी स्तब्ध बसून राहिलों. गांगुलीला बिलकुल घाई नव्हती असं दिसलं. त्यानं संपत आलेलं सिगरेटचं थोटुक फेंकलं, थुंकी टाकली, दुसरी सिगरेट काढून पेटवली, आणि झुरके ओढीत तो खुशाल बसून राहिला. बराच वेळ झाला तरी गाडीवाला परत आला नाहीं. हें काय चाललंय् मला समजेना. गाडींतून उतरून चालूं लागावं असं माझ्या मनांत आलं. पण तितक्यांत फोपश्या अंगाचा लठ्ठ गाडीवाला लंगडत लंगडत, हातांतला गोंडेबाज चाबूक सांवरीत, धापा टाकीत धांवत येत असलेला मला दिसला. तो जवळ येऊन उभा राहिला तेव्हां गांगुलीनं त्याला विचारलं, " काय रे ? आहे कां कांहीं ? " तो म्हणाला, " आहे साहेब. फक्कड आहे ! " गांगुली म्हणाला, " मग चल तर जलदी. " " हां साब. " असं म्हणून तो ढेरपोट्या लठ्ठ गाडीवाला आपल्या जागीं चढून बसला, आणि ' च्यक् च्यक् ! ही ! हर्र ! ' असे आवाज घोड्याला उद्देशून करून लगामाला दोन तीन हिसके देऊन त्यानं तो चार चाकी खटारा एकदांचा जागचा हालविला. गांगुलीचीं आणि त्याचीं जीं प्रश्नोतरं झालीं होतीं त्यांचा बोध मला झाला नव्हता आणि आमची गाडी आतां कुठें जाणार होती त्याचीहि मला कल्पना करतां येत नव्हती. मीं गांगुलीला विचारलं,

" अरे, कुठें चाललों आहोंत आपण ? "

त्यानं नाकावर बोट ठेवलं अन् म्हटलं, " तुला काय करायचं ? मुकाट्यानं

बसून रहा. " त्यानं झटकन् पुढें वांकून माझ्या खिशांत हात घातला, व त्याच्या हाताला नोटा लागल्या तेव्हां हंसून तो म्हणाला, " हरकत नाहीं. "

मी त्याच्याकडे आ वासून बघत राहिलों. आणि तें पाहून तो मोठमोठ्यांदा हंसत सुटला. तितक्यांत घोड्याचे नाल फरशीवर खरडल्यासारखे वाजले. ड्रायव्हरनं एकदम लगाम खेंचला होता आणि गाडी उभी राहिली होती. तो आपल्या जागेवरून उतरून जवळ येऊन गांगुलीला म्हणाला, " उतरा साहेब. " गांगुलीनं विचारलं, " आलं काय मकान ? " गाडीवाला म्हणाला, " हां, हेंच नव्हे काय. " " गोपाल, चल. " असं म्हणून उतरतां उतरतां गांगुलीनं मला ओढलंच. गाडीवानानं उजव्या हातच्या एका घराच्या पायऱ्या चढून दार लोटलं. मीं गल्लीच्या वरच्या खालच्या बाजूंस नजर टाकून घेतली. शहराच्या कुठल्या भागांत आम्ही आलों होतों मला कळेना आणि गांगुलीचं कुणाकडे काय काम होतं त्याचाहि तर्क करतां येईना. पायऱ्यांच्या खालीं मी जरासा आडल्याप्रमाणें उभा राहिलों कीं काय कुणास ठाऊक. गांगुलीनं मला खेंचल्यासारखं केलं आणि घरांत नेलं. छोट्याशा चौकाच्या पलीकडच्या बाजूस कमरेला चौकटीच्या चादरीची लुंगी लावलेला आणि अंगांत कळकट गंजिफ्रॉक घातलेला एक दांडगा माणूस उभा होता, त्याच्या कानांत गाडीवाल्यानं कांहींसं सांगितलं. तो लुंगीवाला खांकरून चौकांत थुंकला, आणि आम्हांला सलाम करून व मागोमाग येण्याची खूण करून उजव्या हातचा जिना चढूं लागला.

माडीवरच्या दालनांतल्या बैठकीवर आम्ही बसलों. गांगुलीचं सिगरेट फुंकणं चालूंच होतं. तो दांडगा लुंगीवाला आतां धांवपळ करूं लागला. आंतल्या खोलींतून त्यानं हुक्का आणून दिला, पानदान आणून ठेवलं प्रत्येक वेळेस तो आम्हांला बंदगी करीत होता. आम्ही जिथें बसलों होतों तिथल्या साऱ्या खिडक्या लावलेल्या होत्या. त्यांवरच्या झरोक्यातून जो प्रकाश पडला होता तेवढाच, ती गल्ली, तें घर, ती माडी, तो अंधेर, ती गुपचूप, आणि त्या दांडग्या लुंगीवाल्याच्या येरझारा— तें सारं मला एखाद्या कोड्यासारखं वाटायला लागलं. एखाद्या भेदरलेल्या ससासारखं मला झालं. मीं गांगुलीला

चिमटा काढला आणि विचारलं, " कुणाकडे आलों आहोंत आपण ? अन् मला कशाला घेऊन आला आहेस ? मला सोड. " त्यानं पुन्हां नाकावर बोट ठेवलं व म्हटलं, " ह्य ! वेडा काय तूं ? " तितक्यांत तो लुंगीवाला पुन्हां बाहेर आला आणि हात चोळीत भिंतीजवळ उभा राहिला. गांगुलीनं त्याला खूण करून जवळ बोलावलं, आपल्या खिशांतल्या दोन नोटा काढल्या, माझ्या खिशांतल्या काढून त्यांतल्या दोन घेऊन बाकीच्या ठेवल्या, आणि दहादहाच्या चार नोटा त्या लुंगीवाल्याच्या हातावर ठेवल्या. दांत विचकून सलाम करून तो लुंगीवाला आंत गेला.

दोन मिनिटांत तो परत आला तेव्हां त्याच्याबरोबर दोन तरुण पोरी होत्या ! त्या दोघी हंसत पुढें आल्या. त्यांच्यापैकीं एक गांगुलीला चिकटून बसली. दुसरी माझ्याजवळ बसणार असं मला वाटलं—

मी ताडकन् उठलों, जिन्याच्या पायऱ्या उतरून खालीं आलों, आणि रस्त्याला लागलों.

रात्रीं खेळाच्या वेळेस मी मेक-अप् करीत होतों तेव्हां गांगुली माझ्या राहुटींत आला आणि मला म्हणाला, " तुझ्यासारखा पागल मुलगा मीं कधीं पाहिला नव्हता. अरे एक फांकडी पोर तुझ्याजवळ येऊन बसली, तिला जवळ ओढून घेण्याऐवजीं तूं पळून गेलास ? आतां काय म्हणावं तुला ? " मीं त्याच्याकडे मुळींच लक्ष दिलं नाहीं. मला त्याचा राग आला होता व त्याच्याशीं बोलण्याची माझी इच्छा नव्हती. पण तो निघून जाण्याऐवजीं उभाच राहिला आणि बडबड करूं लागला. त्या मुली कुठून आल्या होत्या व त्यांची बातमी आपण किती खटपटीनं मिळविली होती त्याचं वर्णन तो करूं लागला. मला त्याचं बोलणं ऐकवेनासं झालं. मीं एकदम त्याच्याकडे वळून म्हटलं, " गांगुली, बंद कर तुझी वटवट. असल्या गोष्टी बोलायची तुला शरम वाटत नसली तरी ऐकायची मला वाटते. माझ्या राहुटींत उभा राहूं नको ! जा ! "

तो हंसला आणि निघून गेला. पण त्यानं त्या दोन मुलींची जी हकीकत सांगितली होती, ती माझ्या मनांतून जाईना. त्या दिवशीं एकीकडे माझे नंबर करतांना दुसरीकडे त्या मुलींची हकीकत मला आठवत होती. रात्रीं

अंथरुणावर पडल्यावरहि ती आठवत होती. आणि माझ्या मनांत अनेक विचार येत होते. फाळणीमुळें देशोधडीला लागलेल्या किती घरंदाज कुटुंबांतील किती मुलींवर असा प्रसंग आला होता कोण जाणे ! आणि अशा मुलींचं रक्षण करण्याऐवजीं त्यांच्या असहाय्यतेचा फायदा घेणारे किती 'गांगुली' या देशांत होते कोण जाणे !...तंबूच्या आवारांत जिकडे तिकडे सामसूम झालं होतं. परंतु माझ्या मनांत कांहीं केल्या सामसूम होईना. उजाडेपर्यंत मी आपल्या कॉटवर जागाच पडून राहिलों होतों दुसऱ्या दिवशीं त्याच विचारांनीं माझ्या मनाचा पाठलाग चालविला होता.

आणि मग दिवसांमागून दिवस जाऊं लागले तरी ते विचार माझी संगत सोडीनात रस्त्यांतल्या एखाद्या मुलीचा चेहरा जरा थोडा कावरा बावरा दिसला, कीं मला वाटे ही दुर्दैवी निर्वासितांपैकीं आहे आणि तिच्या बरोबरच्या माणसाचा चेहरा जरा संशयास्पद वाटला, कीं मला वाटे तिचा घात करण्यासाठीं हा हिला कुठेंतरी भलत्या ठिकाणीं घेऊन जात आहे. मग मी स्वतःशीं विचार करूं लागे, मी हें सारं नुसतं पाहूं ? या गोष्टीचा प्रतिकार करण्याचं कांहींच सामर्थ्य माझ्या अंगीं नाहीं ? कोणतंच साधन माझ्याजवळ नाहीं ? ज्या मुलीकडे पाहिल्यानं माझ्या मनांत असे विचार घोंगावूं लागत ती मुलगी कदाचित् मी समजतों तशी संकटग्रस्त नसेलहि, असं माझं मन मला कांहीं वेळानं सांगूं लागे. परंतु मला वाटे, ही नसेल, पण मला ज्या दिसत नाहींत अशा दुसऱ्या किती तरी असतीलहि ! आणि जी खरोखरच संकटांत आहे अशी एखादी निर्वासित मुलगी मला प्रत्यक्ष दिसली तर मी काय करणार आहे ? तिचं रक्षण करणार आहे ? तिला आश्रय देणार आहे ?...अशा विचारांचं भ्रमण डोक्यांत वागवीत मी माझे उद्योग पार पाडीत असे, रस्त्यानं जात येत असे, रात्रींच्या खेळांतलीं कामं करीत असे...वारंवार मनात येई, जिला माझ्या रक्षणाची गरज आहे अशी निर्वासित मुलगी दिसली तर मी काय करणार आहे ? ...

आणि एके दिवशीं अशी मुलगी मला खरोखरच दिसली !

शहरांतल्या एका पुलाजवळच्या एका देवळापासून नदीच्या पात्रापर्यंत उंचच्या उंच फरसबंद घाट होता. जिथें पायऱ्यांचे टप्पे होते तिथें दोन्ही बाजूंस

बुरूज होते. त्यांपैकीं एका बुरुजावर खालीं पाय सोडून मी बसलों होतों. पुलावरून धांवणाऱ्या वाहनांची वर्दळ आणि देवळांत पुनःपुन्हां वाजणाऱ्या घंटांचे आवाज ऐकूं येत होते. खालीं नदींत माल-वाहू पडाव उभे होते, त्यांच्या बाजूनं छोट्या छोट्या होड्या वरखालीं जात येत होत्या. पलीकडल्या तीरापासून जवळच एक छोटी गिरणी होती, तिथल्या एंजिनाचा आवाज कानांवर येत होता. माझ्या पाठीमागच्या बाजूस एका विस्तीर्ण झाडाखालच्या तळावर एक दोनच बैलगाड्या सुटलेल्या होत्या, व तिथें चुली पेटवून गाडी-वाले स्वयंपाक करीत होते. देवाला वाहिलेल्या दोन गलेलठ्ठ गाया तळावर पडलेला पालापाचोळा खात हिंडत होत्या. घाटाच्या पायऱ्यांवरून मधेंच एखादी बाई भरलेली घागर घेऊन चढतांना दिसत होती. खालच्या एका बुरुजावर एक भिकारी साधू आपली छाटी वाळवीत होता...दूरच्या-जवळच्या या गोष्टींची शून्य मनानं दखल घेत मी बसून राहिलों होतों...किती वेळ मीं असा बसलों होतों कुणास ठाऊक. पण शेवटी त्या जागेचा कंटाळा आला, आणि विचार केला, जाऊं या आतां. मी उठलों आणि उभा राहिलों. अंगाला आळोखे पिळोखे दिले. आणि बुरुजावरून घाटाच्या पायऱ्यांकडे मी वळणार तोंच मागच्या बाजूनं "बाबूजी!" अशी हांक मला ऐकूं आली. मी थबकलों आणि वळून पाहिलं.

एक मध्यम वयाचा काळेला माणूस हात जोडून उभा होता. त्याच्या अंगांतला बिनकॉलरीचा पायघोळ शर्ट खांद्यावर, छातीवर फाटलेला होता. त्यानं दाढी राखलेली नव्हती पण बरेच दिवस श्मश्रू न केल्याप्रमाणें वाढावी तशी वाढली होती. डोक्यावरचे केस फिस्कारलेले होते. एखाद्या भिकाऱ्यासारखा तो दिसत होता तथापि त्याच्या चर्येत असं कांहीं तरी होतं, कीं त्यामुळें तो भिकारी आहे असं मला म्हणवेना. मी त्याच्याकडे पाहिलं तेव्हां तो पुन्हां म्हणाला, "बाबूजी," आणि दोन पावलं हलकेंच टाकून माझ्याजवळ आला. "मी मोठ्या संकटांत आहे. आम्ही पूर्व-बंगाल्यांतून घरदार सोडून कसाबसा जीवं वांचवून इकडे आलों आहोंत—"

'आम्ही?' जणूं त्याच्या त्या शब्दाचा खुलासा करून घेण्यासाठीं मीं दृष्टि

इकडे तिकडे टाकली, तेव्हां माझ्या लक्षांत आलं, कीं तो एकटा नव्हता. त्याच्या मागं थोड्या अंतरावर एक लहान सुमारें तेरा चौदा वर्षांची मुलगी अर्धवट खालीं मान घालून उभी होती. आम्ही म्हणजे तो आणि ती असावी. का आणखी कोणी होतं कोण जाणे? मी त्याचं पुढचं बोलणं ऐकूं लागलों.

त्याच्या कुटुंबांत पुष्कळ माणसं होतीं, नोकर चाकरहि होते. पण ते सारे मारले गेले होते. त्याचं वतनहि लुटलं गेलं होतं. लपून छपून मरण चुकवीत, खायला नाहीं. प्यायला नाहीं, निवारा नाहीं अशा अवदशेंत वाटचाल करीत त्यानं या मुलीला पोटाशीं धरून संभाळून मोठ्या शिकस्तीनं सरहद्द ओलांडली होती, आणि पश्चिमी-बंगालच्या कुशींत कुठें आसरा मिळतो कां म्हणून तो आणि ती हिंडत होतीं. त्याचं नांव पथिकबाबू. त्याच्या मुलीचं देवकी. या शहरीं चार दिवसांपूर्वी तीं दोघं आलीं होतीं; पलीकडच्या देवळांतल्या एका ओरींत पडली होतीं; त्यांनी जन्मांत कधी भीक मागितली नव्हती. आतां भीक मागितल्यावांचून पोटाची खळगी भरतां येण्यासरखी नव्हती... "बाबूजी," तो पुढें म्हणाला, "आम्ही होतों कोणत्या स्थितींत आणि आहोंत कशा अवस्थेंत याचा विचार मनांत आला, की वाटतं या पोरीला पोटाशीं बांधावी अन् या नदीच्या डोहांत उडी घ्यावी."

त्याच्या तोंडचे ते शब्द ऐकून माझ्या अंतःकरणाची कालवाकालव झाली. आम्हां सर्कसमधल्या लोकांना बाहेरच्या जगांतल्या उलाढालींची दाद क्वचितच असते. तोंड रंगवावं, रंगणांत जावं, नाचावं, उड्या माराव्या, चाबकांचे कडाड् कडाड् आवाज करीत घोडे फिरवावे, उंच हवेंत झोके घ्यावे. क्रूर जनावरांचीं कामं घ्यावीं, दांत विचकावे, वांकुल्या दाखवाव्या, लोकांना हंस-वावं, थक्क करावं, आणि या घटकाभरच्या करमणुकीसाठीं लोकांनीं फेंकलेल्या पैशावर जगावं हेंच आमचं जिणं! या जिण्याच्या मर्यादेबाहेर जगांत घडणाऱ्या गोष्टींचा स्पर्श आम्हाला होत नाहीं. रात्रीच्या खेळाच्या वेळेस आमच्या तंबूंत जमणारी गर्दी एवढीच दुनिया आम्हांला माहीत. तिचं हंसूं आणि तिचे आंसूं यापलीकडे आम्हांला काहीं दिसत नाहीं...देश गुलामगिरींत होता तेव्हां जें आम्हीं करीत होतों तेंच तो स्वतंत्र झाल्यावरहि आम्ही करीत होतों. आणि

त्या स्वातंत्र्याच्या मागोमाग तिकडे पंजाबांत अन् इकडे बंगाल्यांत लाखों माणसांच्या आयुष्यांची जी उलथापालथ झाली, तिच्या बातम्यांनीं जिकडे तिकडे अस्वस्थता माजली होती तरी आम्ही तेंच करीत होतों. कानांवर शेंकडों हकीकती येत असत, पण त्या ऐकायच्या, फार तर उसासे टाकायचे, आणि कासव ज्याप्रमाणें आपल्या कवचांत अंग ओढून घेऊन बाहेरच्या जगाचा संपर्क तोडून जगत राहतं, त्याप्रमाणें आमच्या चिमुकल्या दुनियेंत पुन्हां रंगून जायचं एवढंच आम्ही करीत होतों...

पण पथिकबाबूची ती हकीकत ऐकतां ऐकतां माझ्या भोंवतालचं हें नेहमीचं कवच तडातड तुटून त्याचीं टरफलं पार उडाल्यासारखीं वाटलीं. ज्यानं समुद्रावरच्या वादळाच्या गोष्टी फक्त दुरून ऐकलेल्या आहेत अशा माणसाच्या अंगावर, किनाऱ्यावर सहज सहल करीत असतांना, खाली जोरानं आपटून फुटलेल्या लाटेचे खारट फवारे उडाले, कीं त्याच्या मनाची जशी अवस्था होईल तशी माझ्या मनाची झाली. निर्वासितांच्या दुर्दैवाच्या आणि पळापळीच्या कहाण्या मीं आजपर्यंत नुसत्या दुरून ऐकल्या होत्या. गांगुलीबरोबर त्या दिवशीं त्या गल्लींतल्या माडीवर गेलों तेव्हां एक निर्वासित मुलगी मला दिसली होती. पण आतां दुर्दैवाची लाट मला आणखीच जवळून दिसत होती. मुळासकट उन्मळून उडालेल्या एका अभागी कुटुंबाचे अवशेष माझ्यापुढें उभे होते ! वादळानं ढवळल्या जाणाऱ्या समुद्राच्या पाण्यांत वांकडे तिकडे हेलकावे खाऊन अखेर लाटेनं फेंकलेल्या बेफाम उसळीबरोबर किनाऱ्यावर पडलेल्या दोन काटक्या माझ्या पायाशीं येऊन पडाव्या त्याप्रमाणें मला दिसत होत्या...

" मी जगांत एकटा उरलों असतों तर एकप्रकारें बरं झालं असतं असं वारंवार वाटतं. " पथिकबाबू म्हणत होता, " जगणं सोपं झालं असतं; जगणं नकोसं वाटलं असतं; तर मरणंही सोपं झालं असतं. पण या पोरीला पाठीवर घेऊन जगणं फार मुष्किल आहे. नुसती तिच्या जिवाचीच काळजी घ्यायची नाहीं. जिवापेक्षां अधिक मोलाची अशी एक गोष्ट आहे. तिची अब्रू ! त्या अब्रूनिशीं तिला संभाळली पाहिजे. तिच्या जिवावर नाहीं पण तिच्या अब्रूवर टपलेले लांडगे या दुनियेच्या जंगलांत फार आहेत. या पोरीची अब्रू जिथें

सुरक्षित राहील अशी जागा कुठें सांपडेल कां? बाबूजी, तुम्ही मला मदत कराल काय? तुमच्या रूपानं परमेश्वरच मला भेटला असं माझं मन मला सांगतं आहे; म्हणून तुमच्या पायांवर ही पोटची पोर ठेवून तुमच्या दयेची भीक मागतों आहे... "

बोलतां बोलतां पाठीमागं उभ्या असलेल्या आपल्या पोरीला त्यानं चटकन् हातानं ओढली. आणि तिला माझ्या पायांवर डोकं ठेवायला लावलं.

एखाद्यानं माझे पाय धरावे याची मला जन्मांत कधीं संवय नव्हती. मी भांबावून गेलों. त्या दोघांची करूण कहाणी ऐकून माझं अंतःकरण आधींच दुःखानं भारावून गेलं होतं. त्यांतच त्या अभागी माणसांनीं मला देवपण दिलेलं पाहून मला विलक्षण शरम वाटली. मनांत आलं, आपले प्राण देऊन या दोन जिवांचं रक्षण आपल्याला करतां येत असेल तर करावं...मनांतल्या दुःखानं आणि शरमेनं माझ्या तोंडून शब्द मात्र फुटेना. त्या मुलीला मीं उठायला लावलं. तिच्या केसांवरून तोंडावरून हात फिरविला. पण काय बोलावं तें मला सुचेना. मी गप्प उभा राहिलों...

पथिकबाबूनं " बाबूजी " असं काकुळतीनं पुन्हां म्हटलं, तेव्हां मी त्याला म्हणालों, " असं करूं, तूं आणि तुझी ही देवकी आतां माझ्याबरोबर चला. मी एक सर्कशींतला खेळाडू आहे मी कांहीं कुठल्या टोलेजंग वाड्यांत रहाणारा नाहीं. राहुटींत राहतों. माझ्याकडे तुम्ही आजची रात्र काढा. उद्यां सकाळीं आपण निवांतपणें बोलूं. अन् काय करायचं तें ठरवूं. "

मी त्या दोघांना घेऊन तंबूवर आलों. देवकीला मावशीच्या स्वाधीन केली. पथिकबाबूला माझ्या राहुटींत घेऊन गेलों. रात्रभर मी विचार करीत होतों, पुढें काय करायचं. एकच मार्ग मला सुचत होता तो हा, कीं आपल्या मुलीला घेऊन सर्कसमध्यें राहाण्याची पथिकबाबूची तयारी असेल तर मालकांना आणि दौलतराव काकांना विनवणी करून सांगायचं कीं या दोघांना ठेवून घ्या. पथिकबाबू चांगला धट्टाकट्टा होता सर्कसच्या रगाड्यांतलीं चार कामं त्याच्यानं उरकणं कांहीं कठीण नव्हतं.

पण माझा हा विचार मीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं पथिकबाबूला सांगि-

तला तेव्हां त्याला तो कांहीं एकदम पटला नाहीं. त्याची इच्छा अशी दिसली कीं देवकीला मीं ठेवून घ्यावं, आणि त्याच्या हातावर पैसे ठेवून त्याला जाऊं द्यावं. " तुमच्याकडून मला चांगली रक्कम मिळाली " तो म्हणाला, " तर मी कुठें तरी कांहीं तरी उद्योग सुरू करीन. जम बसला, नीट पायांवर उभा राहिलों, बरे दिवस आले कीं तुमच्याकडे येऊन मुलीला घेऊन जाईन. मला हजार पांचशें रुपये द्या म्हणजे झालं... "

त्याचं तें बोलणं मला कांहींसं चमत्कारिक वाटलं. पण त्यांत अर्थ होता असंहि वाटलं. मी मावशीकडे गेलों आणि तिला म्हटलं, " तुझ्याजवळ माझे जितके पैसे सांठले असतील तितके सगळे काढून दे. " तिनं विचारलं, " कशाला ? " मीं म्हटलं, " मग सांगेन. " तिनं आपल्या ट्रंकेंत ठेवलेली एक लहानशी चटईची पेटी काढली व माझ्या हातीं दिली. मीं विचारलं, " किती आहेत ? " ती म्हणाली, " मी कशाला कधी मोजले आहेत ! तूं दिलेस तसे ठेवले आहेत. " मीं झांकण उघडून नोटा मोजल्या. साडेसातशें रुपये होते. ते पेटींत पुन्हां घालून पेटी बंद केली, आणि ती घेऊन राहुटीवर परत येऊन ती पथिकबाबूच्या हातांत ठेवीत म्हटलं, " साडेसातशें आहेत. माझी सारी संपत्ति मीं तुम्हांला दिली आहे. याहून अधिक मला देतां येत नाहीं याबद्दल मला वाईट वाटतं. "

पथिकबाबूनं माझे पाय घट्ट धरले, आणि तो हुंदके देऊन रडूं लागला. " साक्षात् तारकेश्वर तुमच्या रूपानं मला भेटला. " असं तो पुटपुटत राहिला. उपकाराच्या जाणिवेन इतकं गहिंवरलेलं माणूस मीं पूर्वीं कधीं पाहिलं नव्हतं. माझा निरोप घेतांनाहि त्याचे हुंदके चालूंच होते. " परमेश्वरानं माझ्यावर येवढीच कृपा करावी, कीं तुमचे हे पैसे परत करण्याचं सामर्थ्य मला द्यावं ! " तो वरचेवर म्हणाला, " पोरीला मीं तुमच्या पायांवर घातली आहे. मला तिची चिंता नाहीं केव्हांना केव्हां तरी मी परत येऊन तिला घेऊन जाईन... " त्यानं पुन्हां माझ्या पायांवर डोकं ठेवलं, आणि तो निघून गेला.

मी भारावलेल्या मनानं स्वस्थ बसून राहिलों. पथिकबाबूच्या नजरेंत जी कृतज्ञता मला दिसली होती ती पाहून मला वाटत होतं जन्माला आलों त्याचं

थोडं तरी सार्थक झालं. जगांतलं दुःख माझ्या शक्तीप्रमाणें मीं थोडं तरी कमी केलं. एका अभागी पित्याच्या हृदयाची तळमळ थोडी तरी शांत केली. आयुष्यांतून उठलेल्या एका माणसाला परत आयुष्यांत आणलं. सर्वस्वाला मुकलेल्या एका माणसाला पुन्हां जगण्याचा मार्ग दाखविला. आजपर्यंत जी मिळकत सांठविली ती सार्थकी लागली...

मनाच्या त्या विलक्षण समाधानी अवस्थेंतहि जरा वेळानं मला एका गोष्टीचं मात्र आश्चर्य वाटूं लागलं. ती गोष्ट प्रथम माझ्या लक्षांत आली नव्हती. पण आतां आली. पथिकबाबूनं अखेर जातांना आपल्या लेकीची भेट घेतली नव्हती. माझ्या राहुटींतून बाहेर पडून तो तडक निघून गेला होता. अशा घाईनं कीं जणूं आतां इथें अधिक राहतां कामा नये असं त्याला वाटत होतं. त्याला कसली तरी घाई होती, कसली तरी भीति वाटत होती ही गोष्ट आतां माझ्या लक्षांत आली तेव्हां ती मला फार चमत्कारिक वाटली. माझ्या मनाचं समाधान ढळलं नाहीं, पण पथिकबाबूच्या त्या वागण्याचं मी मनाशीं फार आश्चर्य करीत राहिलों.

आणि संध्याकाळीं तर माझ्या या आश्चर्यांत दुसऱ्या एका मोठ्याच आश्चर्याची भर पडली. मावशी माझ्या राहुटींत आली व मला विचारूं लागली.

“ ते पैसे घेऊन आलास ते परत दे. ”

मीं म्हटलं, “ मीं ते देऊन टाकले. ”

तिनं कपाळावर हात मारला आणि म्हटलं, “ कुणाला ? ”

“ देवकीच्या बापाला ! ”

“ देवकीचा बाप केव्हांच स्वर्गांत गेला आहे ! ” ती म्हणाली.

मीं आश्चर्यानं विचारलं, “ म्हणजे ? मग पथिकबाबू—— ? ”

मावशी म्हणाली, “ तेंच तुला सांगायसाठीं धांवत आलें. कुठाय तो पथिकबाबू ? तो आला कीं त्याला विचार—— ”

“ तो आतां येणार नाहीं ! तो माझा निरोप घेऊन गेला. ”

“ मग तुझे पैसे बुडाले तर ! एका डँबिसानं तुला चांगलं ठकविलं. ”

मीं म्हटलं, “ म्हणजे काय मावशी ? तूं हें काय सांगतेस ? ”

" माझ्या पदरचं नाहीं सांगत. तिकडे चल आणि देवकीला विचार. तिची खरी हकीकत ऐक. "

" मी नाहीं येत. देवकीनं तुला काय सांगितलं तें तूंच मला सांग. "

मावशी म्हणाली, " ती म्हणते, हा पथिकबाबू तिचा बाप नाहीं, नातेवाईकसुद्धां नाहीं. यानं तिला पळवून आणली होती. तिला विकून टाकून पैसे मिळवायचे होते त्याला. पूर्व-बंगाल्यांत मधुबानी नांवाच्या गांवीं देवकीचे आईबाप होते, घरदार होतं, हें सगळं खरं. तिच्या साऱ्या माणसांची वाताहात झाली हेंहि खरं. पण हा पथिकबाबू लुटालूट करणाऱ्यांपैकीच होता. त्याचं खरं नांवहि निराळं आहे, जातहि निराळी आहे. मी तिचा बाप आहे असं जें तो सांगत सुटला होता तें सारं खोटं होतं. आपला डाव साधायसाठीं त्यानं हुशारीनं घेतलेलं तें सोंग होतं. गेल्या पांच सहा दिवसांत दिसेल त्या माणसाला एकीकडे गाठून हीच बतावणी तो करीत होता. पण त्याला कोणी दाद दिली नव्हती. अखेर त्याचं नशीब उघडलं, आणि तूं भोळा सांब त्याला भेटलास. अरे खुशाल सारी कमाई त्याच्या स्वाधीन केलीस ! तुझ्या बेअकलीपणाला काय म्हणायचं !... " जिवाचा अगदीं तळतळाट होत असल्याप्रमाणें ती हातवारे करीत बोलत राहिली.

शेवटीं मीं म्हटलं, " मावशी, आतां तूं कितीहि चडफडलीस तरी त्याचा कांहीं उपयोग आहे कां ? "

ती म्हणाली ," पण तूं चडफडत नाहींस हें पाहून माझ्या जिवाचा जास्त संताप होतों. "

मीं तिला म्हटलं, " मी कां चडफडत नाहीं तुला सांगतों. तो पथिकबाबू बदमाश असेल, मला त्यानं बुडवलं असेल, हें सगळं खरं. त्यानं सरळ सरळ देवकीला विकून टाकली आणि पळ काढला हेंहि खरं. माझी सारी कमाई नाहींशी झाली हेंसुद्धां खरं. पण देवकी भलत्या कुठल्या संकटाच्या जागीं गेली असती ती तर गेली नाहीं ना ? तिला आपण वांचविली अन् आसरा दिला, एवढं तर आपण केलं ? जनावर काय किंवा माणूस काय मायेवर जगत असतं, चांगलं होत असतं. राजा घोडा कसा होता अन् कसा झाला हें तर

तूं प्रत्यक्ष पाहतेसच. मायेनं निगा राखली गेली कीं, कुरूपाला रूप येतं. बघ ही देवकी आपल्या हातीं आली आहे. आज वेडी वाकडी दिसते, पण आपण जर हिच्यावर माया केली तर तीच कशी होईल, बघशील तूं. मी फसलों याचं मला नाहीं वाईट वाटत. मायेनं ज्याला सुंदर रूप देतां येईल, असा एक अभागी जीव तुझ्या माझ्या आसऱ्याला आला असं मी समजतों. त्या बिचारीच्या आयुष्याची धूळधाण झाली असती ती टळली, या कल्पनेच्या समाधानांत मी बाकीच्या साऱ्या गोष्टी विसरून जातो. आणि तूंहि विसरून जा. पाथिकबाबू बदमाश आहे. त्यानं आपल्याला फसविलं, या गोष्टींबद्दल संताप मनांत ठेवून आतां कांहीं फायदा नाहीं आहे का, सांग ? देवकीला मोठ्या मायेनं वागविणं एवढंच आतां तुझं माझं काम..."

ती माझं बोलणं ऐकत राहिली आणि म्हणाली, "तूं म्हणतोस तें कांहीं खोटं नाहीं."

* * *

# २

ज्यानं सर्कशीचं अंतरंग कधीं पाहिलेलं नाहीं अशा माणसाला आमच्या त्या विचित्र जगाचं पाहिलं दर्शन भांबावून टाकणारं असतं. तीं जनावरं, तीं दहा ठिकाणांहून गोळा झालेलीं, दहा भाषा बोलणारीं, चित्रविचित्र माणसं, तो पसारा, ते नाना तऱ्हेचे उद्योग, धांवपळ, खाणींपिणीं, भांडणं, ते नानाप्रकारचे वास आणि दर्प—अशी ती चमत्कारिक दुनिया ज्यानं जन्मापासून पाहिली त्याला तिचं कांहीं वाटत नाहीं; पण तिच्याकडे नव्यानं पाहाणारं माणूस गोंधळून जातं. जिच्या आयुष्याचीं चौदा वर्षे पूर्व—बंगाल्यांतल्या एका लहानशा शांत गांवांत सुखासमाधानांत गेलीं होतीं, अशी देवकी आमच्या या चमत्कारिक दुनियेंत अकस्मात् येऊन पडली होती. आमच्या दुनियेशीं एकरूप होतांना तिच्या कोंवळ्या मनाचा वरचेवर गोंधळ उडावा हें अगदीं साहजिक होतं. ज्या वावटळींत सांपडून ती निराधार झाली होती त्या वावटळींतलें एकेक भयंकर प्रकार पाहिल्यामुळें तिचा जीव धास्तावून गेला होता, आणि जगांत कुठें प्रेम, शांतता, स्थिरता असेल असं तिला वाटेनासं झालं होतं. माणसाविषयींच्या भरंवशावर माणूस जगत असतं. देवकीच्या मनांतला हा भरंवसा

तडकून फुटून गेला होता. भांबावलेल्या शंकाकुल नजरेनं ती सगळ्यांकडे पहात होती. मावशीकडे आणि माझ्याकडेसुद्धां. आमचं प्रेम तिला दिसत होतं, पण त्या प्रेमाचा निस्वार्थीपणा तिला कळत नव्हता. आपला घात करणाऱ्या माणसांनींच भोंवतालचं जग भरलेलं आहे, अशा कल्पनेनं ती वागत होती. एकदां कड्याखालीं कोसळलेलं माणूस सुरक्षित जागीं चालतांनादेखील प्रत्येक पाऊल जपून, तोल संभाळून चालतं, त्याप्रमाणें ती वागत होती. तिच्या बोलण्याचालण्यांतला तो संशय व घाबरटपणा, विशेषतः तिची भांबावलेली नजर पाहिली, कीं माझ्या आणि मावशीच्या अंतःकरणाची कालवाकालव होत असे. देवकी जरा दूर असली कीं मावशीनं डोळ्यांत पाणी आणून मला म्हणावं, " ही सदा अशीच दुर्मुखलेली आणि कष्टी राहाणार काय ? हिच्या डोळ्यांतले आसूं कधीं संपणार ? तिच्या तोंडावर हंसूं कधीं दिसणार ? "

मी म्हणे, " मावशी, धीरानं घे. देवकी बोलूं हंसूं लागेल. आपलं प्रेम वायां जायचं नाहीं. मायेच्या गुणावर माझा फार विश्वास आहे. "

ती म्हणे, " माझाहि आहे. पण या पोरींकडे पाहिलं कीं तो डळमळतो. आईबापावांचून पोरक्या झालेल्या तुला नाहीं कां मीं संभाळलं अन् लहानाचं मोठं केलं ? पण तूं नेहमीं हंसायचास, खेळायचास. लोकांनीं आश्चर्य करायचं कीं हें पोरगं इतकं आनंदांत कसं. पण या देवकीची तऱ्हा पहावी तर—"

मीं म्हटलं, " मावशी, एक गोष्ट तूं विसरतेस. माझ्या आणि हिच्या पोरकेपणांत अंतर आहे. मी जवळ जवळ जन्मापासूनच पोरका झालों होतों. हिचं तसं नाहीं. हिनं चौदा वर्षं आईबापांच्या आणि भावंडांच्या संगतींत काढलीं होतीं. तें सुख भोगतां भोगतां अकस्मात् पोरकेपणा आलाय् तिला. तूं भिऊं नकोस. केव्हां ना केव्हां तरी आपल्या मायेचा आणि ज्या या चमत्कारिक दुनियेंत तो राहिली आहे तिचा भरंवसा तिला वाटूं लागेल, ती मोकळेपणानं बोलूं लागेल, हंसेल. आपण धीर धरला पाहिजे. "

देवकीची वृत्ति हलके हलके पालटेल हा माझा विश्वास दृढ होता. कुक् साहेबाच्या आजारी घोड्याची शुश्रूषा करून त्याचं रूप बदलून टाकीत असतांना ज्याप्रमाणें मीं त्याचा सूक्ष्म अभ्यास केला होता. तसाच देवकीचा मी

करीत होतों. आणि एक गोष्ट मला अधिक अनुकूल होती ती ही कीं त्या वेळेस मी एका मुक्या जनावरावर माया करीत होतों, पण या वेळेस चालत्या बोलत्या मुलीशीं माझा संबंध होता. देवकी अगदीं अबोल होती, तिचा तो अबोलपणा स्वभावसिद्ध होता कीं एका भयंकर संकटाचा तडाखा खाल्ल्यामुळें आला होता हें सांगतां येण्यासारखं नव्हतं. पण ती फार थोडं बोलत असे. सहसा तिच्या तोंडांतून शब्द बाहेर पडत नसत हें खरं. तथापि तिच्या चर्येवरून तिच्या मनाच्या प्रतिक्रिया ओळखतां येत असत, आणि एखाद्या वेळेस ती एखादा अर्थपूर्ण उद्‌गार काढीत असे. तिचं आजपर्यंतचं आयुष्य इतक्या निराळ्या परिस्थितींत गेलं होतं कीं सर्कशींतलं एखादं काम शिकण्यांत तिला गोडी वाटणं शक्यच नव्हतं. तथापि सकाळच्या प्रहरीं निरनिराळे खेळाडू आपापल्या कामांच्या तालमी करूं लागले कीं मी तिला मुद्दाम तिथें घेऊन जात असे. माझ्या कामाची तालीम मी करूं लागलों कीं दूर उभ्या राहिलेल्या देवकीकडे पाहून मी हंसून ओरडून विचारी, " हें शिकवूं का तुला ? " ती मान हालवी, आणि आपल्या कानाशिलांवरच्या दोन वेण्या पुढें ओढून घेऊन त्या गुंताविण्याचा चाळा करी.

मावशीनं मोठ्या प्रेमानं तिची निगा राखल्यामुळें ती आतां अगदीं पहिल्या दिवशीं दिसली तशी वेडीवांकडी तर दिसत नव्हतीच, उलट किती तरी आकर्षक दिसूं लागली होती. तिचा वर्ण काळाच होता, पण आतां हळुहळूं तो उजळूं लागला होता, आणि सुस्थितीचं तेज तिच्या अवयवांवर दिसूं लागलं होतं. मावशी म्हणे, " ती वयांत येऊं लागली आहे आतां असा गोलपणा आणि तजेला तिच्या अंगावर यायचाच. " हें ' वयांत येणं ' काय प्रकरण होतं तें मला कळत नसे. त्याबद्दल मीं मावशीला कधीं विचारलंहि नाहीं. पण एवढं खास कीं देवकी आतां किती तरी आकर्षक दिसूं लागली होती. तिच्या नाक-डोळ्यांना रेखीवपणा येत चालला होता. तिचा चेहरा सदा गंभीर असे, कुणाशीं कांहीं बोलायचं नाहीं असा निश्चय केल्याप्रमाणें तिचे ओंठ एकमेकांला बिलगलेले असत; पण तिच्याकडे निरखून पाहिलं कीं मला भास होई कीं तिच्या त्या चर्येंत, अन् विशेषतः डोळ्यांत, खोल कुठें तरी

हंसण्याची इच्छा आहे, आणि तिचं तें हंसणं जरी प्रगट होत नसलं तरी त्याची टवटवी तिच्या मुद्रेवर पसरलेली आहे. श्रीमंत लोकांच्या बंगल्यात कडी-पाटांत लपविलेले दिवे असतात की नाहीं, त्याची मला आठवण होत असे. माणसाला ते दिवे दिसत नाहींत पण त्याचा प्रकाश पडलेला असतो. तिच्या डोळ्यांत लपून राहिलेलं हंसू असंच होतं. मावशी तिला वरचेवर न्हाऊं घाली आणि दर वेळेस ती म्हणे या पोरीच्या केसांना दृष्ट लागेल. तिच्या त्या लांब सडक काळ्याभोर केसांचं मावशीनं किती कौतुक करावं. तिनं त्यांच्या नाना-तऱ्हेच्या वेण्या घालाव्या, त्यावर फुलं माळावी. स्वतःच्या केसाचं सौंदर्य देव-कीला विशेष समजत नव्हतं, पण केसाशीं चाळा करण्याची तिला फार संवय होती. म्हणून " शिकवूं का तुला ? " असं मीं ओरडून विचारलं कीं ती मान हालवी आणि आपल्या दोन वेण्या ओढून घेऊन त्यांची गांठ मारण्याचा चाळा करी...

एके दिवशी सकाळच्या तालमीच्या वेळेस तिला आधीं न विचारतां इतकंच नव्हे तर कल्पनासुद्धा येऊं न देतां रंगणांत शिरून फेऱ्या घालूं लागलेला राजा जेव्हां तिच्या जवळ आला तेव्हां राजाच्या पाठीवरून मी एकदम खालीं वांकलों, आणि तिला अलगद उचलून घेतली व माझ्या पुढें बसविली. तिनं भ्याल्याप्रमाणें नाजुकशी किंकाळी फोडली. पण आपण अगदीं सुखरूप राजाच्या पाठीवर बसलों आहोंत हें जेव्हां तिच्या लक्षांत आलं, आणि राजाच्या गतीबरोबर तिच्या शरीराला गमतीचे हेलकावे जेव्हां मिळूं लागले तेव्हां भीतीनं नव्हे तर त्या अकल्पित गोड अनुभवाच्या आश्चर्यानं तिनं आपला डावा पंजा तोंडावर ठेवला, मान वळवून माझ्याकडे बघितलं, आणि दुसऱ्याच क्षणीं ती अशी कांहीं हंसत सुटली की जणूं तिला तें अनावर झालं होतं. तिचं तें हंसणं ऐकतांच मला वाटलं घोड्यावरून उडी टाकावी, मावशीला ओढून तंबूंत आणावी, आणि तिला म्हणावं, " बघ, बघ, देवकीचं हें हंसू बघ... "

साऱ्या देशाची प्रदक्षिणा केल्याप्रमाणें आमची सर्कस हिंडायची खरी, पण केव्हां कोणत्या दिशेनं जायचं त्याचा एक क्रम दौलतराव काकांनी ठरवून ठेवला होता. त्या क्रमांत सहसा बदल होत नसे. पूर्वी एखादे वेळेस असं

होई कीं एखाद्या मोठ्या संस्थानांत राज्यारोहण म्हणा, लग्न म्हणा असा एखादा उत्सवी समारंभ निघे; मालकांचे आणि दौलतराव काकांचे बहुतेक मोठाल्या संस्थानिकांशीं आपलेपणाचे संबंध असल्यामुळें सर्कशीला आमंत्रण येत असे व मग आम्हीं पुढं गेलों असलों तरी मागं परतून किंवा दूर मागं असलों तरी एकदम पल्ला गांठून संस्थानिकांच्या निमत्रणाचा फायदा घेत असूं पण आतां स्वातंत्र्य आलं होतं. सकाळची पहिली घटका जवळ आली कीं आभाळांतल्या चांदण्या एकामागून एक मावळाव्या तद्वत संस्थानं मावळत होतीं. आमच्या सर्कशीच्या ठरलेल्या वाटेपासून आम्हांला ढळायला लावणारीं निमित्तं उरलीं नव्हती. दौलतराव काका स्नेह्यासोबत्यांशीं गप्पागोष्टी करतां करतां थट्टेनं म्हणत ते मीं एकदां ऐकलं होतं, " आतां आमच्या सर्कशीची गति वाऱ्यासारखी. क्रमिक भूगोलात आपण वाचतों ना, अमक्या ऋतूंत अमके वारे अमक्या दिशेनं वाहायचे तसंच आमचं परिभ्रमण ठरीव दिशेकडे चालायचं. त्यांत बदल नाहीं व्हायचा. संस्थानिक गेले ना ! " काकांचं हें बोलणं सहज आठवलं म्हणून सांगितलं.

कलकत्त्याच्या मुक्कामानंतर आम्ही निघालों कीं नेहमीं पूर्वेकडे जात असूं. पटणा, दर्भंगा असे मोठमोठे मुक्काम करायचे, मग लखनौ बरेली, रामपूर या मार्गानं दिल्ली गांठायची, आणि मग तेथून पूर्वेच्या सरहद्दीकडे हळुहळूं चाल करायची हा क्रम ठरलेला असे. या ठरलेल्या क्रमाप्रमाणें आमचे मुक्काम होत गेले. पूर्वी नेहमी दर्भंग्याचे महाराज सर्कशीला खूप दिवस ठेवून घ्यायचे. राजधानीच्या शहरीं आमचा मुक्काम असे तोंपर्यंत आमची सारी सरबराई महाराजांचे खास पाहुणे म्हणून व्हायची. सर्कशीचे सार्वजनिक खेळ तर तीन आठवडे चालायचेच, पण मग शिवाय खास महाराजांच्यासाठीं मुक्काम व्हायचा अन् खाशा स्वाऱ्यांसाठीं खेळ व्हायचे. पण आतां हा जुना जमाना राहिला नव्हता. त्यामुळें पटण्यानंतर दर्भंग्याचा आमचा मुक्काम फारसा लांबला नाहीं. आम्हीं लखनौला येऊन खेळ करूं लागलों.

इथें आल्यावर एके दिवशीं दौलतराव काकांनीं मला मुद्दाम बोलावून

घेतलं आणि ज्याची मला कल्पनाहि नव्हती असा विषय माझ्याजवळ काढला. ते मला म्हणाले, “ गोपाल, देवकीचं काय करायचं ? ”

काय करायचं ? म्हणजे काय ?—मला त्यांच्या त्या विचारण्याचा अर्थच कळेना. माझ्या त्या गप्प राहण्याचं कारण काकांना ओळखतां आलं असावं. कारण ते म्हणाले, “ मी तुला असं विचारतों आहे याचं कारण एक थोडीशी चमत्कारिक हकीगत घडली आहे; ती तुला सांगायला हवी. ”

ते बोलूं लागले. मी ऐकत राहिलों.

देवकीनं सर्कसमध्यें राहावं ही गोष्ट आमच्या मालकांना पसंत नव्हती. त्यांचा विचार असा कीं किती झालं तरी एका सुखवस्तु खानदान घरांतली ती मुलगी. तिच्यावर संस्कार फार निराळे झालेले. ती दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडली नसती तर तिचं आयुष्य कशा प्रकारचं झालं असतं तें आपण लक्षांत घ्यायला हवं. ती शाळेंत गेली असती, कॉलेजांत गेली असती, शिकली सवरली असती; सामाजिक दर्जानं तिच्या बरोबरीच्या एखाद्या मुलाशीं बापानं तिचं लग्न लावून दिलं असतं. कदाचित् तिचा तिनंच आपला नवरा निवडला असता तिचा खराच प्रतिपाळ आपल्याला करायचा असेल तर त्या प्रकारचंच वळण तिच्या आयुष्याला लागेल अशी व्यवस्था आपण करायला हवी. नुसतं तिला जेवूं खाऊं घातलं, कपडेलत्ते दिले, तिच्यावर ममता केली म्हणजे झालं असं नाही. यापुढें ती अशीच सर्कशींत वाढावी हें कांहीं बरं नाहीं. मालकांचा हा विचार काकानाहि पटला होता. आणि त्यांच्या एका मित्रानं बनारस येथें चालविलेल्या ‘महिलाश्रमात’ देवकीला ठेवावं असा बेत त्यांनीं केला होता...

ही हकीगत ऐकून मला फार आश्चर्य वाटलं. मालक आणि काका देवकीबद्दल कांही बेत करत असतील अशी मला किंचित्‌देखील कल्पना नव्हती. इतकंच नव्हे तर खरं सांगायचं म्हणजे असले बेत करण्याचा अधिकार माझ्याखेरीज दुसऱ्या कुणाला आहे असं मला कधीं वाटलं नव्हतं. मी आणखी मावशी तिचं संगोपन करत होतों. तिची जबाबदारी आम्हीं पहिल्यापासून पत्करली होती. देवकीविषयींची जबाबदारी दुसऱ्या कुणी उचलावी असं माझ्या मनांत कधीं आलं नव्हतं. तिच्या पुढच्या आयुष्याबद्दलचे विचार दुसरे कुणी करीत

असतील असं मला कधीं वाटलं नव्हतं. त्यामुळें काकांचं बोलणं ऐकून मी चकित झालों. मला थोडासा रागसुद्धां आला. मनांत आलं, मालक आणि काका कोण देवकीची व्यवस्था लावणारे? पण हा विचार मीं लगेच गिळून टाकला. कारण मालकांना आणखी काकांना मी फार मानीत होतों. त्याच्यावर माझी फार भक्ति होती. मात्र मनांतली रागाची उसळी मीं दाबली तरी आश्चर्याची उसळी राहिलीच. वाटलं, हें काय ऐकतोय मी?

आणि आश्चर्यापेक्षांहि मला वाईट जास्त वाटलं. बनारसच्या 'महिलाश्रमांत' देवकी जाणार, नव्हे गेलीच असं वाटून तिच्या आणि माझ्या ताटातुटीचं दुःख मनांत एकदम भरून आलं. देवकी मला किती हवीशी वाटते याचा विचार मेल्या दोन वर्षांत मीं कधी मुद्दाम म्हणून केला नव्हता. पण आतां ती माझ्यापासून फार दूर–आणि कायमची !– जाणार या कल्पनेचं दुःख जेव्हां एकदम बोचलं तेव्हां ती मला किती हवीशी वाटत होती तेहि मला कळलं...

पण रागाप्रमाणेंच मी आश्चर्यही गिळलं, दुःखहि गिळून टाकलं... काका बोलतां बोलतां थोडे थांबले होते, म्हणून मीं म्हटलं, "ठीक आहे. मग पाठवा ना तिला बनारसला! मला काय विचारतां?" माझ्या त्या बोलण्यांत जरासा कडवटपणा होता, आणि ते शब्द तोंडांतून गेल्यानंतर मला वाटलं आपण असं बोलायला नको होतं!

पण माझ्या बोलण्यांतला कडवटपणा काकांना कळला नाहीं असं दिसलं. कदाचित् कळला असूनहि त्यांनीं तो मनावर घेतला नसेल. ते फार प्रेमळ मनाचे होते. माझ्यावर त्यांची विशेष मर्जी आणि ममता होती. ते म्हणाले, "देवकीला आम्ही पाठविणारच होतों. सारी व्यवस्था करून ठेवली आहे. पण —"

मीं म्हटलं "पण काय?"

काका म्हणाले, "'बनारसला जाऊन 'महिलाश्रमांत' राहणं देवकीला आवडेल कीं नाहीं हें पहायला पाहिजे असं आम्हांला वाटलं. आम्ही तिला बोलावून घेतली. तिची काय व्यवस्था करायचं ठरवलं होतं तें तिला सांगितलं अन् विचारलं, तूं जाशील ना? हो, नाहीं, असं काहींच उत्तर ती चटकन् देईना.

आम्ही तिला म्हटलं, अग बोल कीं, सांग. मग तिनं जें उत्तर दिलं तें फार चमत्कारिक होतं. ती म्हणाली, "गोपालला विचारा. त्यानं मला सोडविलं, मला सोडविण्यासाठीं त्यानं आपली सारी कमाई खुशाल देऊन टाकली. एक प्रकारें मी त्याची विकत घेतलेली 'गुलाम' आहे. तो माझा 'धनी' आहे. माझ्यावर त्याची मालकी आहे. त्यानं मला जा म्हटलं, मी जाईन. इथेंच रहा म्हटलं, राहीन. तो माझा धनी आहे!" तिनं असं उत्तर दिल्यामुळें हिला बनारसला धाडायची कीं नाहीं या गोष्टीचा निर्णय आमच्या हातीं राहिला नाहीं. तो निर्णय तूं केला पाहिजेस. म्हणून तुला मीं बोलावून घेतलं आहे. मालकांना, आम्हाला दोघानाहि असं वाटतं, कीं देवकीला बनारसला पाठवण्यांत तिचं कल्याण आहे! पण आमच्या वाटण्याचा जुलूम आम्हांला करायचा नाहीं. या प्रश्नाचा निकाल तूं लावावास हें बरं. तूं सांगशील तें आम्हीं करूं. सांग, देवकीचं काय करायचं?"

मी त्यांच्याकडे क्षणभर पहात पहात राहिलों, पण मग नजर खालीं वळविली. माझ्या मनातले विचार माझ्या चर्येत प्रगट होतील अन् काकांना समजतील असं मला वाटलं ते त्यांना समजावेत अशी माझी इच्छा नव्हती. कां कुणास ठाऊक, त्या विचारांची मला थोडीशी लाज वाटत होती. थोड्या वेळापूर्वीं देवकीची आणि माझी ताटातूट होणार या कल्पनेच्या दुःखामुळें ती मला किती हवीशी वाटत होती तें मला एकदम कळलं होतं. आणि मालकांना व काकांना जें उत्तर देवकीनं दिलं होतं, ते आतां मला कळल्या-मुळें माझ्या विषयीं तिला काय वाटत होतं तेंही मला समजलं होतं. तिनं मला धनी म्हणावं, स्वतःला विकत घेतलेली गुलाम समजावं हें मला अगदीं आवडलं नाहीं.पण मी स्वतः तिला दूर केल्याखेरीज ती माझ्यापासून दूर जायला तयार नव्हती, या गोष्टीचा मला आनंद झाला तिची माझी ताटातूट होणार याचं जें भय मला वाटलं होतं तें एकदम गेलं. मी तिचा धनी आहे अशा वेड्या कल्पनेनं कां होईना, पण मीं सांगितल्यावांचून दूर जायला ती तयार नव्हती, मी म्हणेन तर इथेंच रहायची तिची इच्छा होती, ह्या विचारानं मला समाधान झालं. मला ती हवीशी वाटत होती, तिच्या सहवा-

सांत मला सुख होत होतं, ही गोष्ट मला आजपर्यंत कळली नव्हती. म्हणजे असं कीं, तिच्या सहवासाचं सुख मी घेत होतों, पण त्या सुखाचा विचार मीं कधीं केला नव्हता. काकांनीं मला आज बोलावलं नसतं अन् हा विषय काढला नसता, तर कदाचित् मीं त्याचा विचार आणखीहि कित्येक दिवस केला नसता पण त्यांच्या बोलण्यामुळें देवकी दूर गेली तर मला किती दुःख होईल त्याची जाणीव मला एकाएकीं झाली आणि त्या दुःखामागं देवकी जवळ असावी याबद्दलची माझ्या मनाची ओढ होती हेंहि मला कळलं. तिचा सहवास मला हवासा वाटत होता. तिला माझा सहवास असा हवासा वाटत होता कीं नाहीं तें मला कळलं नाहीं, पण काकांना आणि मालकांना तिनं जें उत्तर दिलं होतं त्यावरून मी म्हणेन तर ती इथेंच रहायला तयार होती एवढं तरी उघड होतं. आणि एवढं सध्यां मला पुरेसं होतं. तिच्या विषयीं माझ्या मनांत जी भावना तयार झाली असल्याचं आतांच माझ्या लक्षांत आलं होतं, तसली भावना तिच्याहि मनांत असेल अगर नसेल. पण निदान ती कंटाळली नव्हती, मला सोडून निघून जायला उत्सुक नव्हती. मला आशेला जागा होती तिचं बनारसला जाणं घडूं नये, असं मीं म्हटलं तर तें कांहीं अगदींच तिच्या मनाविरुद्ध होणार नव्हतं. तिला नाराज न करतां तिला ठेवून घेणं मला शक्य होतं...मालकांच्या आणि काकांच्या विचाराविरुद्ध जाणं माझ्या जिवावर आलं होतं. जन्मांत प्रथमच ही गोष्ट मी करणार होतों. पण मीं ती केली नाहीं आणि त्यांना त्यांच्या इच्छेप्रमाणें वागूं दिलं तर मी देवकीला गमावून बसणार होतों. तें होऊं द्यायचं नसेल तर मालकांची आणि काकांची मर्जी बाजूला ठेवण्याचा कणखरपणा करायलाच हवा होता...

मीं नजर वर करून काकांच्याकडे पाहिलं. बोलायसाठीं म्हणून तोंडसुद्धां उघडलं. परंतु त्याच क्षणीं मला एकदम अशी कांहीं शरम वाटली, कीं माझे शब्दहि तोंडांत राहिले, आणि नजरहि खालीं वळली. माझ्या मनांत आलं, 'देवकीला धाडूं नका, इथेंच राहूं द्या,' असं मीं काकांना सांगितलं तर मी तसं कां सांगतों हें त्यांना सहज ओळखतां येणार नाहीं कां ? देवकीला पाठ-वायची कीं नाहीं याबद्दलचा निर्णय त्यांनीं माझ्यावर सोंपविला होता हें खरं;

पण तिला पाठवूं नका असं मी म्हणेन अशी त्यांची अपेक्षा खचित नसेल ! मीं तसं म्हटलं तर त्यांना तें चमत्कारिक वाटणार नाहीं ? माझ्या मनांतला हेतु त्यांना कळणार नाहीं ? त्याचं त्यांना आश्चर्य वाटणार नाहीं ? मला ते हंसणार नाहींत ? मी जर काकांना म्हणालों, कीं देवकीला इथेंच राहूं द्या तर ते कदाचित विचारतील, कशाला ? तसं विचारलं तर मी काय सांगेन ? आणि जें सांगेन तें ऐकल्यावर ते मला काय म्हणतील ?...हें सारं मनांत येऊन मला इतकी लज्जा वाटली, की मी एकदम गप्प तर झालोंच, पण मनांत असं देखील टालं कीं तुमच्या इच्छेच्या बाहेर मी नाहीं, असं काकांना म्हणावं, आणि काकांच्या पुढून पळ काढावा. पण देवकीविषयींची जी भावना माझ्या अंतःकरणात निर्माण झाली होती ती मोठी चमत्कारिक असली पाहिजे. माणसाला तिची लाज वाटते हेंहि खरं; अन् ती माणसाला निर्लज्ज बनविते हेंहि खरं.शरमेची अशी भरती ओहोटी असूं शकते ही गोष्ट पूर्वी कुणी जर मला सांगितली असती, तर मला खरी देखील वाटली नसती. पण मी ती आतां प्रत्यक्षच अनुभवीत होतों. देवकीबद्दलचे मनांतले विचार काकांना कळतील याबद्दलच्या लज्जेनं जसं क्षणभर मन भारावून गेलं, त्याप्रमाणें देवकीची ताटातूट होऊं नये या साठीं स्पष्ट बोलावं लागलं आणि काकांनीं मला पागल ठरविलं तरी हरकत नाहीं, असंहि मला लगेच वाटलं...कुठला धीटपणा माझ्या अंगीं आला कुणास ठाऊक ? खालीं घातलेली मान मीं वर केली आणि म्हटलं, “ काका, देवकीला बनारसला पाठविण मला पसंत नाहीं. राहूं द्या तिला इथेंच. निदान आणखी कांहीं दिवस. पुढें कदाचित्—” ‘ कदाचित् ’ काय तें मला कळेनाहि आणि सांगतां तर मुळींच येईना. “ तुम्ही आणि मालक माझ्यावर रागावाल, पण——”

काका म्हणाले, “ रागावण्याचा काय संबंध आहे ? वेडा कुठला. देवकी तुला आपला धनी मानते तेव्हां तूं जें ठरवशील ”

मीं त्यांचं पुढचं बोलणं धड ऐकलं नाहीं. धनी ! धनी ! तो शब्द मला ऐकवेनासा झाला होता. मी परत आपल्या राहुटीवर आलों, अन् विचार करूं लागलों ‘ धनी ’ हें काय प्रकरण आहे ? देवकीची आणि माझी ताटातूट

होणार होती ती टळली याबद्दल मला समाधान वाटत होतं. पण या 'धनी' शब्दानं त्या समाधानाची सारी चव नाहींशी करून टाकली होती देवकीकडून मला गुलामाची चाकरी हवी होती ? विकत घेतलेली गुलाम या नात्यानं ती मला हवी होती ? तिनं मला आपला धनी समजावं यांत मला आनंद होता ? मला तिच्यापासून काय हवं होतं त्याचा मीं आजपर्यंत कधीं विचार केला नव्हता. तिला हंसती बोलती करावी एवढया एकाच हेतूनं मी वागत होतों ती कधीं आनंदानं बोलली आणि हंसली कीं स्वतःला कृतकृत्य समजत होतों. तिचा उल्हास वाढावा म्हणून आणखी आणखी प्रयत्न करीत होतों त्या गोष्टी करीत असतांना तिच्याकडे एक अल्पवयी अजाण मुलगी या दृष्टीनं पाहाण्या-ऐवजीं कांहीं निराळ्या दृष्टीनं मी पाहूं लागल्याचं माझ्या लक्षांत आलं नव्हतं पण आज तें अकस्मात् आलं होतं. मला देवकी हवीशी वाटत होती म्हणजे काय हवंसं वाटत होतं त्याचा मला एकाएकीं बोध झाला होता आणि तो झाल्यामुळेंच 'धनी' हा शब्द मला नकोसा वाटत होता. कदाचित् पाच सहा महिन्यापूर्वीं या शब्दाचा उच्चार मीं ऐकला असता तर मला तो इतका कर्ण-कटु वाटला नसता. मीं विकत घेतलेल्या गुलामाप्रमाणें देवकीनं स्वतःला मानावं हें कदाचित मला योग्य वाटलं असतं.पण माझं मन आतां पालटलं होतं. देवकी-पासून फक्त एखाद्या गुलामाचं इमान मला नको होतं. नुसती निष्ठा नको होती. तिच्याविषयीं मला जें वाटत होतं त्याला तिच्या अंत करणांतून जबाब मिळाला तर तो मला हवा होता !... धनी ! धनी ! ... तो शब्द देवकीच्या मनांतून नाहींसा केला पाहिजे असं मनाशीं पुनःपुन्हां म्हणत मी कॉटवर पडून राहिलों.

लखनौचा मुक्काम आटपल्यावर आम्ही कानपूरला गेलों, तिथून बरेलीला गेलों, आणि तिथें सप्टेंबर महिन्यांतले शेवटचे दिवस काढून छोट्या छोट्या गांवीं मुक्काम टाकीत, आग्रा-दिल्लीच्या वाटेनं आमचा प्रवास सुरू झाला निसर्ग शोभेचं आणि शांत वातावरणाचं आमच्या दौलतराव काकांना फार वेड होतं. धंद्यांत नुकसान न येतां एखाद्या छोट्या गांवीं चार आठ दिवसांचा मुक्काम मोठ्या शहराकडे जातां जातां वाटेंत करतां आला तर ते मुद्दाम करीत. अशा

छोट्या मुक्कामांसाठीं त्यांनीं कित्येक गांवं पसंत केलेलीं होतीं. बरेलीपासून पश्चिमेकडे सुमारें साठ सत्तर मैलांवर असलेलं चंदनगढ हें गांव यापैकींच होतं. मीं स्वतः अलिगढ पाहिलेलं नव्हतं, पण आमच्या सर्कशींतलीं पुष्कळ मंडळी सांगत कीं हीं दोन गांवं फार सारखीं आहेत. असतीलहि. मोंगल बादशहाच्या वेळेस हें गांव म्हणजे एक महत्त्वाचं लष्करी ठाणं होतं, जुन्या तटबंदीच्या आंतलं जुनं गांव कांहींसं बकाली आणि गलिच्छ होतं, पण मशिदींचे उंच उंच मनोरे, देवळांचे कळस, दोन मोठाल्या सार्वजनिक पुष्करिणी, छोटं सार्वजनिक उद्यान, बाजार पेठेंतला खूप मोठा फवारा, अशा गोष्टींनीं गांव शोभिवंत दिसत असे. तटबंदीच्या बाहेर गांवाचा विस्तार आतां झाला होता तो नव्या पद्धतीचा होता. इथें तांबड्या बंगलोरी कौलारांचे बंगले होते, रुंद गुळगुळीत रस्ते होते, शाळांच्या इमारती होत्या, दफ्तर होतं, विजेचे दिवे होते. आमच्या सर्कसचा तंबू तटबंदीबाहेरच्या एका मोठ्या बखळींत होता. त्यामुळें बाहेर दोन घटका भटकायला जायचं झालं तर जुन्या गावांतहि जातां येत असे. नव्या वस्तींतल्या प्रशस्त डांबरी रस्त्यानं हिंडण्यापेक्षां जुन्या गांवांतल्या अरुंद उंच सखल बोळांतून रेंगाळण्याची मला अधिक हौस वाटत असे गांवचा सराफ कट्टा सदा गजबजलेला असे. चंदनगढचे दागिने फार पूर्वीपासून प्रसिद्ध होते. आजूबाजूच्या टापूंतल्या जमीनदारांच्या बायकांना इथें घडविलेल्या दागिन्यांचा फार हव्यास होता. किनखापी गोंडेबाज पडद्यांनीं झांकलेल्या त्यांच्या मोटमोठ्या घोडागाड्या दुकानादुकानापुढे नेहमी उभ्या राहिलेल्या असत. आठवड्याच्या बाजाराच्या दिवशीं खेडुत बायकांची तर या रस्त्याला खूपच गर्दी उसळे, आणि त्यांच्या कलकलाटानं पेठ गजबजून जाई. सराफकट्टयावर दुतर्फाच्या इमारतींत खालच्या मजल्यावर दुकानं होतीं. वरच्या माडींत दुकानदारांची वस्ती होती. सराफीचा धंदा करणारे बहुतेक मारवाडी असल्यानं दुतर्फाच्या त्या माड्या त्यांच्या राहणीची आणि चालीरीतीची साक्ष देत असत. तोंडावरून घुंगट ओढून घेतलेल्या बायका माड्यांच्या सज्जांत उभ्या असत. रंगीबेरंगी साड्या वाळत घातलेल्या दिसत, वाशेळ्या तुपांत चाललेल्या तळणाचा खाट हवेंत पसरलेला असे, कधीं कधी पुष्कळशा बायकांनीं एकत्र जमून म्हट-

लेल्या गाण्यांचे स्वर बाहेर ऐकूं येत. ते हेल ऐकून रस्त्यानं जाणाऱ्या एका गांवकऱ्याला मीं एकदां विचारलं, " वरच्या घरांत कुणी मेलंय् काय ? " एखाद्या घरांत मृत्यू झाला कीं नातलग बायांनीं आणि शेजारणी पाजारणींनीं जमून ऊर बडवून गाणी म्हणायची चाल या लोकांत असल्याचं मीं ऐकलं होतं. पण मीं ज्याला प्रश्न केला होता तो रागावून मला म्हणाला, " असं भलतं सलतं काय बोलतां हो ? या नगरशेटला पांचव्या बायकोपासून नवसासायासानं मुलगा झाला आहे, म्हणून बायका जमल्या आहेत अन् गाणीं म्हणताहेत ! " मीं त्या इसमाची क्षमा मागितली अन् दूर झालों. बायकांच्या गाण्याचे हेल मला अजूनहि ऐकूं येत होते, आणि कुणी मेल्याबद्दल नव्हे तर पुत्रोत्सवाच्या आनंदाबद्दल त्या बायका गात आहेत हें मला अजूनहि पटत नव्हतं. मी मनाशीं हसलों आणि पुढें चालूं लागलों...

दुसऱ्या दिवशीं मीं देवकीला म्हटलं, " चल, जरा बाहेर जाऊन येऊं. "

तिनं विचारलं, " कुठें ? "

" तुला गांव पाहायचं नाहीं का ? "

" बघण्यासारखं आहे ? "

" हं. मावशी, तूं पण चल. "

यशोदा मावशी म्हणाली, " मी येत नाहीं. मला जरा बरं नाहीं. तुम्ही दोघ जाऊन या. "

मी देवकीला घेऊन बाहेर पडलों.

तटाच्या अलीकडे कोपऱ्यावर तीन चार टांगे उभे होते. आम्हांला दोघांना पाहतांच एका टांगेवाल्यानं खाली उडी मारली आणि सलाम करून मागच्या बाजूच्या मळकट गादीवर थाप मारून तो उभा राहिला. देवकीला मीं म्हटलं, " बैस. " तिनं मान हालविली व ती म्हणाली, " चालतच जाऊ. मला जास्त मजा वाटेल. " मग आम्ही चालत निघालों. मला ज्या इमारतींचीं नांवं माहीत झालीं होतीं त्या मी तिला दाखवीत होतों. क्वचित् ती मला विचारी, " हें काय ? " आणि मला म्हणावं लागे, " मला माहीत नाहीं. आपण कुणाला तरी विचारूं. " कांहीं दुकानांवर इंग्रजी पाट्या होत्या. त्या मला

वाचतां येत नसत, पण ती वाचीत असे आणि मला सांगत असे. एका दुकानावरची मोठी आडवी पाटी वाचून ती म्हणाली, " इथें सोपी इंग्रजी गोष्टींचीं पुस्तकं कदाचित् मिळतील, मिळालीं तर घेऊं या ? " मीं हंसून तिच्याकडे पाहिलं अन् तिच्या डाव्या कोपरापाशीं धरून तिला त्या दुकानाकडे नेली. दुकानांतलीं तीं पुस्तकं पाहून देवकीची चर्या आनंदानं एकदम फुलून गेली ती एक एक पुस्तक घेई थोडसं पाही, मग दुसरं उचलून घेई. मधेंच ती मला म्हणाली, " मधुबानीच्या शाळेत केवढी तरी लायब्ररी होती, आणखी आमच्या बाई किती गमतीदार पुस्तकं आम्हांला वाचायला देत..." हें मला सांगतांना शाळेंतल्या दिवसांच्या आठवणीनं डोळ्यांत उभीं राहिलेलीं आंसवं तिला आवरलीं नाहींत. तिनं एक उसासा टाकला, आणि मान वळवून ती पुन्हां पुस्तकांशीं चाळा करूं लागली...

माझ्या मनांत आलं, किती निराळ्या जगांतून ही आलेली आहे ! त्या जगाच्या आठवणी हिला कितीदां होत असतील ! आणि त्या बुझाव्या म्हणून तिला केवढा प्रयत्न करावा लागत असेल ! त्या आठवणी काढून ती एकटेपणीं कितीदां रडत असेल ! त्या हरपलेल्या जगाचा शोक करतांना हिच्या डोळ्यांतून झरलेल्या अश्रूंनीं हिनं उशी कितीदां भिजाविली असेल ? देवकीच्या सहवासाच्या आनंदांत मी इतका रमून गेलों होतों कीं आमच्याकडे येण्यापूर्वी ती फार निराळ्या जगांत होती, आणि तें जग नाहींसं झाल्याबद्दलच्या दुःखानं होणारा दाह तिनं कितीहि लपविला तरी तो तिच्या अंतःकरणांत खोल कुठें तरी होताच, याची शुद्ध मला राहिली नव्हती. पण दुकानांतलीं पुस्तकं पाहतां पाहतां तिनं आपल्या शाळेबद्दलचा जो उद्‌गार सहज काढला तो ऐकतांच तिच्या मनांतली एक खोल जागा मला दिसल्याप्रमाणें झालं. वाटलं, किती वेगळ्या जगांतून ही आलेली आहे !...आणि मग एकदम माझ्या मनांत आलं, माझ्या प्रेमाला हिच्या अंतःकरणांतून जबाब मिळावा ही माझी आशा आणि ही धडपड किती वेडेपणाची ? मालक आणि काका हिला बनारसला पोंचवीत होते तें बरोबर होतं. हिचं आणि माझं जग दोन्ही अगदीं वेगळीं वेगळीं आहेत...

पण माणून एकदां प्रेमांत गुंतलं कीं त्याच्या ठिकाणीं एक चमत्कारिक हट्टी-पणा उत्पन्न होतो. मनांत येऊं पाहाणारे पश्चात्तापाचे आणि निराशेचे कडू विचार मनांत राहूं द्यायला मी तयार नव्हतों गेल्या सात आठ महिन्यांत माझ्या मनांतलं प्रेम मीं जरी देवकीजवळ कधीं बोलून दाखविलं नव्हतं तरी तें लपविण्याची खटपटहि केली नव्हती. आणि देवकीच्या बोलण्याचालण्यांत ज्या भावनेच्या खुणा मी शोधीत होतों त्या जरी मला आढळल्या नव्हत्या. तरी माझ्या वागण्याविषयी नापसंती तिनं कधीं दाखविली नव्हती. त्यामुळें मी मनाशीं नेहमीं म्हणे, आज ना उद्यां मला हवा तसला माझ्या विषयींचा जिव्हाळा देवकीला मी वाटायला लावीन मला घाई नव्हती तिचं मन मला दुखवायचं नव्हतं मनांत आशा ठेवून वाटेल तेवढी वाट पाहायला मी तयार होतों...त्यामुळें तिच्या माझ्या जगांतला निराळेपणा व तिच्या अंतःकरणांत लपलेलं दुःख पुस्तकं चाळतां चाळतां तिनं काढलेल्या त्या उद्‌गारांवरून जरी तीव्रतेनं माझ्या लक्षांत आलं, तरी प्रेमांत सांपडलेलं माझं मन मागं सरकलं नाहीं. तें हट्टानं म्हणालं, असेल तिचं जग निराळं. निराळ्या जगांतलीं माणसं प्रेमानं एकत्र बांधलीं गेलीं कीं त्यांचं जग एकच होत नाहीं का ? ज्या जगाला ती पारखी झाली त्याबद्दल ती अंतर्यामीं दुःख करीतहि असेल; पण मी माझ्या प्रेमानं तिचं तें दुःख विसरायला लावणार नाहीं काय ? प्रेमांत एवढी शक्ति नाहीं ? खचित आहे !...

तिनं एक पुस्तक माझ्यापुढें धरलं आणि म्हटलं, “ हें किती छान आहे पाहिलंत का ? मीं हें अर्धं वाचलं होतं. बाकीचं वाचायचं तसंच राहिलंय. गलिव्हर नांवाचा एक मनुष्य होता. तो फिरतां फिरतां अशा एका देशांत गेला म्हणे कीं तिथले रहिवासी आंगठ्या एवढाले होते. फार गमतीची गोष्ट आहे ही. हें चित्र पहा ना. त्या आंगठ्याएवढाल्या माणसांनीं गलिव्हरला दोर-खंडांनीं बांधून टाकलं आहे, आणि त्याच्या अंगावर शिड्या लावून ते चढता-हेत ! छान आहे कीं नाहीं ? ”

मीं म्हटलं, “ आपण विकत घेऊं या तुझ्यासाठीं. ”

" खरं ? " असा उद्‌गार काढतांना आनंद आणि अविश्वास यांचं किती सुंदर मिश्रण तिच्या डोळ्यात दिसलं.

मी म्हणालों, " हें एकच काय, तुला आवडतील तेवढीं सारीं पुस्तकं घेऊं आपण. " खिशांतल्या नोटा मीं बाहेर काढल्या आणि तिला म्हटलं, " पाहिलंस ? "

आम्ही दुकानातून बाहेर पडलें तेव्हां ती विलक्षण आनंदांत होती. मीं तिला म्हटल, " ती पुस्तकं माझ्या हातांत दे. तुला जड नाहीं का होत ? दे इकडे. " ती म्हणाली, " नको " मीं तिचा दंड धरला. ती माझ्या जोडीनं पावलं टाकूं लागली. आतां ती आजूबाजूच्या दुकानावरल्या पाट्यांकडे बघत नव्हती पुनःपुन्हां हातातल्या पुस्तकाकडे पहात होती, व माझ्याकडे मान करून हंसत होती. कांहीं वेळानं ती म्हणाली, " आता परत जाऊं या ना. "

मीं म्हटलं, " इतक्यांत ? "

" मग आतां कुठें जायचं ? "

" सराफ कट्ट्यावर. "

" कशाला ? "

" तुझ्या आवडीच्या वस्तू तूं घेतल्यास. माझ्या आवडीच्या अजून घ्यायच्या राहिल्या आहेत. "

" काय घेणार आहांत स्वतःसाठीं ? "

" माझ्यासाटीं नाहीं. तुझ्यासाठीं. "

" माझ्यासाटी ? "

" हं. " मीं पुन्हां खिशांतल्या नोटा दाखविल्या आणि म्हटलं, " हें पाहिलंस का ? "

ती म्हणाली, " नको, नको. उगीच पैसे उधळूं देणार नाहीं मीं तुम्हांला."

मीं म्हटलं, " ते पैसे तुझ्यासाठींच आहेत ! "

तिचा चेहरा एकदम गोरामोरा झाला आणि तिनं मान हालविली. पण मीं तिचा दंड अधिकच घट्ट धरला आणि पुढें चालूं लागलों.

एका दुकानांत शिरून मीं म्हटलं, " केंसांत घालायची सुंदर सोन्याची फुलं आहेत ना तुमच्याकडे ? "

दुकानदारानं गादी साफ केली व म्हटलं, " बसा ना साहेब. "

मी पाय आवरून गादीवर बसलों. देवकी गादीच्या एका कोंपऱ्यावर टेकून अवघडून बसली. दुकानदाराच्या लक्षांत येणार नाहीं अशा बेतानं ती सारखी मला खुणा करूं लागली, ' नको नको. ' मीं उलट तिला उलट खूण केली, ' मुकाट्यानं बस. '

तऱ्हेतऱ्हेचीं लहान मोठीं सोन्याचीं फुलं दाखवितांना दुकानदार देवकीच्या केसांकडे पुनःपुन्हां पहात होता. मधेंच तो मला म्हणाला, " तुमच्या बायकोचे केस फारच सुंदर आहेत. त्यांना फुलं शोभतील खरींच ! "

मी म्हणालों, " ही माझी बायको नाहीं. "

" मग ? "

त्याला काय उत्तर द्यावं मला सुचेना. देवकीकडे पाहाण्याचा मला धीर होईना. दुकानदार म्हणाला, " असलीं फुलं लग्न झालेल्या बायका डोक्यांत घालतात. " मी हंसलों आणि म्हणालों, " पण कुंवार मुलींनीं घालूं नयेत असा कांहीं नियम नाहीं ना ? " दुकानदार हंसला आणि म्हणाला, " साहेब नियम कसला ? हौसेखातर काय वाटेल तें करावं. " मीं म्हटलं, " मग झालं तर. देवकी, तुला कोणतीं फुलं सगळ्यांत जास्त आवडतात, सांग ना ?"

ती म्हणाली, " तुम्ही घ्याल तीं आवडतील, अन् तीं मी घालीन. "

तिचं तें उत्तर मला आवडलं नाहीं. मला ती आपला धनी समजत होती या गोष्टीची मला आठवण करून देणारं तिचं तें उत्तर होतं. मी काय एखाद्या कुत्र्याच्या गळ्यांत घालायसाठीं पट्टा विकत घेत होतों ! निव्वळ आज्ञाधारक-पणा तिच्याकडून मला हवा होता ?...पण तिचं बोलणं लागून घेण्याची ती वेळ नव्हती. " बरं, बरं " असं हंसत म्हणून मीं फुलं पसंत केलीं, आणि दुकानदाराला म्हटलं, " चांगलीं कर्णफुलं असलीं तर दाखवा. "

देवकीनं मोठमोठे डोळे केले आणि खुणावलं, ' आतां ! हें काय चाल-चलंय् तुम्ही ? ' मीं उलट डोळे वटारून खुणेनं तिला म्हटलं, ' गप्प बैस. '

दुकानांतून बाहेर पडतांना तीं नवीं सुंदर कर्णफुलं तिच्या कानांत होतीं. नुकतीच घातल्यामुळें त्याचा तिला थोडासा त्रास होत असावा. ती पुनःपुन्हां डाव्या उजव्या कानाचं पाळं चांचपून पहात होती. चालतां चालतां मीं तिला विचारलं, " फुलं आवडलीं नाहीत तुला ? "

ती म्हणाली, " आवडलीं कीं. "

" मग सांगत कां नाहींस ? "

" सांगायचं काय त्यांत ? तुम्हांला जें आवडतं तें मला आवडणारच ! "

आतां रस्त्यावर आम्ही दोघ एकटीच होतों. तिचा दंड थोडासा हिसकून मी रागानं म्हटल, " देवकी, तुझं हें असलं बोलणं मला बिलकुल पसंत नाहीं. मी जें म्हणेन तें तूं ऐकावंस हें नको आहे मला. "

" मग काय हवं ? "

" कधीं तरी मीं तुझं ऐकलं पाहिजे असा हट्ट धर. तुला काय हवं, तुला कशांत आनंद आहे तें मला सांग. त्यांत मीहि आनंद मानला पाहिजे असं म्हण. माझ्यावर कधीं मधीं रुसत जा, रागावत जा, माझ्याशी भांडत जा. नुसता आज्ञाधारकपणा नको दाखवूंस मला. "

" मग आणखी काय दाखवूं ? "

तिच्याजवळून मला जें हवं होतं तें नीट उलगडून कसं सांगावं तें मला समजेना. आणि तें सांगण्याची थोडी भीतीहि वाटली. क्षणभर मी गप्प राहिलों, आणि मग म्हणालों, " तूं माझी आहेस असं मला वाटूं दे कीं. "

ती म्हणाली, " तुमची नाहीं तर दुसऱ्या कुणाची आहे मी ? पथिकबाबू पासून तुम्ही मला विकत घेतली.मला दुनियेंतून उठावं लागणार होतं,पण तुम्ही मला वांचवलंत. माझ्यावर सर्वस्वी तुमच्या एकट्याची मालकी आहे... "

मी एकदम गप्प झालों व जोरानं पावलं टाकूं लागलों. मनांत आलं, या वेडीला आतां काय म्हणावं ? माझं नाजुक मनोगत हिला कळत नाहीं ? ही आतां चांगली सतरा वर्षांची आहे. या वयांत हिला असल्या गोष्टी समजायला नकोत ?...

माझ्या बरोबरीनं पावलं टाकणं तिला नीटसं जमत नव्हतं. ती पुनःपुन्हां

मागं रहात होती. पण राहिली तरी मीं वळून बघत नव्हतों. ती चार पावलं धांवत होती, पुन्हां मागं पडत होती, पुन्हां थोडीशी दौडून माझ्याजवळ येत होती. मी मनांत म्हणत होतों धावूं दे खुशाल. नाहीं तरी ती स्वतःला एखाद्या मालकीच्या पाळीव जनावराप्रमाणेंच समजते आहे ना ? मग करी ना धांवपळ आपण तिच्याशीं एक शब्दसुद्धा बोलायचा नाहीं...माझीं पावलं आणखींच लांब लांब पडूं लागलीं

ती पळत माझ्याजवळ आली आणि माझा दंड दोन्ही हातांनीं धरून म्हणाली, " रागावलांत होय ? " मीं तिच्याकडे वळून पाहिलं. तिच्या मुद्रेवर तिच्या मनांतलं दुःख दिसत होतं. पण दुसऱ्याच क्षणीं ती दुःखाची छटा एकदम गेली आणि तिच्या तोंडावर हास्य पसरलं. ती म्हणाली, " असं काय बरं करतां ? "

तिच्या त्या हंसण्यांत आणि त्या विचारण्यांत तिच्याकडून जें मला हवं होतं त्याची अगदीं अस्पष्ट का होईना पण मला ओळखतां येईल अशी छटा होती. तिच्या कपाळावर, नाकाच्या शेंड्यावर, व वरच्या ओंठावरहि घामाचे थेंब चमकत होते. कानशिलांपासले केस वाऱ्यानं हालत होते. कानांत नुकतीच घातलेलीं सोन्याचीं पिवळीं धमक चकाकणारीं फुलं फार शोभत होतीं. माझ्याशीं बोलतांना तिनं हनुवटी उचलली होती त्यामुळें तिच्या गळ्यापर्यंतची रेषा कमानदार दिसत होती. आणि त्या रेषेच्याखालीं तिचं उघडं टवटवीत अंग दिसत होतं. ...माझ्या मनाचा कडवटपणा एकदम गेला...

मीं म्हटलं, " रागावलों नाहीं ग, पण— "

" पण काय ? "

" आत्तां नाहीं सांगत. पण केव्हां तरी तें तुला सांगणार आहे मी. "

दुसऱ्या दिवसापासून नवरात्रीचा उत्सव सुरूं झाला. हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या भागांत या उत्सवाची तऱ्हा निरनिराळी असते, पण सगळीकडे हिंदु लोक हा उत्सव या ना त्या रीतीनं साजरा करतात. देवीची पूजा करण्याचा प्रघात सगळीकडे आढळून येतो. अंजनगढपासून दोन अडीच मैलांच्या अंतरावर देवीचं देऊळ होतं. तिथें यात्रा सुरूं झाली. गांवांतले शेंकडो लोक

देवीच्या देवळाकडे जात. आमच्या तंबूवरून त्यांची रीघ दिवसभर आणि रात्रीसुद्धां लागलेली असे या दिवसांत बंगाली लोक पूजेचा मोठा उत्सव करतात. त्या उत्सवाचीं वर्णनं देवकी माझ्याजवळ करी. शाळांना, कॉलेजांना, कचेऱ्यांना सुद्धां 'पूजे' ची मोठी सुट्टी कशी असते स्पेशल गाड्या कशा सुटतात इत्यादि गोष्टी सांगून ती म्हणे, "माझ्या बापाबरोबर मी एकदां गेले होतें कलकत्त्याला. पण मी त्या वेळेस फार लहान होतें. आमचं मधुबानी गांव लहानसंच खरं. पण तिथेंसुद्धां कालिमातेच्या पूजेचा थाट खूप उडायचा..."

या आठवणी ती आनंदानं सांगत असे खरी, पण तिच्या त्या सांगण्याला केव्हां एकदम दुःखाचं स्वरूप येईल त्याचा नेम नाहीं याची मला भीति वाटे. म्हणून एकदां मी तिला विचारलं, "इथल्या या देवीच्या यात्रेला आपण जाऊं या काय एकदां?"

ती एकदम किंचित् हंसून म्हणाली, "मी म्हणणारच होतें तुम्हाला!"

मीं म्हटलं, "मग कां नाहीं म्हणालीस?"

माझ्या त्या प्रश्नाचं जें उत्तर तिच्या मनांत आलं तें तिनं बोलून दाखविलं नाहीं पण तिची चर्या एकदम गंभीर झाली त्यावरून मीं तें ओळखलं. मी म्हणालों, "असं वेड्यासारखं किती दिवस वागणार आहेस तूं माझ्याशीं?"

दुसऱ्या दिवशीं मी तिला घेऊन यात्रेला गेलों. संध्याकाळच्या खेळाच्या आंत परत यायला हवं होतं म्हणून आम्ही लवकरच निघालों दसऱ्याच्या आधींचा दिवस असल्यामुळें लोकांची खूपच गर्दी उडाली होती. दूर दूरच्या गांवाहून खेडुत चालत आले होते. मोठमोठ्या लॉऱ्या माणसांनीं भरून येत होत्या. अंजनगढचे रईस आपापल्या ऐटबाज मोटार गाड्यात आले होते. देऊळ एका छोट्याशा टेकडीवर होतं. टेकडीच्या पायथ्याशी एके ठिकाणीं गर्द राई होती. तिथें शेंकडों गाड्यांचा तळ पडला होता. मिठाईच्या दुकानांची गर्दी झाली होती. रबरी फुगे, खुळखुळे, बाहुल्या विकणाऱ्या लोकाची झुंबड उडाली होती. आम्ही शंभर पायऱ्या चढून वर गेलों तेव्हां देवाच्या मुख्य दाराबाहेर थांबून मीं देवकीला म्हटलं, "तूं एकटीच जाऊन दर्शन घेऊन ये. मी नाहीं आंत येत."

" कां ? "

" हें हिंदूंचं देऊळ आहे ! "

" बरं मग ? "

" तुला माहीत नाहीं, पण मी हिंदु नाहीं."

तें ऐकून तिला यत्किंचितहि आश्चर्य वाटलं नाहीं. माझ्या मनांत कधीं कधीं आलं होतं कीं, माझ्या जन्माची आणि जातीची हकीगत तिला मीं सांगितली तर तिला एकदम आश्चर्याचा धक्का बसेल आणि मग कदाचित माझ्यावर प्रेम करायला ती मुळींच तयार होणार नाहीं. ती हकीगत तिला केव्हां तरी सांगायला हवी हें मला कळत होतं. पण ती गोष्ट मी नेहमीं पुढें ढकलीत होतों. आतां सहजगत्या माझ्या तोंडून माझ्या जातीबद्दलचा उद्गार बाहेर पडला, आणि तो बाहेर पडत असतांनाच मीं मनाशीं म्हटलं, 'झालं, संपलं ! कालिमातेपुढें बकऱ्याचा बळी द्यावा त्याप्रमाणें या देवीच्या दारांत माझ्या प्रेमाचा बळी मी देतों आहे...'

परंतु माझं बोलणं ऐकून तिनं मुळींसुद्धां आश्चर्य दाखवलं नाहीं. ती मला म्हणाली, " कांहीं तरी नका बोलूं. "

मीं म्हटलं, " कांही तरी नाहीं, खरंच सांगतों, मी हिंदु नाहीं. "

तिनं कपाळाला आंठ्या घातल्या पण तिच्या तोंडावर मोठं गमतीदार हास्य उमटलं ती म्हणाली, " उगीच हिंदु हिंदु नका करूं. तुमच्या जातीचा विचार करतो कोण ? माझ्या बापाकडे येणारे एक पुढारी म्हणत असत, ज्याला हिंदु व्हायची इच्छा आहे तो हिंदु. तुम्हाला आहे का इच्छा ? "

मी हंसलों आणि मान हालविली.

ती म्हणाली, " मग मीं तुम्हांला हिंदु केलं असं समजा. माझा हात धरा आणि चला पाहूं आंत. " असं म्हणून तिनं मला आपल्या हातानं ओढलं.

आम्ही दर्शन घेऊन बाहेर आलों, पायऱ्यांवरून पळत खालीं उतरण्याची शर्यत लावली, राईत परत येऊन खूप मिठाई घेतली, आणि तिथल्या गर्दीत कुठें तरी खायला बसण्याऐवजीं बऱ्याच अंतरावर जाऊन एका लहानशा मळ्याच्या कडेला दोन मोठाल्या झाडांच्या छाये खालीं हिरवळीवर बसलों.

# ★ गो पा ल ★

सूर्य माथ्यावरून खालीं ढळला होता. अजून भर दोनप्रहर असल्यासारखंच वाटत होतं. ज्या मळ्याच्या कडेला आम्ही बसलों होतों त्यांत भाजीचे वाफे होते आणि फुलांचे ताटवेहि होते. हिरव्या, पिवळ्या, तांबड्या, पांढऱ्या रंगांचे पट्टेच्या पट्टे झगझगीत उन्हांत चकाकत होते. त्यांवर नजर स्थिर केली कीं भास होई, जवळच्या एखाद्या पाणवठ्यावर आंघोळीला गेलेल्या बायकांनीं सोडून वाळत घातलेलीं हीं चिरगुटं तर नव्हेत ? समोरच्या एका शेतांतलीं पिकं काढलीं गेल्यामुळें काळ्या जमिनीचा मोठा पट्टा उघडा पडला होता पण त्या पलीकडच्या भागांत उंच उंच कणसांची दाटी झालेली दिसत होती, आणि वाऱ्याचा झोत सोसवेनासा झाला कीं ती टपोरीं कणसं इकडे तिकडे माना हालवीत होतीं. उजव्या बाजूला हिरव्या गार कुरणाचा वांकडा तिकडा त्रिकोण उतरणीवर सहज आंथरल्यासारखा दिसत होता, त्यावर पांच पंचवीस मेंढया चरत होत्या, आणि अंगावर मोठमोठे काळे डाग असलेले दोन पांढरे धिप्पाड बैल त्या छोट्याशा कुरणाच्या कडेला असलेल्या एका उंच झाडाला अंग घाशीत होते. या भागांत डोंगर जवळजवळ मुळींच नसल्यामुळें मावळतीची रेषा खूपच दूरवर होती, पण त्या रेषेच्या वरच्या बाजूनं आभाळ मोठमोठ्या ढगांनी भरून गेलेलं होतं. पावसाळा अजून पुरता उलगडला नव्हता याची साक्ष या ढगावरून जशी पटत होती तशीच हवेंतल्या ओलसर उकाड्यावरूनहि आणि आमच्यापासून दूर अंतरावर पण अनेक ठिकाणीं दिसणाऱ्या, सांचलेल्या गढूळ पाण्यावरूनहि पटत होती...

आम्ही गप्पा करीत खूप वेळ बसलों, मिठाई खाल्ली, आणि मग मी आपले दोन्ही हात डोक्याखालीं घेऊन खुशाल अडवा झालों. डोक्यावरच्या झाडाच्या फांद्यावर झगझगीत आभाळाचे निळे ठिपके मी अर्धवट मिटलेल्या डोळ्यांनीं पहात होतों. देवळाच्या बाजूनं यात्रेची गजबज अस्पष्ट ऐकूं येत होती. वाऱ्याचा फवारा मधेंच अंगावरून जात होता. पण थोडें पुढें टेकून आणि हातांची मिठी गुढग्याला घालून देवकी माझ्याकडे तोंड करून बसली होती. मिठाईच्या पुड्याचा टाकून दिलेल्या दोरा वाऱ्यानं उडून तिच्या केसांना चिकटला होता, त्याचं एक टोक तिच्या गालावर सारखं येत होतं. तें आलं

कीं ती मानेला हिसका देत होती, तें दूर होत होतं, पुन्हां तिच्या गालाला लागत होतं. खरं काय होत होतं त्याची तिला कल्पना नव्हती. मीहि मुद्दामच सांगत नव्हतों. तिचा तो मानेचा चाळा मला पहावासा वाटत होता.

आजचा सबंध दिवस आम्ही दोघांनीं फार मजेंत घालविला होता. मनांत वरचेवर येत होतं, देवकीला साऱ्या गोष्टी स्वच्छ सांगाव्या. पण पुन्हां वाटे, ती मला हवं तें उत्तर देईल कीं नाहीं कुणास ठाऊक ? आणि तिनं दिलं नाहीं तर ? चालू घटकेचं सुख मात्र नासायचं. त्यापेक्षां ज्या विषयाची खात्री नाहीं तो न काढलेलाच बरा ! मग मी दुसऱ्या साध्या गोष्टी बोलत राहिलों. माझ्या मनांतल्या उलट सुलट विचारांची देवकीला अर्थातच कल्पना नव्हती. मी बोललों कीं ती बोले, मधूनच स्वतः कांहीं बोलणं ती काढी, आणि मी जरी पुष्कळ वेळ गप्प राहिलों तरी, " बोला कीं, गप्प काय राहिलां ? " असं ती म्हणत नसे. पण मधेंच एकदां तिनं विचारलं,

" झोंप लागली काय तुम्हाला ? "

मीं डोळे न उघडतां म्हटलं, " फार मजा आहे असं पडून राहाण्यांत. तूंहि डोळे मिटून अशी पड कीं जरा. "

ती म्हणाली, " दोघांनाहि गाढ रानझोंप लागावी आणि संध्याकाळ व्हावी, अशी तुमची इच्छा आहे कीं काय ? "

" झाली तर काय बिघडलं ? "

ती म्हणाली, " खेळाच्या वेळेच्या आंत जायचं भान नाहीं वाटतं तुम्हाला ?"

मीं म्हटलं, " हं ! एक दिवस चुकलं काम तर काय मोठंसं बिघडलं ! खरं म्हणशील तर मला आता या धंद्याचा कंटाळा आलाय. एक दिवस सोडणार आहे सर्कस मी. "

" सर्कसमधल्या कामाऐवजीं काय करावं असं वाटतं तुम्हांला ? "

मीं मानेखालचे हात काढले, डाव्या कुशीवर वळलों आणि म्हणालों, " रोज असं यात्रेला यावं, मिटाई खावी, झाडाखालीं गवतावर पडावं असं वाटतं. "

तिला एकदम हंसूं आलं. माझ्या इच्छेंतला पोरकटपणा मला दाखवण्यासाठीं ती म्हणाली, " रोज ? अशी यात्रा रोज असते काय ? "

मीं गांभीर्याचं नाटक करून म्हटलं, "हो, ही अडचण आहे खरी. पण एवढं खरं कीं सर्कसमधल्या कामाचा मला कंटाळा यायला लागला आहे. मनांत येतं कुक् साहेबाची जशी वाडी होती तशा एखाद्या वाडीवर जाऊन रहावं, लहानसं शेत असावं, दिवसभर त्या शेतावर काम करावं, घरीं परत यावं, तबेल्यांत राजा असावा, त्याला मालीश करण्यांत आपल्याहि अंगाचा शीण घालवावा..." बोलतां बोलतां मीं तिच्याकडे निरखून पहात होतों. तिची चर्या थोडीशी खुलल्यासारखी मला वाटली. मीं तिला विचारलं, " असं राहणं आवडेल तुला ? "

ती एकदम चपापली आणि म्हणाली, " मला ? " जणूं जें स्वप्न मी रंगवीत होतों त्यांत तिचा काय संबंध होता अशा अर्थानं तिनं तो उद्गार काढला होता. पण तिच्यावर रागावायचं नाहीं असं मीं ठरविलं होतं. म्हणून मी हंसलों व म्हणालों,

" हो, तुला. असं राहणं तुला आवडेल का मला कळूं दे. कारण सर्कस सोडून मी कुठेंहि गेलों तरी मी एकटा जाणार नाहीं. माझ्याबरोबर राजा असेल. आणखी तूं असशील, नाहीं कां ? "

तिनं मान हालविली. पण ती हालवितांना माझ्याकडे पाहण्याऐवजीं दूर अंतराळांत कुठें तरी ती पहात होती. मीं स्वतःला म्हटलं, 'जो विषय काढायचा नाहीं असं ठरविलं होतं तो काढण्याची चूक मीं कशाला केली ? ' तिच्या थंडपणाला दोष देण्याऐवजीं माझ्या घाईलाच मीं दोष दिला. आतांशा देवकी बद्दलचे विचार करतांना मीं स्वतःला जें बजावून सांगत असे तेंच आतां पुन्हां सांगितलं. देवकीचं प्रेम मला मिळवायचं असेल तर उतावळेपणानं वागण्यांत अर्थ नव्हता. केव्हां ना केव्हां तरी माझं प्रेम ती ओळखील, मला केवळ आपला उपकारकर्ता मानण्याऐवजीं प्रेमिक म्हणून माझ्याकडे पाहील, ही आशा मीं मनांत घट्ट धरायला हवी होती...हा विवेक सांभाळणं या घटकेला कठीण होतं. आजूबाजूची ती शांतता, तो रम्य देखावा, आणि माझ्या पुढेंच

बसलेली, ऐन दुपारच्या उन्हांत अधिकच कांतिमय दिसणारी, तिची ती मोहक मूर्ति– या सगळ्यांचा परिणाम होऊन मला अशी अनिवार इच्छा होत होती कीं चटकन् उजवा हात पुढें करून तिला जवळ ओढून घ्यावी, छातीशीं घट्ट धरावी, आणि म्हणावं, "मला काय पाहिजे तुला कळत नाहीं? माझा असा छळ कां करतेस?..." परंतु मला तिचं शरीर असं कुसकरायचं नव्हतं. तिचं मन दुखवायाचं नव्हतं. घट्ट मिटलेली कळी मला नको होती. फुललेलं फूल मला हवं होतं. तिच्या प्रेमासकट ती मला हवी होती...

तिच्याकडे पाहणंच नको असा विचार करून मी पुन्हां दोन्ही हातांचे गुंतविलेले तळवे उशाला घेऊन उताणा पडलों, आणि डोळे घट्ट मिटून धरले.

बऱ्याच वेळानं मीं तिला म्हटलं, "त्या पुस्तकांतली गलिव्हरची गोष्ट केव्हां तरी सांगेन म्हणाली होतीस ती सांग कीं." तिनं उत्तर केलं नाहीं म्हणून मीं डोळे उघडले. पाहतों तों ती आपल्या जागीं नव्हती! मी पालथा झालों आणि इकडे तिकडे बघितलं. ती मळ्याच्या टोंकाला गेली होती, आणि तिथल्या झुडुपांत तांबडीलाल छोटीं नाजुक रानफुलं उगवलीं होतीं तीं खुडून त्यांची माळ करीत होती. मीं ओरडून म्हटलं, "जरा सांभाळून बरं का!" माझा शब्द ऐकून तिनं माझ्याकडे वळून पाहिलं आणि किंचित् हंसून, तयार झाली होती तेवढी त्या तांबड्या फुलांची माळ हातांत उंच धरून तिनं मला दाखविली. मी हंसलों पण पुन्हां ओरडलों, "तें ठीक आहे, पण म्हटल जरा सांभाळून. ते दोन मस्त बैल तुझ्या दिशेनें हलके हलके येताहेत." उं: ! ते काय मला करतात, अशा अर्थी तिनं मान वेळावली. मी तिच्याकडे पहात राहिलों.

पण तितक्यांत त्या दोन बैलांची कशावरून कोण जाणे, कदाचित् केवळ मस्तीमुळें असेल, टक्कर सुरू झाली. सारं बळ एकवटून पाय मातींत रोंवून शेपट्या वर करून कपाळाला कपाळ, शिंगांना शिंगं भिडवून ते एकमेकांला रेटूं लागले. आणि हें रेटणं पुरतं एक दोन मिनिटं झालं न झालं तोंच त्यांतला एक बैल आपला मोहरा फिरवून दूर झाला आणि डरकाळ्या फोडीत चौखूर उधळला तो देवकी उभी होती तिकडेच.

मी एकदम ताडकन् उठलों आणि धूम ठोकली. समोरून शिंगं रोखून येणाऱ्या बैलाला पाहतांच देवकीनं किंकाळी फोडली आणि ती पळत सुटली. पण उधळलेल्या जनावरापुढें सरळ रेषेंत कधीं पळूं नये हें तिला माहीत नव्हतं. ती पुढें धांवत होती, तिला पाहिल्यामुळें अधिकच चेवलेला तो बैल तिच्या मागं धांवत होता. " देवकी ! देवकी ! " अशा अर्थशून्य हांका मारीत मी दौडत होतों. त्या बैलानं तिला गांटण्यापूर्वी तिच्याजवळ मला पोंचायला हवं होतं. शर्यतींत धांवल्याप्रमाणें मी पळालों. शेवटीं एकदम झेप टाकून तिला घट्ट धरली, उचलली आणि चार पावलं बाजूला झालों. दुसऱ्याच क्षणीं एखाद्या आगगाडीचं इंजिन जावं त्याप्रमाणें त्या पिसाट उधळलेल्या बैलाचं धूड आमच्या पुढून गेलं.

देवकी मला अगदीं घट्ट बिलगली होती. तिनं माझ्या छातीवर मान टेकली होती डोळे मिटून घेतले होते. तिची छाती केवढ्यांदा धडधडत होती तें माझ्या छातीला कळत होतं. तिच्या अंगाचा थरकांप माझ्या अंगाला कळत होता. तिच्या त्या स्पर्शानं होणाऱ्या सुखाची लकेर माझ्या हातापायांत उठून माझंहि अंग थरारत होतं. ज्या सुखाची मला ओढ लागलेली होती, पण जें मीं कटाक्षानं घेतलं नव्हतं, त्या सुखाची आणि माझी भेट अकस्मात झाली होती. ज्या सुखाची केवळ निराकार कल्पना माझ्या मनात हजारदां तरंगली होती तें साकार होऊन माझ्या सबंध अंगभर रोमांच उठवीत होतं. नुसती कल्पना करतांना त्याचा गाढपणा मला कळला नव्हता. आतां कळत होता...आणि या सुखावांचून मला जिणं कंठावं लागलं तर मी भ्रमिष्टच होईन असा विचारहि माझ्या मनांत येत होता...

देवकीनं डोळे उघडले तेव्हां मीं तिला अलगद उभी केली. पण ती इतकी भ्याली कीं उभं राहण्याऐवजीं ती मटकन् खालींच बसली. मी तिच्याजवळ बसलों. तिनं डोळे चोळले, माझ्याकडे पाहिलं, आणि नंतर ज्या दिशेनं तो बैल निघून गेला होता त्या दिशेकडे नजर टाकली. तो मस्त बैल पुन्हां एका ठिकाणच्या झाडाच्या खडबडीत सालीवर आपलं अंग घांशीत होता. पण त्याचं धांवणं संपलं होतं. मघांचा पिसाटपणा गेला होता. शेपटी खालीं झाली

होती. त्याच्याकडे पाहतां पाहतां तिला एकदम हंसूं आलं. मीहि हंसलों. ती म्हणाली,

" तुम्ही नसतां तर आज मी मेलें होतें खचित. "

मीं म्हटलं, " तरी मी तुला ओरडून सांगितलं होतं, संभाळून ? "

" तुम्ही हा दुसऱ्यांदा जीव वांचवलांत माझा " ती म्हणाली, " एकदां पृथिकबाबूच्या मिठींतून मला सोडविलीत; आणि आतां ही पुन्हां. तुमचे माझ्यावर किती उपकार व्हायचे आहेत, कुणास ठाऊक ? "

'उपकार ! आली का पुन्हां ही भाषा ! तुमचं माझ्यावर किती प्रेम आहे असं कां ही म्हणत नाहीं ?...' या विचारांची उसळी मला असह्य झाली. मीं तिचे दोन्ही खांदे धरले आणि तिला गदगदां हालवून म्हटलं, " देवकी ! माझं प्रेम तुला कळत नाहीं का ? "

तिनं माझ्याकडे चमत्कारिक नजरेनं पाहिलं. आणि ती रडूं लागली.

★ ★ ★

# ३

अंजनगढ सोडल्यावर आणखी दोन लहान गांवं करून, आणि त्यानंतर रामपूर संस्थानांत मोठा मुक्काम करून आम्ही दिल्लीला पोंचलों, तेव्हां वर्ष उलटून नव्या वर्षाचा फेब्रुवारी महिना सुरूं झाला होता. हिंवाळा संपत आला होता पण निरोपं घेण्यापूर्वीं थंडी जणूं कडकडून मिठ्या मारून घेत होती. उघड्या तंबूंत कामं करतांना आमच्या खेळाडूंचे हातपाय गारठत होते. जनावरांपुढें गार पाण्याची बादली ठेवली तर तीं पाण्याला तोंड लावायला बिचकत होतीं. राजाच्या पायांखालच्याच गवतांतला गारठा कसा कमी करावा याची चिंता मला वाटे. त्याच्या अंगावर घालण्यासाठीं तयार केलेली गरम झूल त्याला पुरेल कीं नाहीं अशी काळजी वाटे. सूर्य मावळतीकडे केव्हांच नाहींसा होई. पांच वाजतांच रात्र सुरूं होई. दिवे लागले कीं प्रत्येक दिव्याच्या भोंवतालीं धुक्याचा दाट वाटोळा थर दिसे. रात्रीच्या त्या पहिल्या प्रहरीं शहरांतली रोषणाई मोठी गमतीदार वाटे. ‘ कॉनॉट सर्कस ’ नांवाच्या विस्तीर्ण वर्तुलाकार जागेंतली मधोमधची बाग, बागेला प्रदक्षिणा घालणारा रहदारीनं गजबजलेला प्रशस्त रस्ता, आणि रस्त्यापलीकडे साऱ्या बाजूंस असलेल्या मोठमोठ्या इमार-

तींच्या कमानीखालच्या फरसबंद वाटांतून एखाद्या पाण्याच्या लोंढ्याप्रमाणें हालणारी ऐटबाज कपडे केलेल्या स्त्री-पुरुषांची गर्दी—हें सारं धुकं आणि प्रकाश यांच्या मिश्रणांत तरंगणाऱ्या एखाद्या चित्रासारखं वाटे. या फरसबंद वाटांवर पानपट्टीपासून तों तीस रुपये वाराच्या गरम कापडापर्यंत हजार प्रकारच्या वस्तू विक्रीसाठीं मांडलेल्या असत, आणि लगतच्या मोठमोठ्या दुकानांत फॅशनेबल गिऱ्हाईकांची दाटी झालेली असे...

या फरसबंद वाटेनं उगीच रेंगाळत इकडे तिकडे भटकण्याची मला मोठी मौज वाटे. एकदां असंच हिंडतां हिंडतां एका मोठ्या दुकानाच्या दर्शनी खिड-कींत बायकांनी घालायचा 'फर' चा मऊ मऊ काळाभोर सुंदर कोट मला दिसला. त्याला लावलेलं किंमतीचं लेबल मीं वाचलं, खिशांतल्या नोटा पाहिल्या आणि दुकानांत शिरून तो कोट मीं विकत घेतला. तंबूवर आल्याबरोबर मावशीच्या राहुटींत जाऊन मीं विचारलं, "देवकी कुठें आहे?"

मालकांसाठीं दालचिनीचा काढा तयार करण्यांत मावशी गुंतली होती. माझ्याकडे न पहातां ती म्हणाली, "ती कोपऱ्यांत सतरंजीवर वाचीत बसली आहे, दिसली नाहीं का तुला?"

मी देवकीजवळ गेलों, तिच्या हातांतलं पुस्तक काढून घेतलं, तिला उभी केली, आणि पार्सलांतला कोट काढून तिच्या अंगावर चढविला. ती इतकी आश्चर्यचकित झाली कीं तिला कांहीं बोलतांच येईना. तिनं फक्त आपला डावा तळवा तोंडावर टेकला, आणि माझ्याकडे पाहून मान हालविली. अंजन-गडला मीं तिला सराफी दुकानांत नेलं होतं तेव्हां तिनं माझ्याकडे पाहून अशीच मान हालविली होती.

मीं मावशीला म्हटलं, "या देवकीकडे एकदां बघ तरी" मावशीनं मान वळवून बघितलं, दोन्ही तळवे एकमेकांवर आपटून उंच केले, आणि म्हटलं, "वा! काय ग तुझा हा थाट!" मग ती मला म्हणाली, "एवढा उंची कोट तिला घालायसाठीं आणलास, पण हा तिनं घातलेला चार चौघांच्या दृष्टीस पडायला नको काय?"

मीं म्हटलं, " जरूर हवा. उद्यां संध्याकाळीं मी तिला ' कॉनॉट सर्कस 'वर फिरायला घेऊन जाणार आहे. "

कोटाचीं बटनं काढायला लागून देवकी म्हणाली, " छीः छीः ! भलतंच कांहीं तरी ! मी नाहीं येणार हं ! "

तिनं काढलेलं एक बटन पुन्हां घालीत मीं म्हटलं, " नाहीं येणार म्हणजे काय ? मी तुला नेल्याशिवाय राहाणार नाहीं. "

दुसऱ्या दिवशीं तिनं विरोध केला नाहीं. त्या कोटाला साजेशी साडी नेस म्हणून मीं म्हटलं, तेंहि तिनं ऐकलं. उंच टाचांचे बूट घातले कानांत लोलकांची इअर-रिंग्ज घातलीं. तिला बरोबर घेऊन ' कॉनॉट सर्कस ' वर फरसबंद वर्तुळाकार वाटेनं हिंडतांना मला वाटूं लागलं मी कुणी तरी मोठा मनुष्य आहे. मागून समोरून येणाऱ्या लोकांचा धक्का तिला लागूं नये म्हणून मी तिच्या दंडांभोंवती हात घातला होता. मधेंच तेथून काढून मी तो तिच्या कमरे-भोंवतीं टाकीत होतों. मऊ कोटाच्या आंत तिचं नाजुक लुसलुशीत अंग माझ्या हाताला लागत असल्याचा खोटाच भास मी स्वतःसाठी निर्माण करीत होतों, आणि तो मला सुखाचा होत होता...मीं तिला म्हटलं, " एखाद्या दुकानांत जाऊन कांहीं खाऊ या का ? "

नको नको म्हणण्यासाटीं मान हालविण्याची तिची तऱ्हा आतां मला पुरती माहीत झाली होती. आणि तिच्या नकाराकडे मी लक्षच देत नसे. त्यामुळें तिच्या मानेच्या सौंदर्याकडे तेवढं मी पहात असे. उजव्या हाताला एक फॅश-नेबल हॉटेल दिसलं, त्याकडे वळून मीं तिला पायऱ्यांवरून आंत नेलं. आम्ही एका बाजूच्या टेबलावर जाऊन बसलों. तिनं कॉफी घेतली, मीं दारू घेतली. एक पेग संपल्यावर मीं दुसरा घेतला. दुसरा घेतल्यावर तिसरा घ्यावासा वाटला म्हणून तिसरा मागविला. मी देवकीशीं बोलत होतों; पण बोलण्यापेक्षांहि जास्त पहात होतों. हॉटेलांतले सारे दिवे किंचित् जांभळ्या रंगाचे होते. त्याच्या रोषणाईला आलेली ती जांभळी छटा मोठी मजेदार वाटत होती. त्या प्रकाशांत देवकीचं रूप न्याहाळून पहातां पहातां भोंवतालच्या लोकांचं मला भान राहिलं नाहीं. दारू घेतल्यामुळें माझ्या वृत्तीला एक प्रकारचा तरळपणा आला होता.

अंतःकरण मोहरून गेलं होतं. जिवाभावाच्या गोष्टी खूप खूप बोलाव्या असं वाटत होतं...

मी काय बोलत होतों कुणास ठाऊक ? पण जें बोलत होतों त्याला धरूनच म्हणा किंवा विषय बदलून म्हणा मीं देवकीला म्हटलं, " साठ रुपयांच्या या फर कोटाची गोष्ट कशाला सांगतेस ? तुझ्यावरून वाटेल तेवढे पैसे ओंवाळून टाकीन मी ! वाटेल तेवढे ! समजलीस ? शेंकडों ! हजारों ! " प्रत्येक शब्दाबरोबर मीं हात वर करून फिरविला. त्याची सांवली उजव्या हाताच्या पार्टिशनवर पडलेली माझी मींच पाहिली. मी दारूचा ग्लास दोन्ही हातांनीं पकडला आणि देवकीकडे पाहून हंसलों. " पैशाची फिकीर नाहीं आपल्याला. माझ्या घोड्याचं नांव राजा आहे. पण त्या राजाचा मी राजा आहे. मी दारू पिऊन बोलतों आहे असं समजूं नकोस. खरं खरं बोलतों आहे. अंतःकरण काढून तुझ्यापुढें ठेवतों आहे. लक्षांत येतंय का तुझ्या ? " तिनं मान हालविली. मीं ग्लास उचलून तोंडाला लावला, रिकामा करून खालीं ठेवला आणि तिला म्हटलं, " तुझे दोन्ही हात पुढें कर. माझ्या हातांत दे. " एखाद्या आज्ञाधारक शिकविलेल्या कुत्र्यानं पंजा द्यावा त्याप्रमाणें तिनं आपले हात टेबलावर पसरले. तिच्या बोटांत बोटं गुंतवून तीं घट्ट दाबीत मीं म्हटलं, " देवकी, माझं तुझ्यावर फार प्रेम आहे. तूं मला फार प्यार आहेस. तूं माझी आहेस ! माझी आहेस ! खरं कीं खोटं ? "

तिनं पुन्हां मान हालविली, पण ओंठ दांतांखालीं दाबून ती गप्प राहिली.

" नुसती मान काय हालवितेस ? बोल ना. बोल ! तूं माझी आहेस कीं नाहींस ? " मीं तिचीं बोटं इतक्या जोरानं दाबलीं कीं " आः ! " असा उद्गार तिच्या तोंडून बाहेर पडला. मीं पुन्हां म्हटलं, " सांग, तूं माझी आहेस कीं नाहींस ? "

ती म्हणाली, " मी तुमचीच आहे. माझ्या आईबापांनीं मला एकदांच जन्म दिला. पण तुम्ही मला दोनदां दिलात. मी जशी माझ्या आईबापांची होते तशीच तुमचीहि आहे. तुमच्याविषयीं मला किती आदर वाटतो तें मला सांगतां येणार नाहीं. परमेश्वराचा जितका माझ्यावर हक्क आहे तितकाच

तुमचाहि आहे. मी मनानं नेहमीं तुमची पूजा करतें. तुम्ही माझे परमेश्वर आहांत. ”

‘परमेश्वर ! पूजा ! आईबाप ! आली का ही भाषा पुन्हां ?... ’ दारू प्याल्यावर माणसाच मन हलकं होतं, त्याप्रमाणेंच तें चंचलहि होतं. अगदीं सहजासहजीं प्रेमाचा असा कांहीं उमाळा येतो कीं तो आवरून धरतां येत नाहीं. पण रागहि चटकन् येतो, आणि आला कीं अनावर वाटतो...माझ्या मनांत आलं देवकीच्या एक तोंडांत भडकवावी आणि म्हणावं, “ तुझा आदर नको आहे मला. प्रेम हवं आहे. ऐकलंस का ? प्रेम ! ” प्रेम प्रेम म्हणून ओरडावं आणि ग्लास मोठमोठ्यांदा टेबलावर आपटावा अशी मला इच्छा झाली...

मीं तसं केलंहि असतं. पण इतक्यांत पार्टीशन पलीकडच्या शेजारच्या जागेंतून दोघां तरुणांचे उंच आवाजांतले शब्द ऐकूं आले. ते ज्या भाषेंत बोलले ती मला कळली नाहीं. पण देवकीचा चेहरा एकदम बदलला. तिच्या मुद्रेवर एकदम आश्चर्य आणि आनंद उमटला. ती मला म्हणाली, “ पलीकडे कुणीतरी बंगाली लोक आहेत. ”

मीं रागानं म्हटलं, “ मग ऊठ, अन् जा त्यांच्याकडे. ”

माझ्या त्या बोलण्यानं ती एकदम चपापली व पुटपुटली, “ त्या अर्थानं नाहीं मीं म्हटलं. ”

“ नाहीं कसं ? मला समजतो अर्थ : जा जा त्यांच्याकडे आणि भेट त्यांना. वाटलं तर मी जातों अन् त्यांना इकडे घेऊन येतों. तुझ्या देशचीं माणसं भेटूं देत तुला !” असं म्हणत मीं खरोखरच फर्रदिशीं खुर्ची मागं सरकवली आणि उठलों. तिनं माझा कोट ओढला आणि दीनवाण्या डोळ्यांनीं माझ्याकडे पाहिलं. पण माझी दारूची नशा निराशेनं आणि रागानं वाढली होती. मीं तिचा हात झटकून पुढें पाऊल टाकलं, झुलतं दार लोटून कंपार्टमेंटच्या बाहेर पडलों, आणि शेजारच्या कंपार्टमेंटच्या झुलत्या दारावर टकटक करून आंत शिरलों. लष्करी युनिफॉर्म घातलेले दोन तरुण ड्रिंक घेत बसलेले मला दिसले. चमत्कार असा कीं त्यांच्यापुढें उभं राहिल्याबरोबर मला असा विचार सुचला कीं एखाद्या

मवाल्यासारखं वागून उपयोगाचं नाहीं. सभ्यतेनं वागलं पाहिजे. मीं त्यांना म्हटलं, " सद्‌गृहस्थ हो, मी असा एकदम आंत शिरलों याबद्दल मला माफ करा. पण तुम्ही बंगाली असाल तर माझं एक काम आहे. " त्यांच्या दोघांच्याहि चेहऱ्यावर ' काय ' असा प्रश्न दिसला. मीं म्हटलं, " माझ्याबरोबर माझी एक मैत्रीण आहे. ती मूळची पूर्व बंगाल्यांतली आहे. तुम्ही जर बंगाली असाल तर तुमची भेट व्हावी अशी तिची इच्छा आहे. येतां ! "

" मोठ्या आनंदानं. " असं म्हणून ते उठून उभे राहिले.

मी त्यांना घेऊन देवकीकडे परत आलों.

लष्करी माणूस शरीरानं उंच निंच बांधेसूद आणि नाकाडोळ्यांनीं नीटस मूळचं असलं तरच युनिफॉर्मची ऐट त्याला शोभते. नाहीं तर चांगल्या सुंदर रॅपरमध्यें वाणसौद्याच्या दुकानांतला माल गुंडाळलेला दिसावा तद्‌वत् कांहीं तरी चमत्कारिक पाहिल्यासारखं वाटतं. दिल्लींत ' फौजी भाई ' रस्तोरस्तीं दिसत असत. सर्कसच्या खेळालाहि त्यांची पुष्कळ वेळां गर्दी असे. परंतु त्यांपैकीं पुष्कळांकडे पाहिलं कीं मला वाटत असे, शीः हा ऐटबाज पोषाख यांना कांहीं शोभत नाहीं. आत्तां या दोन बंगाली तरुणांकडे पहातांना मला वरचेवर झोकबाज रॅपरमधें गुंडाळलेल्या वाणसौद्या मालाच्या उपमेची आठवण होत होती. ते दोघहि बंगाली होते, पण बंगालच्या अगदी वेगवेगळ्या भागांतले होते. त्यांपैकीं एकजण नकटा, गोबऱ्या तोंडाचा, ठेंगणा, आणि जाडजूड होता. त्याचं नांव मी आतां विसरलों. दुसरा जरासा उंचट पण बारीक डोळ्यांचा, तोंडावर अस्पष्ट देवीचे वण असलेला, टक्कल पडलेला आणि बोलतांना थोडसं एखाद्या तोतऱ्या माणसाप्रमाणें बोलणारा होता त्याचं नांव तिमिरबाबू. देवकीच्या मधुबानी गांवाचाच तो मूळचा होता. तें गांव पाकिस्तानांत जाऊन तिथल्या हिंदु लोकांची वाताहात झाली तेव्हां तो घरी नव्हता पंजाबी निर्वासितांची दिल्लीकडे पळून यावयासाठीं प्रचंड रीघ लागली तेव्हां त्यांच्या संरक्षणासाठीं सरकारनं जें सैन्य त्या सरहद्दीवर ठेवलं त्या सैन्यांत तो त्यावेळेस काम करीत होता. त्याचं घरदार लुटलं गेलं, कुटुंबां-तलीं माणसं मारलीं गेलीं, बेपत्ता झालीं, इत्यादि हकीगती त्याला नुसत्या

ऐकाव्या लागल्या होत्या. देवकीप्रमाणेंच तोहि आतां एकटा राहिला होता. देवकीच्या शाळेवरची मुख्य अध्यापिका म्हणजे त्याची दूरची विधवा चुलत बहीण होती. देवकीचे आईबाप त्याला ऐकून माहीत होते. मधुबानीच्या सधन प्रतिष्ठित घराण्यांपैकीं तिचं कुटुंब होतं हें त्याला ठाऊक होतं...त्या कुटुंबांतली एकटीच राहिलेली देवकी आतां त्याला अकस्मात् भेटत होती. आणि मधुबानीं-तच ज्यांचं लहानपण गेलं होतं असा एक तरुण देवकीला अकस्मात् भेटत होता. दोघांनीं एकमेकांला पूर्वी कधीच पाहिलेलं नव्हतं. एकमेकांचीं नांवंहि कधी ऐकलेली नव्हतीं. परंतु या भेटीचा अकल्पितपणा, आणि घरची सारीं माणसं नाहीशीं झाल्याच्या दुःखाचं समानशीलत्व, या दोन गोष्टींमुळें तिच्यांत व त्याच्यांत एकदम जिव्हाळा उत्पन्न झाला. तीं दोघंजणं आपल्या गावच्या विशिष्ट बंगाली बोलींत एकमेकांचीं सुखदुःखं विचारण्यांत आणि सांगण्यांत अगदीं तद्रूप होऊन गेली. मी आणि तो दुसरा लठ्ठ फौजी भाई जवळ आहोंत याचं भानहि जणूं त्यांना राहिलं नाहीं.

देवकी आणि तिमिरबाबू यांची ताटातूट करण्याचे माझ्या जिवावर आलं होतं. पण खेळाच्या वेळेवर तंबूवर परत जायलाच हवं म्हणून शेवटीं मनगटावरचं घड्याळ देवकीपुढें करीत मीं म्हटलं, " किती वाजले पाहिलंस ना ? आपल्याला जायला हवं. " देवकीला दंडाला धरल्यासारखं करून मी उठलो. तिमिरबाबू व त्याचा सोबतीहि उठले. " अच्छा, आतां पुन्हां केव्हां भेट ? " असा हिंदुस्तानींत प्रश्न करताना तिमिरबाबू माझ्याकडे पहात होता, पण तो विचारीत होता देवकीला हें सहज समजण्यासारखं होतं. तिनं गोंधळल्यासारखी चर्या करून माझ्याकडे पाहिलं. मीं तिमिरबाबूला म्हटलं,

" भेट काय वाटेल तेव्हां. तुम्ही असं का करीत नाहीं ? आज सर्कस पाहायला कां येत नाहीं ? असाल तर मिळूनच जाऊं आपण. तुम्ही पाहिला नसेल आमचा खेळ अजून. "

तिमिरबाबूचा लठ्ठ सोबती म्हणाला, " तें का ? दोनदां पाहिला आहे, तुमचं घोड्यावरचं काम फार फार आवडलं आम्हांला. "

मीं म्हटलं, " मग आज पुन्हां पहा तर. काय देवकी, यांना आग्रह कर कीं."

तिनं मान खालीं घातली. आम्ही मोठ्यांदा हसलों. आणि मग सारे मिळूनच हॉटेलच्या बाहेर पडलों.

नंतरच्या आठवड्यात तिमिरबाबू दोनदां तंबूवर आला. त्याचा लठ्ठ सोबतीहि त्याच्याबरोबर होता. पण मग तो आपल्या सोबत्यावांचून एकटाच येऊं लागला. त्याचं तें वारंवार येणं मला साहजिक वाटे. त्याच्या जन्मगांवांतली एक मुलगी त्याला भेटली होती, तिला कोणीहि उरलेलं नाहीं हें त्याला कळलं होतं, तो स्वतःहि एकटेपणाचं दुःख मनांत वागवीत होता. तिला वरचेवर भेटावं असं त्याला वाटणं साहाजिकच होतं. तिला शक्य तेवढा आनंद देण्याचा त्यानं प्रयत्न करावा हें मला समजत होतं तो एकट्या देवकीशीं, बोलण्याची धडपड कधीं करीत नसे. माझ्यावांचून देवकी एकटीच बाहेर कधीं जाणार नाहीं ही गोष्ट त्यानं आपणहून ओळखली होती कीं देवकीनं त्याला तसं स्पष्ट सांगितलं होतं तें मला कळलं नाहीं, पण बाहेर कुठें जाण्याची गोष्ट काढायची झाली तरी तो मला विचारी, आणि मला आणि देवकीला मिळून घेऊन जाई. अशा प्रकारें आम्हाला घेऊन जाऊन त्यानं पुष्कळ गोष्टी दाखविल्या. आम्ही त्याच्याबरोबर खूप हिंडत असूं. त्यानं आम्हांला बडं दफ्तर दाखविलं, एके दिवशीं पार्लमेंटच्या बैठकीला नेलं, आणि ' पालम 'च्या बड्या विमानतळावर नेऊन एका खूप मोठ्या विमानाच्या आंतला थाटामाट देखील त्यानं आम्हांला दाखविला. आमचं हें एकत्र हिंडणं जसं वारंवार होऊं लागलं तशा मधुबानीच्या आठवणी त्याच्या आणि देवकीच्या बोलण्यांत कमी कमी येऊं लागल्या. जणूं पूर्वीच्या आयुष्याबद्दल अन् त्यांतल्या दुःखाबद्दल त्यांनीं पोटभर बोलून घेतलं होतं, आणि आतां ती दोघं चालू घटकेचाच विचार जास्त करीत होतीं. तिमिरबाबूचा कुरूपपणा पाहून पहिल्या भेटींत माझा त्याच्याविषयीं जरा वाईट ग्रह झाला होता. पण आतां त्याचं बोलणं, चालणं, विचार, स्वभाव इत्यादि गोष्टी मला जास्त कळल्यावर माझा पहिला ग्रह दूर झाला. आमचा दिल्लीचा मुक्काम संपला कीं तिमिरबाबूची आमची फारकत होणार होती या विचाराचं देवकीला तर दुःख होत असेलच पण मलासुद्धां थोडसं होऊं लागलं.

एके दिवशीं तिमिरबाबू म्हणाला, “ उद्यां आमच्या सैन्याचा ‘टट्टू’ आहे. तुम्हां दोघांसाठीं मीं पास आणले आहेत. देवकी हंसली आणि म्हणाली, “ टट्टू ? म्हणजे काय हो ? ” -

“ टट्टूचं बंगाली भाषांतर काय करतां येईल कुणास ठाऊक ? ” तिमिरबाबू हंसून म्हणाला, “ हिंदुस्तानींत टट्टूच म्हणतात. टट्टू म्हणजे काय तें कसं सांगूं ? एक तऱ्हेची कवायत म्हणेनास ”

ती म्हणाली, “ मग कवायतींत पहाण्यासारखं काय असणार ? नुसतं लेफ्ट राईट करीत सैनिक मागं पुढें चालणार. त्यांत काय पाहायचं ? ”

“ चुकतेस तूं. ” तिमिरबाबू म्हणाला आणि टट्टूच्या कार्यक्रमांत काय काय असतं त्याचं त्यानं सविस्तर वर्णन केलं.

तें ऐकल्यावर देवकी मला म्हणाली, “ इतकी गंमत असेल तर जाऊं या. ”

मीं म्हटलं, “ पण टट्टू रात्रीं आहे. मला कसं येतां येणार ? ”

ती चटकन् म्हणाली, “ मग नको. ”

तिचं तें ‘ नको ’ म्हणणं मला फार आवडलं. कुठेंहि एकटं जाण्याची तिची इच्छा नव्हती. पण माझ्या मनांत आलं, इतका सुंदर कार्यक्रम पाहण्याची संधि तिला मीं मिळूं देऊं नये हें काहीं बरं नाहीं. माझ्यावर मीं तिला इतकं काय अवलंबून ठेवावं ? जाईना ती एक दिवस एकटी...मीं म्हटलं, “ मग नको असं कां म्हणतेस ? मला येतां येणार नाहीं म्हणून तूंहि जाऊं नयेस असं थोडंच आहे ? तूं जा. तिमिरबाबू, हिला घेऊन जा तुम्ही. ”

“ छे छे, मी नाहीं जाणार. ” असं म्हणतांना तिनं असा कांहीं अभिनय केला कीं जणूं तिला आत्ताच कुणी तरी ओढून नेत होतं.

मला आणि तिमिरबाबूला दोघांनाहि हंसू आलं. मीं तिला म्हटलं, “ मूर्ख-पणा करूं नकोस. तिमिरबाबू, उद्यां रात्रीं हिला तुम्ही घेऊन जा. ”

माझी खरोखर मनापासूनची इच्छा होती कीं तिनं जावं. म्हणून दुसरें दिवशीं संध्याकाळीं मीं तिला पुन्हां आग्रह केला, अगदीं उत्तमांतला उत्तम पोशाख तिला करायला लावला, आणि तिमिरबाबूबरोबर तिची रवानगी केली. रात्रीं तिला घेऊन तिमिरबाबू परत आला तेव्हां आमचा सर्कसचा खेळ

नुकताच संपला होता. तिमिरबाबूच्या मोटारींतून ती खालीं उतरली तेव्हां मीं तिला विचारलं, " टट्टू आवडला कीं नाहीं तुला ? "

तिनं मला धड उत्तर दिलं नाहीं. ती मावशीच्या राहुटीकडे निघून गेली. तिमिरबाबूदेखील माझ्याशीं एक दोन वाक्यंच बोलला आणि निघून गेला. इतका अस्वस्थ तो पूर्वी कधीं मला दिसला नव्हता. देवकीचं आणि त्याचं दोघांचंहि वागणं मला चमत्कारिक वाटलं. जणूं तीं दोघंहि माझ्यावर रागावली होतीं. त्याच्या त्या वागण्याची संगति मला लावतां येईना.

दुसऱ्या दिवशीं तिमिरबाबू आला नाहीं. देवकी माझ्याशीं अशा रीतीनं वागत होती कीं जणूं तिनं माझा कांहीं तरी अपराध केला होता, तो मला कळला तर मी तिच्यावर रागावेन, असं भय तिला वाटत होतं, माझ्यापुढें उभं राहणं तिला नको होतं. मी तिला पुनःपुन्हां विचारीत होतों, " काय, झालंय काय ? " " कांहीं नाहीं. " एवढ्या उत्तरापलीकडे तिच्या तोंडून शब्द निघत नव्हता. रविवारचा तो दिवस तसाच निघून गेला.

सोमवारीं तिमिरबाबू माझ्या राहुटींत आला व म्हणाला, " तुमच्याशीं एका महत्त्वाच्या गोष्टीसंबंधीं बोलायचं आहे. "

कॉटवरच्या गादीवर मीं थाप मारली अन् म्हटलं, " बसा. " माझ्या शेजारीं तो बसला पण चटकन् बोलेना म्हणून मीं म्हटलं, " काय बोलायचं आहे ? बोला. "

तो म्हणाला, " प्रस्तावना करीत नाहीं. जें विचारायचं तें सरळ एकदम विचारतों. "

तो सरळ एकदम काय विचारणार त्याची मला कल्पना करतां येईना. म्हणून मीं म्हटलं, " हां, तसं केलेलं कांहीं वाईट नाहीं. "

त्यानं घसा साफ केला आणि विचारलं, " देवकी मला मिळेल काय ? "

" काय ! " मी एकदम आश्चर्याचा उद्गार काढला.

" तुम्हांला आश्चर्य वाटणं साहजिक आहे. " तो म्हणाला. " पण देवकीशीं लग्न करण्याची माझी इच्छा आहे. माझं तिच्यावर प्रेम जडलेलं आहे. "

मीं विचारलं, " आणि तिचं ? "

" तिचंहि माझ्यावर आहे असं वाटतं. " तो म्हणाला. " पण ती म्हणते तिचे मालक तुम्ही आहांत, आणि तुम्ही तिचा हात माझ्या हातीं दिला तरच— "

मी कॉटवरून उठलों, राहुटी बाहेर गेलों, आणि एक नोकर धांवत जातांना दिसला त्याला म्हटलं, " यशोदा मावशीच्या राहुटींत जा अन् देवकीला म्हणावं, असशील तशी माझ्याकडे ये. " मी आपल्या कॉटकडे परत आलों, बसलों पण कांहीं बोललों नाहीं. तिमिरबाबूहि स्तब्ध बसून राहिला.

माझा निरोप देवकीला समजेल व ती माझ्या राहुटींत येईल म्हणून मी वाट पहात बसलों मनांतल्या उसळीबरोबर मीं तिला बोलावणं धाडलं होतं खरं. परंतु आल्यानंतर मी तिला काय म्हणणार होतों अगर तिमिरबाबूशीं काय बोलणार होतों त्याची मला स्पष्ट कल्पना नव्हती. विलक्षण आश्चर्याचा एक अनपेक्षित धक्का मला बसला होता. ज्या गोष्टीचं आश्चर्य वाटत होतं त्या गोष्टीचा संतापहि आला होता. पण मनांतल्या विचारांना स्पष्टपणा येण्याऐवजीं त्यांची गुंतागुंतच झाल्यासारखी वाटत होती. कुव्यांतल्या संथ, स्वच्छ पाण्यांत मातीचं मोठं ढेकूळ टाकलं कीं पाण्याला नुसता धक्काच बसत नाहीं, तें पार गढूळ होऊन जातं आणि त्या खालच्या वस्तू पूर्वीसारख्या दिसेनाशा होतात, तशी माझ्या मनाची अवस्था झाली होती...तिमिरबाबूकडे मी पहात नव्हतों. परंतु डोळ्यांच्या सहाय्यावांचून तो मला दिसत होता. किती कुरूप होता तो. डोक्यावरचं तें टक्कल, तोंडावरचे देवीचे वण, आणि तें कांहींसं तोतरं बोलणं. देवकीवर प्रेम करण्याचा त्याला कोणता अधिकार होता ? आणि देवकीचं याच्यावर प्रेम होतं ! आतां या आश्चर्याला काय म्हणावं ?...तिचं प्रेम याच्यावर बसूं शकलं तरी कसं ?...या प्रश्नाचा भयंकर चमत्कार मला क्षणभर वाटला. पण नंतर माझं मलाच वाटलं कीं हें बरोबर आहे. देवकी मला देवासमान, जन्मदात्या आईबापासमान समजत होती, आणि या समजुतीमुळेंच जी भावना तिच्याकडून मला हवी होती ती तिच्या मनांत उत्पन्न होणं अशक्य झालं होतं. मुलीला बाप आवडतो, त्याच्याविषयीं अगदीं दृढ निष्ठा तिच्या ठिकाणीं असते.

तो सांगेल तें करायला तिची तयारी असते. पण मुलगी आपल्या बापाची प्रेयसी कशी होऊं शकेल ? देवाविषयीं माणसाला भक्ति वाटेल. तो देवाची पूजा करील. भक्तीची पराकाष्ठा झाली तर प्राण अर्पण करील; पण देवाला प्रियकर समजून त्याला प्रेम देणं कसं शक्य आहे ?...देवकी मला आपला धनी समजत होती, जन्मदाता, देव समजत होती. आणि यामुळेंच तिच्यावर मीं कितीहि प्रेम केलं तरी त्याचा उलट जबाब ती देऊं शकत नव्हती !... उलट हा तिमिरबाबू कुरूप होता. पण त्याच्या रूपाकडे देवकी पहात नव्हती. तो तिच्या गांवचा होता, तिच्या जगांतूनच आलेला होता, या एकाच विचारानं तिला एक प्रकारचा आंधळेपणा आला होता. आणि तिला तो आवडला होता. त्याचं प्रेम तिला स्वीकारावसं वाटलं होतं. तिचा आंधळेपणा दुहेरी होता. माझं प्रेम तिला दिसत नव्हतं, या तिमिरबाबूचं रूप तिला दिसत नव्हतं. माझ्याविषयींच्या गाढ आदरानं ओथंबलेल्या तिच्या मनांत इष्काचं बीज रुजूं शकत नव्हतं. उलट तिमिरबाबू तिच्या जगांतला, तिच्या गांवचा होता, या जाणिवेंतून सहज उत्पन्न झालेल्या जिव्हाळ्यानं भिजलेल्या तिच्या मनांत त्याच्या रूपाची अप्रीति उगवूंच शकत नव्हती...

एखाद्या कूटप्रश्नाचं उत्तर क्षणांत झरकन् माणसाच्या डोळ्यांपुढें उभं रहावं त्याप्रमाणं हे सारे विचार माझ्या मनांत वेगानं येऊन गेले. त्या विचाराबरोबरच निराशेची जखम झाली, संतापाची उसळी आली, वैतागाची लहर अंगभर उठली !...देवकीला मी खुशाल हातची जाऊं देऊं ? कां म्हणून ? असं कां म्हणून ?...पण माझं दुसरं मन म्हणालं, तिला जाऊं न देण्याचा, आपल्याजवळ ठेवून घेण्याचा हट्ट करून तूं काय मिळविणार आहेस ? देवकी तुझ्यावर कधीं प्रेम करील अशी मूर्ख आशा अजून तुला वाटते ? नाहीं ना ? मग देवकीला ठेवून घेण्याचा हट्ट कशासाठीं करणार आहेस ? तिच्या आयुष्याचा नाश करायचा आहे तुला ?...

मी आणि तिमिरबाबू एकमेकांशेजारीं अगदीं स्तब्ध बसलों होतों. त्याच्याकडे मी पहात नव्हतों. त्याच्या मनांत त्याक्षणीं कोणते विचार येत होते त्याची मला कल्पना नव्हती आणि त्याच्या विचारांशीं मला काय करायचं होतं ?

माझ्या मनांत मात्र उलट सुलट विचारांचं थैमान चाललं होतं. त्या विचारांशीं मी झगडत होतों. मीं अखेर कोणता निर्णय घेणार आहे तें माझं मलाच कळत नव्हतं.

तितक्यांत देवकी आली तिच्या मागोमाग मावशीहि आलेली दिसली. कसल्या तरी कामासाठीं म्हणून काका माझ्या राहुटींत आले. त्यांच्याबरोबर मालकहि आलेले मला दिसले. मीं मनाशीं म्हटलं हरकत नाहीं, या साऱ्यांच्या देखतच काय व्हायचं असेल तें होऊन जाईल.

तिमिरबाबू माझ्या शेजारीं बसलेला पाहून देवकी थोडीशी चपापली असं मला वाटलं. त्याच्यांत व तिच्यांत काय परस्पर समजूत ठरली होती कोण जाणे ? पण तो आलेला असेल अशी तिची अपेक्षा नसल्याप्रमाणें ती दचकली. इतकंच नव्हे तर माझ्यापुढून एकदम निघून जाण्याचा विचार तिच्या मनांत आल्याप्रमाणें तिनं राहुटीच्या दाराकडे बघितलं. तिच्या नजरेंतली ती चलबिचल आणि तिच्या पावलांची हालचाल पाहून मीं म्हटलं,

" देवकी, जाऊं नकोस. हे तिमिरबाबू काय म्हणतात ? "

तिनं एकदम मावशीच्या अंगाला धरल्यासारखं केलं आणि ती थरथर कांपू लागली.

मीं म्हटलं, " देवकी, मी तुझ्यावर रागावलों आहे असं समजूं नकोस. तुझ्या मनांत काय आहे तें स्वच्छ सांग. "

पण तिनं मावशीच्या कुशीवर डोकं ठेवलं आणि ती रडूं लागली.

तिच्या तोंडून एकहि शब्द निघत नव्हता, पण धरणीकंपाच्या हादऱ्यानं मोठमोठे कडे कोसळावे त्याप्रमाणें तिच्या एकेका हालचालीकडे पाहतांच माझ्या मनांतले कठोर विचार ढांसळत होते. आणि आजूबाजूच्या कपाऱ्या निखळल्यावर एकच सुळका शिल्लक रहावा त्याप्रमाणें एकच विचार उरला होता. देवकीचं आणि माझं जग निराळं होतं ! तिला मी माझ्या जगांत हट्टानं आणूंच शकत नव्हतों. प्रत्येकाचं आयुष्य वेगवेगळ्या मार्गानं आंखलेलं असतं. त्या मार्गानं त्या त्या माणसाला जाऊं द्यावं हेंच बरं ! त्यांतच त्याचं सुख आहे !...

मी तिमिरबाबूकडे वळलों व म्हटलं, " देवकी कांहीं बोलायची नाहीं.

तुम्हीच सांगा. मघाशीं जें सांगितलंत तें पुन्हां सांगा. या साऱ्या मंडळींना कळायला हवंच सगळं" मावशी, काका, मालक या तिघांकडे पाहून मीं म्हटलं, "हे काय म्हणतात ऐका."

तिमिरबाबू बोलूं लागला. कॉनॉट सर्कसवरच्या हॉटेलमध्यें त्यानं देवकीला प्रथम पाहिली तेव्हांपासूनच्या सगळ्या हकीगती त्यानं सांगितल्या. तिच्यावर त्यानं कसं प्रेम केलं तें सांगितलं. देवकी त्याच्याशीं कशी वागली होती त्याचंहि त्यानं वर्णन केलं. दोन दिवसांपूर्वी रात्रीं 'टट्टू' च्या वेळेस त्यानं आपलं प्रेम तिच्याजवळ बोलून दाखविलं होतं व तिच्याशीं लग्न करण्याची इच्छा सांगितली होती. तिनं होय म्हटलं नव्हतं, पण नाहीं देखील म्हटलं नव्हतं. ती फक्त म्हणाली होती, तुम्ही गोपालला विचारा. मी त्यांची आहे. ते माझे धनी आहेत. त्यांनीं मला साडेसातशें रुपयांना घेतलेली आहे...

"म्हणून मी आतां तुमच्याकडे आलों आहे" तिमिरबाबू मला म्हणाला, "देवकिवर तुमचे किती उपकार झाले आहेत ते तिनं मला सांगितलं आहे. त्यांची कधीं फेड होणं तर शक्यच नाहीं पण जें मला करतां येण्यासारखं आहे तें मी करणार आहे" त्यानं खिशांत हात घालून नोटांचं पुडकं बाहेर काढलं व म्हटलं, "तुमच्या पैशाची भरपाई समजा, हुंडा समजा, कांहींहि समजा, हे दीड हजार रुपये घ्या आणि मी देवकीला मागणी घालतों ती मान्य करा. देवकीला मी सुखी—"

पण त्याक्षणींची माझी नजर पाहिल्यामुळें त्याच्या तोंडांतून पुढचे शब्द बाहेर पडले नाहींत. माझी नजर फार चमत्कारिक झाली असावी.

कारण मला वाटत होतं आवाज उंच करून ओरडून त्यालाच नव्हे तर मावशीला, काकांना, मालकांना सांगावं, देवकीचा प्रतिपाळ करणारा, तिचा हितकर्ता एवढंच तिचं माझं नातं तुम्ही समजतां काय ? तिच्याविषयीं मला जें प्रेम वाटतं तें तुम्हाला दिसत नाहीं ? तें आजपर्यंत मीं तुम्हांला कधीं दिसूं दिलं नाहीं. पण आतां माझं अंतःकरण फाटलेलं आहे, त्यांतूनहि तें तुम्हांला दिसत नाहीं ? तुम्ही आंधळे असाल तर मी सांगतों तुम्हांला, या देवकीवर माझं फार प्रेम आहे. ती माझी लाडकी आहे. मला ती हवी आहे. उरलेल्या

आयुष्याची वाट तिच्या हातांत हात घालून चालण्याचीं स्वप्नं मीं रंगविलीं आहेत. मला सोडून ती निघून जाईल तर जगण्यासारखं माझ्या आयुष्यांत काय राहिलं ?...आणि उपकारांची ही भाषा किती वेडेपणाची आणि गलिच्छ, देवकीसाठीं मीं जें कांहीं केलं त्याचं मोजमाप पैशानं होण्यासारखं आहे काय ? देवकीवर मीं उपकार केले नव्हते. माझा दिल तिला दिला होता. ती आतां गेली तर माझ्या अंतःकरणाचे तुकडे तुकडे होणार होते ! ते कोण सांधणार होतं ? या कागदी नोटांच्या चिटोऱ्यांनीं अंतःकरणाची जखम बुजणार होती काय ?... अरे तिमिरबाबू, माझ्यापुढें या नोटा कसल्या धरतोस ? माझी चेष्टा करतोस काय ? माझ्या प्रेमाची विटंबना करतोस काय ?...

मीं आपला सारा संताप आवरला होता, पण विटंबनेची चीड मला आवरतां येत नव्हती. मीं अगदीं तिरस्कारानं तिमिरबाबूकडे पाहिलं, त्याच्या हातांतल्या नोटांवर फाडकन् हात मारला, ते कागद इकडे तिकडे उडाले ! तिमिरबाबूची चर्या भयभीत झाली...

मी हळूंच देवकीजवळ गेलों, तिला मावशीपासून ओढून जवळ घेतलं, तिच्या केसांवरून हात फिरवीत मी तिला म्हणालों, " देवकी, तिमिरबाबूबरोबर जायचं आहे ना तुला ? "

यापूर्वीं कुणाच्या देखत मीं तिला अशी जवळ घेतली नव्हती. तिनं गोंधळून माझ्याकडे पाहिलं, पण माझ्या स्पर्शातील ममता तिला कळली असावी. ममतेचा स्पर्श झाला कीं जनावर आपलं अंग देतं तसं तिनं आपलं डोकं माझ्या कुरवाळणाऱ्या हाताला घासलं. ती हळूंच म्हणाली, " तुम्ही सांगाल तें मी करीन ! मी तुमची आहे. "

'मी तुमची आहे !' किती निराळ्या अर्थानं भरलेल्या त्या शब्दांची भूक मला होती ! आणि किती वेगळ्या अर्थानं ते मला ऐकावे लागत होते !... पण आतां माझ्या मनाची पूर्ण तयारी झाली होती. देवकी मला ' धनी, पिता, देव ' समजत होती. ठीक आहे. तीच भूमिका पत्करून मला तिच्या आयुष्याचा मार्ग तिला मोकळा करून द्यायचा होता. तिचं जग आणि माझं जग वेगवेगळं होतं...

मीं तिला म्हटलं, " देवकी, तूं तिमिरबाबूबरोबर जावंस असं मला वाटतं. तूं जा. "

माझे हे शब्द ऐकतांना ती मान किंचित् वर करून माझ्याकडे पहात होती. मी बोलायचा थांबलों हें क्षणभर तिच्या लक्षांत आलं नाहीं. मीं आणखी बोलेन या अपेक्षेनं तिची मान तशीच राहिली. म्हणून मीं पुन्हां म्हटलं, " जा, सुखांत रहा !" ते शब्द ऐकतांच तिच्या पापण्या थरथरल्या. तिनं डोकं चटकन् खालीं केलं, आणि माझ्या छातीवर टेकलं, आणि आपल्या दोन्ही हातांचा विळखा तिनं मला घातला. तिला हुंदका आला.

मीं डाव्या हाताच्या तळव्यानं तिचं कपाळ मागं लोटलं, आणि मान खालीं करून मी तिला म्हणणार होतों, " वेड्यासारखं रडतेस काय ? " पण मला ते शब्द उच्चारतां आले नाहींत. तिनं चटकन् टांचा उंच केल्या आणि माझा मुका घेतला !

' मी तुमची आहे ' असे शब्द तिच्या तोंडांतून निघालेले ऐकावे म्हणून मी किती दिवस थांबलों होतों. अखेर ते शब्द मीं आज ऐकले होते ! पण त्यांत मला हवा तो अर्थ कुठें होता ?...तिच्या ओंठांचा स्पर्श व्हावा म्हणून माझ्या जिवाला आज किती दिवस तरी तीव्र ओढ लागलेली होती. तो स्पर्शहि आज झाला होता. पण त्यात मला हवं तें अमृत कुठं होतं ?...

● ● ●

# १

तें पत्र वाचल्याबरोबर मी जरा चिंतेंतच पडलों. एरवीं अशा पत्रानं मला आनंद झाला असता, परंतु आज तें आलं नसतं तर बरं झालं असतं असं मला वाटलं. अर्थात् ज्यानं तें पत्र आणलं होतं त्याला माझी चिंता मीं दिसूं दिली नाहीं. आनंदल्यासारखा चेहरा करून मीं म्हटलं. " वा वा ! फार आनंदाची गोष्ट आहे ! " इतकंच नव्हे तर चटकन् नोट-पेपर काढला, " आपण येणार हें समजल्यानं फार संतोष झाला, आपण आपल्या मित्रमंडळीं-सह अवश्य यावें. आम्ही आपल्या स्वागतासाठीं दारावर उभे असूं " असा मजकूर लिहिला, आणि कागद पाकिटांत घालून ज्यानं पत्र आणलं होतं त्याच्या हातीं तें पाकीट दिलं. तो माणूस गेल्यावर मात्र मी पुन्हां सचिंत झालों.

कॅबिनेटमधील एका मंत्र्यांचं तें पत्र होतं. ते आजच्या रात्रीच्या खेळाला येणार होते. बाकीचे बहुतेक मंत्री एकेकदां येऊन गेले होते. हेच तेवढे यायचे राहिले होते. त्यांना आजपर्यंत सवड झाली नव्हती. आज ते सवड काढून येणार होते. आणि नेमकी आजच एक अडचण उपस्थित झाली होती.

आमच्या खेळांतलं सगळ्यांत मोठं आकर्षण, सगळ्यांत लोकप्रिय झालेला नंबर आज होईल कीं नाहीं याची शंका होती. संध्याकाळच्या पहिल्या खेळांत तो नंबर गाळावा लागला होता. राजा घोड्यावरचं गोपालचं काम होऊं शकलं नव्हतं. संध्याकाळचा खेळ सुरू होण्याच्या आधीं मीं जेव्हां चक्कर मारली होती तेव्हां गांगुली आपल्या राहुटी बाहेर उभा असलेला मला दिसला होता. मला पाहातांच तो पुढें आला होता, व एखाद्या अपराध्याप्रमाणें खालीं मान घालून म्हणाला होता, " काका, माझ्यावर रागावूं नका. "

मीं विचारलं होतं, " काय झालं? "

" आत्तांच्या संध्याकाळच्या खेळांत आपला नंबर करण्याच्या स्थितींत गोपाल नाहीं. आणि तो नाहीं याला मी थोडासा जबाबदार आहे. मी तुमची क्षमा मागतों. "

" म्हणजे काय म्हणतोस ? नीट सारं सांग तरी. "

त्यानं मग सारी हकीगत सांगितली होती. दुपारीं गोपाल त्याच्याकडे गेला होता आणि म्हणाला होता, " गांगुली, मला दारू प्यायची आहे " तें ऐकून गांगुली थक्कच झाला होता. गोपाल त्याला म्हणाला होता, " दारू दुःखाचा विसर पाडते. तुझ्याजवळ असेल तेवढी दे मला. तुझा आग्रह आजपर्यंत मीं मानला नाहीं. तूं वाईट मनुष्य आहेस आणि तुझ्या नादानं मीं बिघडेन अशा विचारानं मीं तुझा तिरस्कारसुद्धां केला होता. पण आतां मी तुझा चेला व्हायला तयार आहे. तूं माझा गुरु आहेस. दारू प्यायला दे. अन् थोडी देऊं नकोस, असेल तेवढी दे. मला बेशुद्ध होऊन पडायचं आहे... " गांगुलीला त्या गोष्टीचा चमत्कार वाटला होता. गोपालला कोणत्या गोष्टीचं एवढं भयंकर दुःख झालं त्याची त्याला कल्पना नव्हती. पण त्याची चर्या मात्र गांगुलीला अशी दिसली होती कीं जणूं कसल्या तरी ओझ्याखालीं त्याचं मन वांकून पिचून गेलं होतं. त्याला वाटलं होतं, एखाद दुसरा पेग घेतला कीं गोपाल पुरे म्हणेल. जास्ती घेणं त्याला सोसायचंच नाहीं. पण गोपालनं घेण्याचा सपाटाच सुरू केला होता. घेतांना तो गांगुलीशीं कांहीं एक बोलला नव्हता. एक घोट तो घेई, डोळे मिटून डोकं धरून तो बसे, पुन्हां पीत

असे, पुन्हां डोकं धरून बसे. अखेर त्याच्यानं बसलं रहावेना. तो कॉटवर आडवा झाला होता. गांगुलीनं त्याला त्याच्या राहुटींत नेऊन अंथरुणावर निजविलं होतं... " मीं कुठून त्याला दारू दिली असं मला झालंय ? " गांगुली म्हणाला होता, " पण तो अशी घेत सुटेल हें मला काय माहीत ? अशा कोणत्या दुःखाचा तडाखा त्याला बसला आहे त्याची मला कल्पना करतां येत नाहीं. "

मला त्याची कल्पना होती. देवकीच्या जाण्याचं केवढं दुःख गोपालला झालं असावं त्याचा तर्क मला करतां येत होता. त्याचं देवकीवर प्रेम जडलं होतं, हें समजण्या इतके माझे डोळे उघडे होते. " जा. सुखांत रहा ! " असं म्हणून देवकीला निरोप देतांना गोपालच्या अंतःकरणाला केवढा दुःखाचा पीळ पडला असेल त्याची कल्पना मला करतां येत होती. सकाळीं माझ्यादेखत घडलेल्या त्या नाट्यपूर्ण प्रकारानं मी थोडासा भांबावूनच गेलों होतों. गोपालच्या मनाचा तोल आतां कसा काय राहील याची शंका मला वाटलीच होती. पण तो असं कांहीं करील हें मात्र माझ्या ध्यानींमनीं नव्हतं...

पण मनांतलं आश्चर्य न दाखवितां मीं गांगुलीला म्हटलं होतं, " ठीक आहे. तूं मला सांगितलंस हें बरं झालं. तूं जा आतां आपल्या कामाला. " मग मी यशोदा मावशीला घेऊन गोपालच्या राहुटींत गेलों होतों.

आणि आता एका मंत्री महाशयांचा मला निरोप आला होता, 'आम्ही रात्रीच्या खेळाला येणार आहोंत.' अवश्य या, असा उलट निरोप मीं पाठविला होता खरा, परंतु माझं मन सचिंत झालं होतं. गोपालचा नंबर त्यांना दाखवितां येणार नाहीं अशी भीति मला वाटत होती. खेळाच्या आधीं नेहमींप्रमाणें नंबराची पाटी मीं लावली. त्यांत राजा–गोपालचा नंबर मीं गाळलाच होता. पण आतां मनांत आलं, गोपालला जरा बरं वाटत असेल तर पाहूं या. आजच्या खेळाला येणाऱ्या बड्या पाहुण्यांना त्याचा नंबर दाखवितां आला तर चांगलं. मी उठलों आणि गोपालच्या राहुटीकडे निघालों.

संध्याकाळचा खेळ होऊन गेला होता. रात्रीच्या खेळाला अजून अवकाश होता. या मधल्या वेळांत आमच्या सर्कसच्या जगांतील वातावरण चमत्कारिक

असतं. धड शांतता नसते, धंड गडबड नसते. पहिल्या खेळांतलीं आपापलीं कामं पार पाडून जनावरं आपल्या जागीं परत आलेलीं असतात, पण रोजच्या संवयीनं त्यांना माहीत झालेलं असतं कीं अजून एकदां रंगणांत जायचं आहे. या जाणिवेनं आपापल्या जागीं तीं उभीं असतात, ही गोष्ट त्यांच्या हालचालींवरून तिऱ्हाइताला कळायची नाहीं पण आम्हांला समजते. नाटकांतल्या दोन अंकांच्या मधल्या वेळांत तात्पुरती विश्रांति घेणाऱ्या नटांप्रमाणेंच सर्कसमधले खेळाडू हा मधला वेळ काढीत असतात. फरक इतकाच कीं आमच्या खेळाडूंना मिळणारी ही सुट्टी मोठी असते व त्यामुळें ते सहसा आवारांत इकडे तिकडे रेंगाळत असलेले दिसण्याऐवजीं आपापल्या राहुट्यांत अदृश्य झालेले असतात. बॅंड वाजवणारीं माणसं क्वचित् एकमेकांशीं चकाट्या पिटीत आणि विड्या ओढीत बसलेलीं आढळतात. ड्रमवाला आपल्या वाद्यावर टिपऱ्यांचा हलकेंच चाळा करीत असतो. क्लॅरिओनेटवाला एखादी तान घटवीत असतो. आवारांतल्या साऱ्या बत्त्यांत पुन्हां हवा भरण्यासाठीं बत्ती-कामगार पंप घेऊन हिंडत असतो. तंबूंत शुकशुकाट असतो आणि त्यामुळें तंबूचा विस्तार वाजवीपेक्षां जास्त असल्याचा भास होतो. तारांच्या मेखा पक्क्या करण्यासाठीं कुणी त्यावर हातोड्याचे घाव मारीत असतात. रंगणांतली उस्कटलेली माती दाबून सिंगलबारच्या पहिल्या नंबरासाठीं गवताची जाड गादी आणि सतरंजी अंथरण्यांत नोकर गुंतलेले दिसतात. तिकीटविक्रीच्या झोंपडींत तिकीटं विकणारीं माणसं जाऊन बसलेलीं असतात. प्रेक्षकांची वर्दळ सुरूं व्हायला अजून अवकाश असतो, पण क्वचित् कुणी खेडुत म्हणा, कामकरी म्हणा, खिडकीशीं येऊन उभे असतात व तिकिटांच्या दरांची चौकशी करीत असतात. रिकामटेकड्या पोरांसोरांची आणि मवाल्यांची सर्कसच्या प्रवेशद्वारापाशीं गर्दी नाहीं अशी घटका सहसा नसतेच, पण या मधल्या वेळेस ती गर्दीदेखील जरा रोडावलेलीच असते...

नेहमींप्रमाणेंच आजहि हें वातावरण आवारांत पसरलेलं होतं. थंडीचा ऐन कडाका आतां संपला होता. शिशिर-ऋतूनं आतां आपला मुक्काम हालविला होता, व त्यानं खालीं केलेली जागा वसंत-ऋतु हलके हलके ताब्यांत

घेऊं लागला होता. दिव्या भोंवतालचीं धुक्याचीं वलयं आतां नाहींशीं झालीं होतीं. हिंवाळ्यांतल्या दिवसांत दिव्याभोंवतीं वांकड्या तिकड्या गिरक्या घेणारे हिरवे-पिवळे किडे आतां दिसत नव्हते. हवा अधिक विरळ वाटत होती. वाऱ्याची झुळूक हलकेंच येत होती, तिचा सुखकारक स्पर्श हवासा वाटत होता. मीं वर पाहिलं तों आभाळांत चंद्र नव्हता...मी गोपालच्या राहुटीच्या दिशेनं पावलं टाकीत होतों. चार्ली शिटी घालीत समोरून आला. मला पाहा-तांच त्यानं शिटी थांबविली आणि 'गुड् ईव्हिनिंग' म्हटलं. माझ्या अंगावरून जातांना त्यानं थबकून विचारलं, "गोपाल काय, आजारी आहे काय?" मीं फक्त "हूं" म्हटलं. तो म्हणाला, "आज सबंध दिवसांत गोपालची भेट नाहीं त्यामुळें त्याचं घोडं अस्वस्थ झालं आहे." त्याची ती बातमी मीं ऐकली न ऐकलीसं केलं आणि पुढें गेलों.

मी गोपालच्या राहुटींत शिरलों, आणि तो कॉटवर बसलेला दिसल्या-बरोबर माझा जीव एकदम भांड्यांत पडला. त्यानं जी गोष्ट दुपारीं केली होती तिच्या जाणीवेनं त्यानं माझ्या नजरेला नजर दिली नाहीं. परंतु त्याला शर-मिंधा करण्याची माझी बिलकुल इच्छा नव्हती. मी त्याच्या जवळ गेलों, त्याचे केस कुस्करले, आणि "ऑल राईट?" असं विचारतांना असा कांहीं हंसलों कीं त्याचा सारा संकोच नाहींसा व्हावा. त्यानं हंसून विचारलं,

"काका, संध्याकाळचा खेळ झाला सुद्धां?"

मीं आणखींच हंसून म्हटलं, "तर काय अजून राहिला आहे?"

तो म्हणाला, "मला उठविलं कां नाहींत?"

"तूं उठला असतास?"

"एक लाथ घालायची होतीत माझ्या कमरेंत. तुम्हांला इतका अधिकार खचित आहे."

मीं त्याचा हात हातांत घेतला आणि म्हटलं, "गोपाल, केवळ अधिकारानं आम्ही तुझ्याशीं कधीं वागलों आहोंत का? आज तुझ्या मनाची स्थिति कशी झाली आहे तें आम्हांला ओळखतां येत नाहीं असं तुला वाटतं?"

त्याला बरं वाटावं म्हणून मी हें बोललों. पण त्याचा परिणाम निराळाच झाला.

माझ्या शब्दांनीं त्याच्या अंतःकरणांतली कुठली तरी नाजुक तार छेडली गेली. तो म्हणाला,

" नाहीं काका, तुमची ही कल्पना मात्र चुकीची आहे. माझा दिल कसा फाटून गेला आहे तें कुणालाच कळणं शक्य नाहीं. देवकीला जाऊं देणं माझं कर्तव्यच होतं. त्यांत मी चुकलों नाहीं. याचं समाधान मला आहे. पण देवकीला निरोप देतांना...काका, मावशी. देवकी गेली हें मला अजून खरं वाटत नाहीं !...आतां ती मला कधीं दिसणार नाहीं ?... " बोलतां बोलतां त्याला हुंदका आला. माझ्या हातांतल्या त्याच्या हाताची मूठ वळली आणि त्याचीं मिटलेलीं बोटं थरथर कांपलीं..

पण मग एकदम वर मान करून तो म्हणाला, " जाना दो ! " आणि माझ्याकडे पाहून त्यानं सांगितलं, " काका, रात्रीच्या खेळांत मी नंबर करणार बरं का. मला कांहीं झालेलं नाहीं. अगदीं ' फिट् ' आहे. राजाच्या पाठीवर चढून कसरत केल्याखेरीज माझं मन ताळ्यावर यायचं नाहीं. तेंच माझं औषध! आणि तेवढंच आतां माझं सुख !... "

★ ★ ★

## २

गोपाल आपला नंबर करणार म्हणून मी आनंदांत होतों. पण कां कोण जाणें माझ्या मनांत खोल कुठें तरी एक चमत्कारिक शंका सलत होती. वाटत होतं, गोपालचा नंबर नेहमींप्रमाणें पार पडेल ना. माझी शंका मीं मालकां-जवळ किंवा मावशीजवळ बोलून दाखविली नव्हती. पण त्यांच्याहि मनांत ती असावी. कारण गोपालचा नंबर जवळ आला तेव्हां मालक दूर मागच्या दारांत उभे न राहतां रिंगच्या तोंडाशीं येऊन उभे राहिले. बायकांच्या गॅलरीच्या पायथ्याशीं रिंगला चिकटून मावशीहि येऊन उभी राहिली. दोघंहि माझ्याकडे वरचेवर पहात व नजर वळवीत. जणूं गोपालचा नंबर एकदां सुरक्षितपणें पार पाडला कीं सुटलों अशी चिंता त्यांच्याहि मनाला लागलेली होती. गोपालच्या नंबराच्या आधीं नेहमींप्रमाणें चिनी जादुगार आ चॉंग व त्याची जोडीदारीण इत्सू यांचा नंबर होता. तो एकाहून एक गमतीच्या जादू दाखवीत असे, आणि अखेर प्रेक्षकांपैकीं एखाद्याला रंगणांत बोलावीत असे. इत्सूच्या तोंडांत पांढऱ्या चिंध्यांचा बोळा त्याच्याकडून घालवीत असे, त्यावर अर्धा ग्लासभर तांबडा रंग त्याच्याकडून ओतवीत असे, मग तो त्याला म्हणत असे, " थँक यू.



१४....

आतां या पोरीच्या तोंडांत एका चिनी देवतेच्या आशीर्वादानं खूप मोठा तांबड्या लाल रिबनचा पट्टा तयार होणार आहे पहा. एक, दोन, तीन !" असं त्यानं म्हटल्यावर बॅंडमधलीं वाद्यं बंद होऊन फक्त टिपरी तेवढी चालू रहात असे. आ चॉंग इत्सूला रंगणाच्या मधोमध एका स्टुलावर उभी करीत असे, आणि तिच्या तोंडांतून रिबन ओढून काढी ती इतकी लांब असे कीं लोकांना वाटे ही आतां संपणार तरी केव्हां ? तिच्या तोंडांतून ओढून काढलेल्या रिबनचा ढीगच्या ढीग तिच्या पायांपाशीं सांठत असे, पण आ चॉंगचं तें रिबन उपसणं चालूंच असे. प्रेक्षक टाळ्यांचा कडकडाट करीत. अखेर रिबन संपत असे. आ चॉंग आणि इत्सू हास्य करीत माना झुकवून हात पसरून कुर्निसात करीत आणि धांवत निघून जात...

रोजच्या प्रमाणें आजहि हें सारं झालं. नोकर रंगणांत धांवले. आ चॉंगच्या जादूच्या प्रयोगांचं सारं साहित्य त्यांनीं उचलून झटपट नेलं, गालिचा काढून टाकला, रंगण मोकळं केलं, एक मिनिट मधें गेलं, बॅंडवर निराळी गत सुरू झाली ! 'ला ल ल्ला, ला ल ल्ला '– अशी दिडक्या चालीची ती गत होती. माझे आणि मालकाचे डोळे ज्या दारान खेळाडू प्रवेश करतात त्या दाराकडे वळले. गोपाल येत होता. राजा घोडा त्याच्या मागोमाग येत होता. मीं, मालकांनीं, आणि मावशीनं एकमेकांकडे पाहिलं, आणि खुणविलं, 'ठीक आहे.'

धोतर, अंगरखा, मुंडासं घातलेल्या ढेरपोट्या म्हाताऱ्या यात्रेकरूच्या सोंगांत, तोंडानं तुलसीदासाच्या दोहरा म्हणत, लटपटत, हातांतला दंडा जमिनीवर आपटीत गोपाल रंगणांत शिरला. त्याला चाचपीत, त्याच्या पाठीवर डोक्यानं ढुस्या दिल्याप्रमाणें करीत रुंद पुठ्याचा, तेजःपुंज कांतीचा, मोतिया रंगाचा राजा घोडा शिरला. दोघांना पाहातांच प्रेक्षकांनीं टाळ्या वाजविल्या. गोपाल मधोमध उभा राहिला; घोडा आपली झुपकेदार लांब शेपटी चौरीसारखी किंचित् ढाळीत, ऐटबाज मान मधून मधून झटकीत, आपल्या किंचित् गुलाबी नाकपुड्या फुगवून फुरफुर आवाज करीत रंगाळत वाटोळा फिरूं लागला. त्याच्यावर बसण्यासाठीं म्हणून यात्रेकरू म्हातारबुवा दंडा टेकीत दोन तीन वेळां त्याच्याजवळ गेले पण दर वेळेस घोड्यानं चमकल्याप्रमाणें त्यांच्यावर हल्ला

केला, आणि म्हातारबुवा घाबरून जाऊन रंगणाच्या मध्यभागींच्या आपल्या पूर्वस्थळीं परत आले. तुलसीदासाच्या दोहऱ्याचं त्याचं गायन तोंडानं चालूंच होतं. इतक्यांत सुटाबुटांतला, हातांत चाबूक घेतलेला एक रिंग-मास्तर रंगणांत आला. लहान मोठ्या वयाचे गलथान चमत्कारिक वेष केलेले, चित्रविचित्र रंगांनीं रंगलेले चार पांच विदूषक गाणीं गुणगुणत, शिट्या घालीत, हातांतल्या टोंकाशीं चिरलेल्या लांकडी फाट्याचे आवाज करीत रंगणांत जमा झाले. यात्रेकरू म्हातारबुवांनीं पुन्हां दोनदां घोड्यावर जाण्याचा प्रयत्न केला, घोड्यानं त्यांना हुंदाडलं, आणि अखेर तर त्यांना चावण्यासाठीं तो त्यांच्या मागेंच लागला. विदूषकांनीं वांकुल्या दाखविल्या फाट्या वाजविल्या, खूपच गिल्ला करून म्हातारबुवाची टर उडविली. खूष झालेल्या प्रेक्षकांनीं टाळ्या पिटल्या...

मी, मालक आणि मावशी हें सारं पहात होतों आणि वरचेवर एकमेकांना नजरेनं म्हणत होतों, ' ठीक चाललंय, नाहीं ? '

बँड बंद झाला, घोडा उभा राहिला. रिंग-मास्तर आणि यात्रेकरू म्हातारबुवा याचा संवाद सुरू झाला.

" हें घोडं तुमचं काय ? "

रिंग-मास्तर म्हणाला, " होय ! "

" बिलकुल खराब आहे घोडं. "

" कां हो ? "

" बसूं देत नाहीं. अन् चावतं. हें काय घोडं कीं गाढव ? "

चार आणेवाल्या जमिनीच्या प्रेक्षकांतलीं मुलं खदखदून हंसलीं.

रिंगमास्तर म्हातारबुवांना म्हणाला, " आमच्या घोड्याला नांवं नका ठेवूं. स्वारीला किती चांगलं आहे दाखवूं का ? "

" हां हां दाखवा ना ! "

एक विदूषक उडी मारून घोड्यावर चढला. घोडा कँटरनं साफ दौडूं लागला. आणखी एका विदूषकानं त्याच्यावर बसून दाखविलं. तिसऱ्यानं, चवथ्यानं. मग रिंग-मास्तरनं म्हातारबुवांना विचारलं, " बोला, कसा काय आहे आमचा घोडा ? "

" बहोत पसंत आहे! आम्हांला विकत घ्यायचा आहे. "

" हां ? घोड्यावर बसून कुठें जाणार ? "

" काशी-रामेश्वरच्या यात्रेला ! "

प्रेक्षकांत मोठा हंशा झाला.

" ठीक ठीक. मग घ्या की आमचा घोडा. "

" किंमत काय तुमच्या घोड्याची ? "

" एक हजार रुपये. "

" ह्येः ! इतक्या किंमतीचं घोडं आहे काय हें ? "

" बरं, एक हजार रुपये राहूं द्या. तुमचा सवाल बोला. "

" दहा रुपये, देऊं ! "

प्रेक्षक पुन्हां हंसले.

" दहा रुपये ? दहा रुपयांत घोडं राहूं दे, मांजर तरी मिळेल का ? "

आणखी हंशा झाला.

बरीच घासाघीस झाल्यावर पन्नास रुपयाला सौदा ठरला. रिंग-मास्तर म्हातारबुवांना म्हणाला, " काढा पैसे. "

" पैसे आतां नाहीं देणार आमची काशी रामेश्वरची यात्रा करून त्यानं आम्हाला सुखरूप परत आणलं तर मग मिळेल भर किंमत. "

" अरे वारे घोडा घेणारा सौदागार ! द्यारे या भुकडाला हांकून. " रिंगमास्तर ओरडला.

सारे विदूषक म्हातारबुवांवर तुटून पडले. पण म्हातारबुवांनीं रिंगमास्तरची आर्जवं केलीं. " परत आल्यावर पन्नास रुपये खचित देईन, आत्ता थोडासा विसार देतों तेवढा घ्या. तुम्हांलाहि यात्रेचं पुण्य मिळेल. तुमचा घोडाहि पुढें मागें स्वर्गात जाईल. कसंहि करा अन् द्या घोडं. "

रिंगमास्तरनं विचारलं, " अच्छा अच्छा, देतों घोडा तुम्हांला. विसार किती देणार ? "

" जवळ आहे तितका सगळा पैसा देऊन टाकतों. "

" असं का ? छान. काढा पाहूं. "

म्हातारबुवांनीं पडशींतली पिशवी काढली. पिशवींत दुसरी पिशवी होती. दुसरींत तिसरी होती. अशा सात आठ पिशव्या एकांतून एक काढल्यावर एक गांठी मारलेला रुमाल काढला. त्यांतून दुसरा, तिसरा, चवथा असे रुमाल काढले, आणि अखेरच्या रुमालांत गांठून ठेवलेला एक पैसा काढून तो रिंग–मास्तरपुढें धरून म्हातारबुवा म्हणाले,

" घ्या. जवळचा सारा 'पैसा' तुम्हांला दिला आहे. शब्दाला जागणारीं माणसं आहोंत आम्ही. "

तंबूंत हंशा झाला. रिंगमास्तरनं आपला चाबुक म्हातारबुवांच्या पाठीवर काडकन् उडविला, आणि म्हटलं,

" एक दिडकी विसार देतां काय ? पण तुम्ही यात्रेकरू आहांत. तुम्हांला घोडा आम्ही मोफत देतों. " मग विदूषकांना तो म्हणाला, " बसवा रे बसवा आजोबांना घोड्यावर ! "

म्हातारबुवांना घोड्यावर चढविण्यांत आलं, 'पुंडलीक वरदा हाऽरि विठ्ठऽल' असा जयजयकार करून विदूषकांनी त्यांना निरोप दिला, घोडा पळूं लागला तेव्हां म्हातारबुवांनीं भीतीच्या आरोळ्या ठोकल्या. प्रेक्षकांनीं टाळ्या शिट्या वाजविल्या. बँडची गत सुरूं झाली. प्रेक्षकांना चकित करून सोडणारी गोपालची करामत सुरूं झाली.

मी समाधानाचा निःश्वास सोडला.

गोपालनं मुंडासं, अंगरखा आणि नेसलेलं धोतर फेंकून दिलं, पांढऱ्या मिशांचे कल्ले ओरबाडून काढले, अन् अंगरख्याखालचे शर्ट जाकिटांचे दहा बारा जोड काढून टाकतां टाकतां प्रेक्षकांना हंसविलं. तोंडावरच्या गंधाच्या मुद्रा पुसून टाकल्या. अखेर यात्रेकरूच्या पहिल्या सोंगाचं पुरतं विसर्जन करून तंग पोशाखावर चढविलेल्या जरतारी टिकल्यांच्या मखमली चड्डीनिशीं निष्णात खेळाडूच्या ऐटबाज पवित्र्यांत राजाच्या रुंद पुठ्ठयावर तो खडा राहिला ! प्रेक्ष-कांत नेहमीं ठरल्याप्रमाणें टाळ्यांचा एकच गजर उठला. त्या टाळीचा आभार-पूर्वक स्वीकार केला असं दाखविण्यासाठीं गोपालनं मस्तक किंचित् झुकबून

हास्य केलं. मग पुढच्या अवघड कसरतीची पूर्वसूचना घोड्याला देण्यासाठीं "हा ! हः ! हॅ !" असे ठरलेले सांकेतिक इशारे तो देऊं लागला...

मीं पाहिलं तों मालक आपल्या जागेवरून दूर झाले. आतां सगळं कांहीं सुरळीत पार पडेल असं त्यांना वाटलं असावं. मलाहि तसं वाटलं. पण मी जागचा हाललों नाहीं. तसाच पहात उभा राहिलो.

गोपालच्या त्या नंबरांतल्या अवघड कसरतींतलं सगळ्यांत थक्क करून सोडणारं काम तो राजाच्या पाठीवर दोन्ही तळवे टेकून उलटा उभा राही तेव्हां सुरू होई. मग तो फक्त उजव्या हातावर तोल धरी. डाव्या हातावर धरी. मग फक्त डोकं टेकून पावलांनीं हलकं लांकडी पीप फिरवून दाखवी, आणि आशाच किती तरी अशक्य चमत्कारांच्या गोष्टी करी....या साऱ्या पाहण्यासाठीं आणि त्या त्या ठिकाणीं ठरीवपणानं पडणारी टाळी ऐकण्यासाठीं मी उभा राहिलों...गोपालनं तळवे टेकून पाय वर केले...आतां तो डावा हात काढून घेणार हें मला माहीत होतं. गोपालचा हा नंबर मीं किती वेळां पाहिला असेल त्याला कांहीं गणति ? पण पुनःपुन्हां तो पहावासा वाटे. एखादी चीज असंख्य वेळां ऐकली असली तरी कसबी गाणारा एकामागून एकेक उपज कशी घेतो व स्वरसौंदर्य निर्माण करतो तें लक्ष देऊन पाहाण्याची मौज अवीट असते. त्यापैकींच गोपालच्या कामाची चतुराई, चपळाई, ऐट आणि शोभा होती...जणूं गोपालचं तें काम मी आज प्रथमच पहात असल्या-प्रमाणें डोळ्यांत सारं लक्ष एकवटून मी पहात राहिलों...गोपालनं डावा हात राजाच्या पाठीवरून काढला...पायांची कमान करून पावलं घोड्याच्या पाठीला भिडाविली...पायाची कमान परत उचलून तो हात बदलणार इतक्यात—

काय झालं कुणास ठाऊक, कधीं नव्हे तो घोडा एकदम उजव्या बाजूला वळला ! रंगणाच्या भोंवतीं मांडलेल्या लांकडी कठड्यावर त्याचा पुढचा पाय ठोकरला ! त्यानं दोन्ही गुढघे टेकले ! गोपाल त्याच्या अंगावरून जो घरंगळला तो त्याच्या पुढेंच तोंडाशीं पडला ! आणि त्याबरोबर चमकून घोड्यानं गोपालला डोक्याच्या ढुशा आणि टापा मारायला सुरुवात केली....

प्रेक्षकांतले कांहीं लोक ओरडले, "मेला ! पोऱ्या मेला!" मी रंगणांत घुसलों, मालकहि दूर गेले होते ते धांवत आले. पण तेवढ्यांत घोड्याच्या कित्येक ठोकरा खाऊन गोपाल एखाद्या गाठोड्यासारखा दूर जाऊन पडला होता ! आणि राजा घोडा पूर्णपणें बिथरून जाऊन दांत उघडे करीत, मानेला हिसडे देत, खिंकाळत, रंगणांतल्या रंगणांतच एक दोन वेळां वेगानं धांवला होता, व अखेर लांकडी कठड्यावरून झेप घेऊन प्रेक्षकांत शिरला होता ! पांच सहा माणसं तुडविलीं गेलीं होतीं. लोक ओरडत, किंकाळ्या फोडीत धांवूं लागले होते ! क्षणांत साऱ्या तंबूत एकच गोंधळ उडाला होता !

शेवटीं अर्जुना ट्रेनरनं मोठ्या हिमतीनं राजा घोड्याच्या अंगावर काळा कोट टाकून त्याला पकडलं. पुष्कळसे लोक तंबू सोडून पळून गेले होते. उलट पुष्कळ लोक रंगणांत घुसून आमच्याभोंवतीं जमा झाले होते. बाहेरच्या पोलिसांना आंत बोलावून त्यांच्या मदतीनं गर्दीची पांगापांग करावी लागली, व सारं स्थिरस्थावर करावं लागलं. खेळ बंद पडला.

अर्जुना ट्रेनरनं राजा घोड्याला तबेल्यांत नेलं. मीं आणि मालक गोपालला घेऊन हॉस्पिटलमध्यें गेलों.

रात्रीं तंबूवर सगळीकडे खिन्न वातावरण पसरलं होतं. कुणाला जेवण गोड लागलं नव्हत. झोंपहि येत नव्हती. मी आपल्या राहुटींत कॉटवर सचिंत पडून राहिलों होतों.

इतक्यांत मालक माझ्याकडे आले व म्हणाले, " हा अर्जुना ट्रेनर काय म्हणतो तें ऐकलंत कां काका ? "

मीं विचारलं, " काय ? "

" तो म्हणतो राजा आंधळा झाला आहे. "

मीं अर्जुनाकडे वळून आश्चर्यानं विचारलं, " काय, सांगतोय काय ? "

अर्जुना म्हणाला, " चला, प्रत्यक्ष पहाच कीं. "

आम्ही तबेल्यांत गेलों. अर्जुना आम्हांला म्हणाला, " बघा हं. " त्यानं गुद्दा लगावल्या प्रमाणें राजाच्या तोंडावर हात केला. राजानं मान हालविली नाहीं. अर्जुनानं पुन्हां हात मागं आणून ठोसा लगावण्यासाठीं पुढें केला. राजानं

तोंड हालविलं नाहीं. अर्जुनानं त्याच्यापुढें उजवा पंजा धरून निशाण हाल-विल्या प्रमाणें हालविला, राजाच्या डोळ्यांची बिलकुल हालचाल झाली नाहीं.

मालक म्हणाले, " घोड्याचे डोळे साफ गेले, शंकाच नको. "

मीं म्हटलं, " अरेरे ! "

मालक म्हणाले, " उद्यां याला गोळी घालून ठार करूं. आंधळं घोडं विकायचं नसतं. याचं निकामी आयुष्य संपवावं हें उत्तम. उद्यां— "

त्यांचे पुढचे शब्द कानांवर पडण्याच्या आधींच मी तेथून दूर झालों. मालकांचा व्यवहारीपणा आणि त्याच्या पोटीं येणारा कठोरपणा बरोबर असेलहि कदाचित् आणि त्यांच्या निर्णयाविरुद्ध बोलायची सोय नव्हती. पण त्यांचे ते शब्द ऐकून माझ्या काळजांत चर्र झालं.

राहुटीवर परत आलों. पण कॉटवर अंग टाकण्याची इच्छा होईना. कपडे केले, टॉर्च घेतला, काठी घेतली, आणि बाहेर पडलों.

हॉस्पिटलमध्यें जाऊन गोपालच्या कॉटजवळ बसलों तेव्हां तो जागाच होता. पण पुष्कळ बरा होता. त्याच्या जखमा धुऊन बांधल्या गेल्या होत्या. मीं त्याला विचारलं, " आतां तुला बरं वाटतंय ना ? "

तो म्हणाला, " माझं राहूं द्या राजा कसा आहे सांगा. "

" ठीक आहे. " असं म्हणतांना मला आवंढा मिळावा लागला.

माझ्या मनांतलं दुःख ओळखल्या प्रमाणें त्यानं म्हटलं, " तुम्ही माझ्या-पासून कांहीं तरी लपवीत आहांत काका. असं करूं नका. मला खरं तें सांगा. "

मन घट्ट करून मीं म्हटलं, " मालक उद्यां त्याला गोळी घालून मारणार आहेत ! "

त्यानं एकदम उद्गार काढला, " कां ? "

" घोडं आंधळं झालं आहे. "

" तुम्हांला कळलं ? आज कळलं ? "

मीं म्हटलं, " म्हणजे काय ? "

तो म्हणाला, " काका, राजा घोडा आज नव्यानं आंधळा झाला नाहीं. किती दिवसांपूर्वीपासूनच त्याला आंधळेपण आलेलं आहे. प्रथम त्याची दृष्टि

थोडी थोडी जाऊं लागली, मग पुढें साफ गेली. किती तरी दिवस राजा आंधळा आहे. ”

मीं म्हटलं, “ असं ? आमची कल्पना अशी कीं घोडा आज एकदम आंधळा झाला आणि म्हणून कठड्याकडे चुकून वळून टोकरला— ”

“ छे छे ! आज राजा ठोकरला तो त्याच्या चुकीमुळें नव्हे, माझ्या चुकीमुळें. ” गोपाळ म्हणाला. “ राजा किती दिवस तरी आंधळा होता. म्हणूनच मी त्याला रंगणांत पुढें पाठवीत नसे. माझं अंग चांचपीत येऊं देत असे. तो नेहमींच असा माझ्या मागोमाग हिंडत असे. मी त्याला त्याच्या डोळ्यांसारखा होतों. माझ्या नंबरांतल्या कसरतीच्या वेळेस हातापायांचे दाब देऊन त्या इशाऱ्यांवर मी त्याला बरोबर चालवीत असे. पण आज माझंच मन ठिकाणावर नव्हतं. मी नंबर करीत होतों, पण एकीकडे मनांतल्या मनांत ओक्साबोक्शीं रडत होतों. बँडवरच्या चालींत ‘देवकी गेली, देवकी गेली’ असा आक्रोश मला ऐकूं येत होता. माझे इशारे चुकले म्हणून राजा टोकरला. त्याच्याकडे चूक नाहीं. चूक माझी होती काका...”

तें सारं ऐकून मी अगदीं स्तब्ध झालों. गोपालहि कांहीं न बोलतां डोळे मिटून पडून राहिला.

मी निघालों तेव्हां तो म्हणाला, “ मालकांना सांगा, राजाला मारूं नका.”

मी म्हटलं, “ राजापेक्षांदेखील अधिक चांगला घोडा आणून ते तुला देतील ! पैशांकडे पाहाणार नाहींत. ”

तो म्हणाला, “ लाख रुपयांचं दुसरं घोडं आणलं तरी मला नको आहे ! माझा ‘राजा’ मला हवा आहे. जगांत त्याच्यावांचून दुसरी कोणती गोष्ट मला आतां प्यार आहे ?... मालकांना म्हणावं त्याला गोळी घालूं नका ! ”

“ बरं, सांगतों ” असं मीं म्हटलं खरं, पण माझे ते शब्द इतके दुबळे होते कीं मालक माझं ऐकणार नाहींत असा त्याचा खरा अर्थ होता. तो गोपालनं ओळखला कीं काय तें पाहण्यासाठीं मान वळविण्याचा मला धीर झाला नाहीं. मी हॉस्पिटलमधून बाहेर पडलों आणि राहुटीवर परत आलों.

सकाळीं कुणी तरी मला हालवून जागं केलं, " काका, उठा. चला. राजा घोडा तबेल्यांत जागेवर नाहीं "

मीं उद्गार काढला, " ऑं ? आंधळं घोडं तबेल्यांतून जाईल कसं ? "

पण तबेल्यांत जाऊन पहातों तों राजा खरोखरच तिथें नव्हता !

नंतर दोन घटकांनीं मी मालकांच्या राहुटींत बसलों होतों तेव्हां हॉस्पिटलमधला माणूस आला. त्यानं वर्दी आणली होती कीं, ' सकाळीं गोपाल आपल्या कॉटवर आढळला नव्हता. हॉस्पिटलमध्यें कुठेंहि त्याचा शोध लागला नव्हता. तुमच्या तंबूवर तो परत आला असल्यास कळवा.'

मीं त्या माणसाला खोटंच सांगितलं, " डॉक्टरना सांगा, पेशंट इकडे परत आलेला आहे. तुम्ही कांहीं चिंता करूं नका. "

तो माणूस गेल्यावर मालकांनीं मला नजरेनं विचारलं, ' त्या माणसाला असं काय सांगितलंत ?' मीं त्यांना नजरेनं उत्तर दिलं, ' मीं सांगितलं तें बरोबर आहे...' गोपाल हॉस्पिटलमधून पहांटे उठून तंबूवर आला असला पाहिजे, व राजाला सोडून घेऊन नाहींसा झाला असला पाहिजे. घोड्याला गोळी घालून मारण्यांत येणार हें कळल्यावर त्याचा जीव स्वस्थ राहणं शक्यच नव्हतं. त्याचे शब्द मला आठवले " जगांत राजा घोड्यावांचून दुसरी कोणती गोष्ट मला आतां प्यार आहे ? "...गोपालचा शोध करावा आणि त्याला परत आणावं असं मला क्षणभर वाटलं. पण पुन्हां मनांत आलं, त्यांत कांहीं अर्थ नाहीं... त्याच्या तोंडचा आणखी एक उद्गार मला आठवला " प्रत्येकाचं आयुष्य वेगवेगळ्या मार्गानं आंखलेलं असतं. त्या मार्गानं त्या त्या माणसाला जाऊं द्यावं हेंच बरं ! "...

